# निरंजनमाधवांचा कवितासंग्रह.

## भाग पहिला.



१ स्तोत्रसंग्रह.

२ सांप्रदायपरिमळ.

हा

**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर**, बी. ए.,

संपादक 'मुमुक्षु,' पुणें,

यांनीं संपादिला, संशोधिला व प्रकाशिला.

श्रावण, शके १८४१, आगस्ट सन १९१९.

किंमत एक रुपया.

# प्रस्तावना.

१ जुन्या मराठी कवितेच्या संशोधनार्थ संचार करीत असतां सुमारें १८ वर्षांपूर्वी 'निरंजनमाधव' यांच्या कवितेचा कविलिखित अस्सल संग्रह नाशीकक्षेत्रीं माझे हातीं आला. त्यांची बहुतेक कविता अप्रसिद्ध असूनही उच्च प्रतीची आहे असें ती वाचतांना मनांत येतांच ती समग्र प्रसिद्ध करून मराठी भाषेची सेवा करावी असें त्याच वेळीं मनानें घेतलें. इ. स. १९०३ सालीं ह्या कवीचें चरित्र व ग्रंथ यावर केसरींत २।३ लेखही मीं प्रसिद्ध केले. तथापि कांहीं अडचणीमुळें हा कवितासंग्रह छापण्याची मनीषा मनांतच ठेवावी लागली. १९१५।१६ सालीं ह्या भागांत छापलेले स्तोत्रसंग्रह व सांप्रदायपरिमळ मीं आपल्या मुमुक्षूंतून क्रमशः प्रसिद्ध केले. आतां त्यांचेंच हें स्वतंत्र पुस्तक छापून प्रसिद्ध करीत आहें. बाकीची कविता पुढें दोन भागांत कागद स्वस्त होतांच प्रसिद्ध होईल.

२ स्तोत्रसंग्रहापैकीं स्तोत्रें १।६।७।१०।११।१५।१६।१७।१८।१९ हीं दहा स्तोत्रें प्रथम प्रसिद्ध करण्याचा मान ठाण्याच्या 'मराठी कवि' ह्या मासिकाला दिला पाहिजे. बाकीचीं स्तोत्रें व सांप्रदायपरिमळ हा ग्रंथ मात्र प्रथमच मराठी वाचकांच्या हातीं पडत आहे.

३ निरंजनमाधवांच्या कवितेंत काव्यस्फूर्ति किती उच्च दर्ज्याची आहे व त्यांच्या भाषेंत सरळपणा व प्रसाद किती सोज्वळ आहे याची कल्पना ह्या भागावरूनच होईल. यांच्या भाषेंत, विचारांत आणि पद्धतींत नवीनपणा आहे. हा कवि स्वतंत्र आहे. यांचें 'रामकर्णामृत' स्तोत्र रामभक्तांनाच काय पण सर्व रसिक वाचकांना चटका लावील. 'सद्गुरुस्तव' अनुपमच आहे. 'हनुमंतस्तोत्रां'ची भाषा वीर्यवती असून छंदही वीरछंदाला अनुरूपच आहे. पहिलीं दोन स्तोत्रें मोरोपंती थाटाचीं असून पंतांना त्यांपासून स्फूर्ति झाली असावी असें मला वाटतें. सांप्रदाय-

परिमळ ग्रंथांत कवीची वर्णनपद्धती किती साधी व मनोहर आहे तें दिसतें. याची बहुतेक कविता १६५७ ते शके १६९० च्या दरम्यानची असल्यामुळें व पहिल्या बाजीराव पेशव्यांच्या आश्रयांत याचें पूर्ववय गेलें असल्यानें हा कवि पेशवाई काळांतला होय हें उघड आहे. मोरोपंतांच्या बाळपणीं हा कवि प्रौढ वयाचा होता. पण याचें चरित्र व काव्य-विवेचन पुढें समग्र देण्याचा विचार असल्यानें आज त्याबद्दल कांहीं लिहित नाहीं.

४ हा ग्रंथ बारा आण्यास देण्याचा प्रथम विचार होता. पण कागदाच्या व छपाईच्या महर्गतेमुळें याची किंमत एक रुपाया ठेवणें जरूर झालें आहे.

पुणें, मुमुक्षु कचेरी.<br>नागपंचमी शके १८४१ } **लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.**

# अनुक्रमणिका.

## १ स्तोत्रसंग्रह.

## २ सांप्रदायपरिमळ.



एकूण पद्यसंख्या ७२३+९९२=१७१५.

# निरंजनमाधव कविकृत

## १ स्तोत्रसंग्रह.



### १ मंत्ररामचरित.

श्री ज्याची ललना, भुजंग शयना, पुत्रत्व पद्मासना,
पक्षी तो वहना, समुद्र सदना, वाणी रती या सुना ।
कंठीं कौस्तुभ भूषणा सुखघना प्राधान्य पंचानना
सारें विश्वकुटुंब राज्य गणना त्रैलोक्य नारायणा ॥ १ ॥

राजे थोर धरातळीं अतिबळी ते रावणें जिंतिले
स्वर्गीचे सुर गेहकार्यकरणीं जेणें सदा योजिले ।
पाताळीं उरगांगना हरुनिया चूडामणी घेतले
द्वारीं नित्य उभे नवग्रह, असे बंदीं किती घातले ॥ २ ॥

मंत्राचें बळ राहिलें, ऋषिवरीं यज्ञक्रिया टाकिल्या,
रोडेले अमरेंद्र भाग हरितां आंगीं शिरा वाहिल्या ।
धाकें कांपतसे सदा वसुमती भीवोनि त्या रावणा
लोकीं अन्य कदा समर्थ न दिसे त्रैलोक्यसंरक्षणा ॥ ३ ॥

जेणें शंकर अर्चिला निजकरें वाहोनि दाहा शिरें
तेणें तुष्ट पिनाकपाणि वर दे वोपी तया सादरें ।
'स्वर्गीचे सुरयक्षकिन्नर महादैत्येंद्र राजे बळी
ते होतील हतप्रभाव समुदे तूझ्या प्रतापानळीं' ॥ ४ ॥

यक्षा जिंतुनि यानपुष्पकनिधी घेवोनि गेला घरा
आला ऐकुनि दिक्पती दशदिशा त्या टाकिती सत्वरा ।
स्वर्गीचे मणि पारिजात समुदे लंकांगणीं आणिले
धेनू कामदुधा हयोत्तम करी द्वारीं बळें बांधिले ॥ ५ ॥

रामें रावण निंदिती सुरपती जावोनि विष्णुप्रती
झालें वृत्त समस्तही विनविती बोले तया श्रीपती ।
' होतों दाशरथी, तुह्मी वसुमती घ्या वानराच्या बुथी
आहे दुष्ट किती वधोनि कुमती संतोषऊं ते क्षिती ' ॥ ६ ॥

मंत्री मेळविले अजात्मज करी संभार यज्ञीं बरा
तेव्हां राघव जन्मला, नृपतिला आनंद झाला पुरा ।
नेला अध्वररक्षणा मुनिवरें मार्गीं वधी ताटिका
केली मुक्त पदीं चतुर्मुखसुता नामें अहल्या निका ॥ ७ ॥

जनकनृपतिगेहीं भंगिलें चाप रामें
परिणिलि मग सीतादेवता सार्वभौमें ।
पथिं भृगुतनयाचा मान सिद्धीस गेला
रघुपति युवराज्यीं स्थापनीं नेम केला ॥ ८ ॥

यथातथ्य वाणी पित्याची कराया
सवें घेतली जानकी भव्यकाया ।
त्वरें चालिला दंडकारण्यपंथें
जनस्थान गोदावरी तीर्थ जेथें ॥ ९ ॥

जगन्नायकाची हरी धर्मदारा ।
दशग्रीव कापट्यवेषें उदारा ।
वधी राम वालीस सुग्रीवसंगें
तरे वारिधी जाय लंकेसि वेगें ॥ १० ॥

येथ राघव पातला परिघ हा शाखामृगीं घातला
बांधाया मज मातला विसगुणें इच्छा धरी मातला ।
हा तों मानुष पूतळा निजकरीं नाराच हा धूतला
वक्षीं तीखट रूतला कपिदळीं पाडीन त्या भूतळा ॥ ११ ॥

रामासीं झगडावयासि निधडा लंकेश आला पुढां
रामें बाणसडा करोनि करडा त्या नाचवीलें धडा ।
सैन्याचा रगडा सवृक्ष दगडा तो हाणितो माकडा
बाहे रक्त भडाड रावणदळीं केला शिरांचा हुडा ॥ १२ ॥

मारी रावणकुंभकर्ण समरीं त्या मेघनादासवें
सीता सोडविली बिभीषण पदीं संस्थापिला वैभवें ।

आला तो शरयूतटासि भरता भेटे पुन्हां भूपती
शोभे राज्यपदीं सुबांधवजनीं पूर्णेंदु सीतापती ॥ १३ ॥
ऐशी हे रघुनाथकीर्तनकथाशृंगारहारावळी
नामें मुक्तमणी चरित्रपदकें भक्तीसुतें गुंफिली ।
कंठीं भूषण शोभतांचि भुलल्या त्या मुक्तियोषा बळें
त्यांचा संग निरीक्षितांचि रुसल्या गेल्या कुबुद्धी पळें ॥१४॥
हे गाथा यशलाभ या क्षितितळीं सर्वार्थही भेटवी
अंतीं रामपरायणासि पदवी वैकुंठिंची दाखवी ।
केली **माधवनंदनें** कविवरें मंत्राघहारावळी
तेरा गुंफुनि पावला गुरुकृपें धन्यत्व सन्मंडळीं ॥ १५ ॥

---

## २ निरोष्टराघवचरित.

दीनजनावन दाशरथी—। चरित सरस, दे अचल गती ॥
ऐहिकहीं अतिऋद्धि करी । चित्तकलंक अशेष हरी ॥ १ ॥
दशरथअवनीनाथघरीं । कौसल्यासतिच्या जठरीं ॥
जलजदलायतनेत्र[1] हरी । जलधिशयन अवतार करी ॥ २ ॥
अगणितवीर्यनिधीजनिला । निर्जरगण हर्षित घडला ॥
शेषचक्रजलजात असे । सहित–सहोदर तो विलसे ॥ ३ ॥
वडिल तनय रणधीर वना । याज्ञिक गाधिज ने अवना ॥
यज्ञविनाशक रात्रिचरां । वध करवी ऋषिविघ्नकरां ॥ ४ ॥
शिला चरणकल्हाररजें । द्विजवनिता घडली सहजें ॥
जनकसदसिं हर...... । दोनि खंड करि रघुराणा ॥ ५ ॥
वरी जनकतनया नवरी । त्रिदिववरां आल्हाद करी ॥
क्षत्रियांतकरगर्वगजा । केसरि हा राघवराजा ॥ ६ ॥
सत्यवचन धरणीश यया । धाडी दंडक–ऋषिनिलया ॥
अवर अनुज त्यासहित सती । करि गोदातटवनिं वसती ॥ ७ ॥

---

[1] कमलदलाप्रमाणें विस्तीर्ण व विकसित आहेत नेत्र ज्याचे असा श्रीविष्णु.

कनकहरिण निरखी नयनीं । सती अवनिजा त्याचक्षणीं ॥
धरावया विनवी नाथा । विनयें शशिवदना सीता ॥ ८ ॥
शराधिशरासन करीं धरी । काळवीटकदनार्थ हरी ॥
सहित अनुजवर वेग करी । तंव आला दशकंठ घरीं ॥ ९ ॥
सदनीं एकट कनकलता । राघवराणी ते सीता ॥
असतां हरिली हरिणदृशा । लंके ने लंकेश असा ॥ १० ॥
शोधित वनगव्हर सारें । वृद्ध गीधवचनाधारें ॥
देखति तैं नैषाद सती । वृत्त यथास्थित सर्व कथी ॥ ११ ॥
वानरनायक सख्य करी । वाली वधिला एकशरीं ॥
अष्टदिशा शोधासि हरी । धाडी कीशेश्वर निकरीं ॥ १२ ॥
वाततनय अंगद असिले । वीर निघाले शत निशिले ॥
सागरलंघन वेग करी । अंजनितोक वनोक वरीं ॥ १३ ॥
राक्षसनगरीं सति सीता । राक्षसवनितागतनाथा ॥
चिंतन करितां कृश झाली । जलदविना जाती वल्ली ॥ १४ ॥
अशोकवनिं कांतीं निवसे । तारा क्षितिवरि काय घसे ॥
देखियली क्षितिधरराणी । राजनंदिनी दिवस गणी ॥ १५ ॥
वृकवनितासंघीं हरिणी । चकित चलित केविलवाणी ॥
देखत अंजनिच्या तनयें । अंघ्रि वंदिले अतिविनयें ॥ १६ ॥
नाथ आंगठी दे तिजला । वनितागण होता निजला ॥
कांतवृत्त तो कथन करी । एकांतीं सतिशोक हरी ॥ १७ ॥
हर्षित झाली दिव्यसती । शिरोरत्न दे या हातीं ॥
काकशिक्षिता कथा कथी । संदेशवचन दे अशा रिती ॥ १८ ॥
आज्ञा देतां निघे हरी । अशोकवनिका ध्वंस करी ॥
ऐकत रावण रोष करी । धाडी किंकर लक्षवरी ॥ १९ ॥
ते वीरें वधिले येतां । अक्षयसह राक्षसनाथां ॥
इंद्रजितें वानर धरिला । जनकसान्निधी ने वहिला ॥ २० ॥
कोण कीश तव नांव कथीं । कां आलासि असें वदती ॥
सांगे कथन सविस्तर तो । रावण तृणवत जो गणितो ॥ २१ ॥
राघवदास असें साचा । तनय असे रे वाताचा ॥
आलों सतिशोध कराया । येथ देखिलि क्षितितनया ॥ २२ ॥

राजनंदिनी सोडि खळा । नातरि नाश घडे सकळां ॥
शरण जाय राघवचरणा । शरणार्थीरक्षणकरणा ॥ २३ ॥
सीता दे त्याची त्याला । व्यर्थ कलह हा काशाला ॥
ना तरि जीवें जासी रे । हितगोष्टी नायिकसी रे ॥ २४ ॥
ऐकत रावण घृतधारा । सिक्त अनळ लागत वारा ॥
तेविं वृद्ध क्रोधाग्नि घढे । चित्तीं अतिशय क्रोध कढे ॥ २५ ॥
वाळदाह करवी रोषें । निर्दय राक्षस आवेशें ॥
ज्वाळा शिखिची अति वाढे । तों तों वानरही वाढे ॥ २६ ॥
जाळित सुटला धवळारें । थोर थोर राजागारें ॥
जाळियली कांचननगरी । सागरलंघन वीर करी ॥ २७ ॥
वृत्त कथी रविवंशवरा । असे सती जीवंत धुरा ॥
त्वरा करीं निघ गा नृहरी । ऐकतां सजला तैंचि हरी ॥ २८ ॥
वानरनाथनिदेशवर्ता । सेना चाले त्वरितगती ॥
हांसत नाचत धांवत ते । जात सागरा लक्षिति ते ॥ २९ ॥
सागरतोयीं सेतु करी । राघवसेना नृत्य करी ॥
राक्षस निघती रणकदना । संहारि राघव दशवदना ॥ ३० ॥
घटश्रोत्र इंद्रारि असे । देवांतक नरघातकसे ॥
ख्यातख्यातत्र्यैलोक्यजयी । वधी तया राघव विजयी ॥ ३१ ॥
यशशिखरीं वानर चढले । देव सर्व हर्षित घडले ।
लंका रावणसोदर घे । राघवचरणा शरण रिघे ॥ ३२ ॥
दिनकरशशि तंव राज्य करीं । राघव दे वरहस्त शिरीं ॥
यक्षवाहनावरि वळघे । हरि सेनेसह तैंचि निघे ॥ ३३ ॥
अंतरिक्षगत चाल करी । देखे राघव निजनगरी ॥
कैकयितनय जटी वल्की । त्यासि सादरें अवलोकी ॥ ३४ ॥
आलिंगी त्या तोष करी । लोभें आघ्राणोनि शिरीं ।
अरिनाशकसह जनयित्री । स्नेहें निरखी निजनेत्रीं ॥ ३५ ॥
हर्ष न सांटे तैं जगती । देखति राघव दीनगती ॥
हृद्गत खेद तदा सरला । चिंतावारिद वोसरला ॥ ३६ ॥
झाला तोष अशेष जना । आला श्रीश त्यजोनिं वना ॥
आतां करिल जगा अवना । शाशिल निजधरणी राणा ॥ ३७ ॥

कैकयितनयवसिष्ठऋषीं । सचिवसहित विनविति हर्षीं ॥
राज्य करी हरि वडिलांचें । यांताचि अति हित सकळांचें ॥ ३८ ॥
अंगीकार करी नृहरी । लोकशिराणी साच करी ॥
स्नान यथाविधि राज्यधरा । करविति जन तोषें नृवरा ॥ ३९ ॥
रत्नाकिरीटांगदवलयें । हारादिक तें कनकचयें ॥
आणिति देव त्रिलोकधणी । स्तविती राघवकृत करणी ॥ ४० ॥
राजेश्वर रघुवर घडला । देवसंघ हर्षा चढला ॥
जयजयकार त्रिलोक वरी । नाद वळघला सत्यशिरीं ॥ ४१ ॥
जनकनंदिनीसह राजा । राघव निर्जरवरकाजा ॥
अवतरला करि अति लीला । सज्जनजन अवघा धाला ॥ ४२ ॥
कवी **निरंजन** कीर्ति रची । यथाधीषणा निजवाचीं ॥
राघवचरणसरोजदळा । वाहे श्लोकस्रज सगळा ॥ ४३ ॥
दशरथनंदनचरित असें । अवोष्ठवर्णें ग्रथित असे ॥
कविवर संतां तोषकरी । सिद्ध घडे हें जरि विवरी ॥ ४४ ॥
मीनाकांतत्रिलोकधणी । तारक कीर्ति करी धरणी ॥
गायिल जो नर तो तरतो । कैवल्यांगण तो वरितो ॥ ४५ ॥

इति निरंजनयोगीविरचितं **निर्वोष्ठराघवचरितं** समाप्तं ॥

श्रीरघुवीरचरणेऽर्पितं ॥

---

## ३ स्वरूपानुभवाष्टक.

' ब्रह्मैवाहं ' ह्मणोनी सतत जप करी सर्वसाक्षी सुखात्मा
सत्यज्ञानस्वरूपीं विलसत समुदा मीच आहें परात्मा ।
माझ्या ठायींच सारें प्रकटत जग हें पूर्णमायाविलासें
ऊर्मी नाना समुद्रीं प्रभवाति पवनें तेंवि मी सर्व भासें ॥ १ ॥
कुंभाकारेंचि माती घडुनि मिरविली भूषणाकार सोनें
मायाकारेंचि सारें जग घडुनि असें मीच हा सत्य जाणे ।
पाहूं जातां न माया किमपि तरि असे माझिया शुद्ध रूपीं
कोठें आहे म्हणावी लहरि तरि दुजी सांग अद्वैत–आपीं ॥ २ ॥

नाहीं मातीपणीं या घट म्हणुनि कदा दूसरा भाव जाणे
नाहीं सोनेपणीं या कधिंच निरखितां कुंडलाकार होणें ।
ना झाला सर्प रज्जू समज कधिं सहीं शुक्तिरूपें न झाली
भ्रांता दिग्भ्रांति तैशी सकळ ममरुपीं कल्पना हे उदेली ॥ ३ ॥
आकाशीं श्यामिका तें जल तरि दिसतें जेविं त्या रश्मिभार्गी
तैसी हे कल्पना पैं अवचित उपजे नेच्छिली ही ममांगीं ।
पाहूं जातां तियेतें कवण म्हणुनियां कल्पना आढळेना
कल्पावें कोण त्यालें मजविण दुसरें कल्पितेंही असेना ॥ ४ ॥
वाणी वृत्ती मनाच्या मजहुनि समुया वर्तती दूर पाहीं
तोयीं त्या फेनजाला उपजुनि न पवे फेन तोयासि कांहीं ।
ऊर्णायू जेविं आहे सकळ रचुनियां जाल आत्मस्थतंतू
विस्तारोनी न गुंते अपुणचि आपणामाजि खेळे स्वहेतू ॥ ५ ॥
दोहीं त्या कारणत्वें अपुणच मिरवे कार्य निर्मोनि तंतू
तैसा मी हेतु ऐसा समज शुभगुणा सर्वही मीच हेतु ।
ऐसें माझ्या विलासीं सकळहि रचलें दीसतां मी परात्मा
ना गुंते ना घडे मी अलगचि कलनातीत आहें महात्मा ॥ ६ ॥
आहे नाहीं असेंही विवरण करितां ठाव दोहींस नाहीं
आहे तैं बोलवेना नसलचि म्हणतां मीच हें विश्व पाहीं ।
ऐशा विज्ञानबोधें समरसुनि असें भिन्न नोहोनि भिन्न
आहे भिन्नत्वभावारहित अपुण मी सर्वसाक्षी अभिन्न ॥ ७ ॥
ऐशा तत्त्वावबोधा निरखुनि वसिजे आपुणीं आपणातें
पाहा संकेत आहे गुरुनिगदित हा वेदसिद्धांत मातें ।
या बोधें पूर्ण ऊर्मीविण जलनिधिसा वर्ततो निर्विकल्पें
सांगे ऐसा बनाजी कविवर सुजनां वेचतां कोटिकल्पें ॥ ८ ॥

---

## ४ श्रीनारायणाष्टकं.

ज्या देवां स्तविताति वेद समुदें शास्त्रें जया चर्चिती
ब्रह्मेशादि सुरेंद्र सर्व नियमें ज्याच्या पदा अर्चिती ।
ज्यापासोनि अभीष्ट चिंतिति सदा ज्ञानी मुमुक्षू यती
आर्तत्राणपरायणः स भगवान्नारायणो मे गतिः ॥ १ ॥

प्रल्हादें भजतां अनन्यगतिनें सप्रेमभावें अती
दंडी त्या तनुजा हिरण्यकशिपु द्रोही महा दुष्कृती ।
भक्ताच्या अभिरक्षणा प्रकटला स्तंभीं करालाकृती । आर्त० ॥ २॥
रक्षेशा कथितां बिभीषण नयें रामासि दे तत्सती
ऐसें ऐकुनि ताडितां पदयुगें टाकोनिया संगती ।
आला तो शरणार्थ रक्षुनि करी आकल्प लंकापती । आर्त० ॥ ३ ॥
नक्रें तो धरिला पदीं गजपती, वोढी जळीं दुर्मती
ज्ञाती त्या असमर्थ टाकिति तदा पावोनियां दुर्गती ।
बोभाये तंव सोडवी हरि जवें धांवोनि ये त्याप्रती । आर्त० ॥ ४ ॥
यूतीं जिंतुनि पांडवा द्रुपदजा वोढोनि नेली सती
दुष्टें कौरवनायकें निजसभे भीष्मादि ते पाहती ।
इच्छी नग्न करूं अशांत लुगडी जो नेसवी श्रीपती । आर्त० ॥ ५ ॥
इंद्राच्या रतिसंगमा निरखितां क्रोधें अहल्येप्रती
शापी गौतम तूं शिला घडुनिया राहे वनीं शाश्वती ।
केली पावन पादपंकजरजें ज्यातें श्रुती वंदिति । आर्त० ॥ ६ ॥
जो पंचाब्दशिशू सपत्नजननीवाग्वज्रभिन्नस्थिती
वैषम्यें निलयीं उदासिनमनें लागे हरीच्या पथीं ।
वात्सल्यें करुणानिधी ध्रुवपदीं स्थापोनि दे संपती । आर्त० ॥ ७ ॥
क्षीरार्थी उपमन्यु बालक रडे दुग्धाब्धि दे त्याप्रती
पापी ही परि पुत्रनाम पढतां त्या पाववी निष्कृती ।
वेश्याही सहजें विमान वळघे वानूं असे मी किती । आर्त० ॥ ८ ॥
हें नारायणपावनाष्टक असे जो कां त्रिकाळीं पढे
तो नागामरमानवेश्वरसभे सन्मान त्याला घडे ।
जीवन्मुक्ति वरोनि भक्तवर तो प्राणप्रयाणोत्सवीं
पावे तत्परसंपदासि विनवी संत, बनाजी कवी ॥ ९ ॥

---

# ५ श्रीहनूमंतस्तोत्र.

वृत्त—स्रग्विणी.

अंजनीगर्भवैरागरीचा मणी । भक्तचिंतार्थ देणार चिंतामणी ॥
शोभतो वीर विख्यात चूडामणी । हीनदीनाजना मुख्य रक्षामणी ॥ १ ॥
अर्जुनाच्या ध्वजस्तंभिचा जो मणी । वानरस्तोमनक्षत्रतारामणी ॥
शौर्यवारांनिधीमाजि मुक्तामणी । देखिला लोचनीं मारुती सन्मणी ॥२॥
धाक वाहे मनीं नित्य लंकापती । पापतापादि ज्या देखतां कांपती ॥
कामलोभादि दुर्वार हे लोपती । तुष्टवी सेवनें राम सीतापती ॥ ३ ॥
मारुती रामभक्ताग्रणी स्तव्य हा । ब्रह्मचर्यें विराजे सदा भव्य हा ॥
शांत हा दांत हा वीर हा शूर हा । दुष्ट रात्रिंचराच्या गणा क्रूर हा ॥४॥
हाच रुद्रावतारी प्रतापी हरी । संगरीं राक्षसांच्या कुळा संहरी ॥
जानकीशोकसंताप कर्ता दुरी । मानवां भक्तियोगेंचि हा उद्धरी ॥ ५ ॥
शंभरा योजनांचा उडे वारिधी । एकला जाय लंकेंत हा धीरधी ॥
राममुद्रा सतीच्या करीं अर्पिली । सौख्यवार्तासुधासेचनें सिंपिली ॥ ६ ॥
तोषवीली रमानायकाची प्रिया । शोकसंतप्त ते जाहली निर्भया ॥
वाटिका ते अशोकाभिधा नाशिली । कोटिशां किंकराची फळी त्रासिली ७
मारिला पुत्र तैं रावणाचा बळी । सैन्यही फार युद्धांगणीं निर्दळी ॥
जाळिली हेमलंका अलंकारिता । वाटला हाचि संवर्तसंहारिता ॥ ८ ॥
जानकीक्षेमवार्ता वदे राघवा । वानरीभार संयोगिला आघवा ॥
राम वाहोनि खांदीं बळी हा निघे । आहवीं राक्षसांचा बहू जीव घे ॥९॥
लक्षशा योजनें जो उडे अंबरीं । मस्तकीं वाहिला द्रोण मोठा गिरी ॥
आणिला लक्ष्मणा जीववायाप्रती । विघ्नकर्ता वधी काळनेमी पथीं ॥१०॥
बाळ तात्काळ उत्पन्न होतां क्षणीं । जो उडे बाळभानूचिया भक्षणीं ॥
पाहिलें ताम्र पक्कान्न तैशापरी । पांचशें योजनें लंघितां अंबरीं ॥ ११ ॥
इंद्रवज्रप्रहारें पडे भूतळीं । भूधराचें करी चूर्ण आंगातळीं ॥
वायु रोधी जगत्प्राण तैं निर्जरा । भीति वाटे मनीं मृत्यु आला वरा ॥ १२ ॥
देव तेत्तीस कोटी तदा पातले । ब्रह्मरुद्रेंद्र ज्यांमाजि ते आगळे ॥
वायुपुत्रासि वज्रांग केलें तदा । दीर्घजीवी असो हा यशस्वी सदा ॥१३॥

यापरी देत आशीर्गिरा सर्वही । हाचि पावेल सत्कारसर्वा मही ॥
नोषवीलें सुरांनीं असें वायुला । तैं पिता मोदसिंधूंत उन्मज्जला ॥ १४ ॥
तैं घडे मारुती सर्वदेवागळा । रामदासांत हा शोभला एकला ॥
वेदशास्त्रें पुराणें जया वानिती । भाट याचे कवी सर्व वाखाणिती ॥१५॥
यासि जे वर्णिती धन्य ते या जनीं । धन्य ते लागती याचिया पूजनीं ॥
वेदसंपन्न ते धान्यरत्नें धनें । शोभती मंदिरीं पुत्रदाराजनें ॥ १६ ॥
ऐहिकामुष्मकीं ते सुखें भोगिती । जे यया अंतरीं सादरें चिंतिती ॥
श्रीहनूमंत हें नामवाणी जपे । तो तरे या भवाब्धींत पैं साक्षपें ॥ १७ ॥
वंदिजे पूजिजे ध्यायिजे पाहिजे । मारुती मारुती नाम हें गाइजे ॥
वानपुत्रा महावीर्यवंता हरी । अंजनीसंभवा सद्भटीं केसरी ॥ १८ ॥
दुष्टगर्वापहारी असें चिंतिती । मानवी तेचि सर्वार्थही पावती ॥
जिंकिती या जगीं षड्रिपूंचीं दळें। बाधिजेना कधीं या कळीच्या मळें १९.
जाणुनि श्रेष्ठ यातें वनाजी कवी । रात्रिवारीं नमी पादपद्में स्तवी ॥
सुप्रसन्नें मनें लागला सेवना । याविना दूसरी त्या नसे कामना ॥ २० ॥
इतिश्रीमन्निरंजनमाधवविरचितं श्रीमद्धनुमंतस्तोत्रं संपूर्णं श्रीरामार्पणमस्तु ॥

---

## ६ सांबशिवाष्टक.

### वृत्त—इंदुवदना.

काय करि काळकलि नीलगल चित्तीं
ध्याल जरि वालभरि बैसुनि निवातीं ।
भाळशिखि बाळशशिमंडण भवारे
सांब शिव सांब शिव सांब शिव गा रे ॥ १ ॥
गांगजळ बिल्वदळ तंदुळतिळांनीं
कोकनदकुंदकरवीरकुसुमांनीं ।
धूपबळिदीपयुत अर्पुनी पुजा रे । सांब० ॥ २ ॥
देववर भीतिहर शंकर उमेशा
कामरिपु कोमल मनोज्ञतरवेषा ।
शूलवरखड्गधनुहेतिधरणा रे । सांब० ॥ ३ ॥

पर्वतसुतारमण शर्व सुखराशी
दीनजनपालनसुदक्ष विपदांशी ।
नासुनि निजात्मपद देत सुजना रे । सांब० ॥ ४ ॥
भूति अतिशुभ्र विभुचर्चित निजांगीं
शारदपयोदनिभ भासत सुयोगी ।
कृत्तिकृतवास अविनाशक भजा रे । सांब० ॥ ५ ॥
मूळ अमरांसि अमरागसम पाहा
कामितमनोरथफळासि पुरवी हा !
नामजपमात्र करितांचि मनुजा रे । सांब० ॥ ६ ॥
निर्मळपदांबुरुहअर्चनपरांतें
पूर्णपददान करणार विभु हातें ।
हाचि परमेश परतत्व समजा रे । सांब० ॥ ७ ॥
इंदुवदना अनुपमान ललितांगी
कल्पलतिकासम अखंडित अलिंगी
तोचि कुळदैवत तया शरण जा रे । सांब० ॥ ८ ॥
सांबशिवपावनसुधाष्टक बनाजी
किंकर सदंतर रचोनि पद पूजी ।
पाठ करितील शिवभक्त जरि भावें
मुक्तिनवरी वरिल शंकरविभावें । सांब० ॥ ९ ॥

तिश्रीच्योगी निरंजनमाधवविरचितं सांबशिवाष्टकं संपूर्णम् ॥

---

## ७ भवान्यष्टक.

वृत्त—कुसुमशर

अमित शशिदिनरमणसम सुभगतेजा
कनकनिभतनु अरुणतरकरसरोजा ।
अतिमधुरधनुकुसुमशराविधृतपाणी
नमन तुज नमन तुज सविनय भवानी ॥ १ ॥

नवतरुण मद्भरित गजगति सुवेषा
ललितमुख निबिडसुख परिमितसुहासा ।
चकितमृगशिशुनयन विजितपिकवाणी । नमन तुज० ॥२॥
असुरकुळदहनकरानिशितकरवाळा
धरिसि अरितिमिरहर मिहिरसम शूळा ।
अभयवर विपदगिरिभिदुरकर दोन्ही । नमन० ॥ ३ ॥
तव भजनरत तरति भवजलधि आर्यी
पुजिति जरि सुमनफळ जळसह तुकार्यी ।
पदकमळ अतिविमळ जपति मनिं मौनी । नमन० ॥ ४ ॥
गुणचरित मुद्भरित नियत पढती जे
विविधपरिजननरिपुहनन महिमा जे ।
श्रवणपर सुजनवर परिसति सुकानीं । नमन० ॥ ५ ॥
श्रुतिवदन भणति असिपद भजनशीला
द्रुहिणमुख अमरपद बहुसुलभ त्यांला ।
ह्मणुनि घडि घडि घडति निरत शिवराणी । नमन० ॥ ६ ॥
अतिकरुणादिठि करुन निरखि मम माये
लघुतनय गतविनय तारिहि शुभकाये ।
सदय करि हृदय बरि धुरवुनि शिराणी । नमन ० ॥ ७ ॥
शरण तवचरणयुगविण अणिक कांहीं
मज अखिल भुवनिं सति गति दुसरि नाहीं ।
अज अचल अमृतघन वर्षसि कृपेनी । नमन० ॥ ८ ॥
जगजननिनुति अतुळपद जलजमाळा
धरिल नर सतत तरि परमपद त्याला ।
विमल मति दृढ करुनि विहित समजा जी
विनवि निजगुज सुजनि कविवर बनाजी ॥ ९ ॥
मालिनी–कुसुमशरसुवृत्तें निर्मिलें अष्टकातें
पढुनि नियत पावा इष्ट उत्कृष्ट हातें ।
चहुंविध पुरुषार्था पाववी भक्तिमंता
म्हणुनि अखिलवंद्या चिंतिजे आदिमाता ॥ १० ॥

## ८ श्रीगोदावरीमानसपूजा.

गंगे ! फुल्लसरोजसुंदरमुखी मीनाक्षिणी मंगळे !
बाहूपद्मलतायुते खगकुचे शैवालकेशाविले ।
पादद्वंद्वमराळयुग्म बरवें सर्वांग यादावळी
माते ! सद्द्रवरूपिणी भगवती मीं वंदितों माउली ॥ १ ॥
हो जागी ! जग हें विलोकन करीं वात्सल्य चित्तीं धरीं
ये माझ्या सदनासि सत्वरगती पूजा बरी स्वीकरीं ।
घे सिंहासन रत्नकांचनमयी श्रीगौतमी मंदिरीं
राहे सर्वसमृद्धिवत असिल्या पाद्यार्घ्य अंगीकरी ॥ २ ॥
घेयीं तूं मधुपर्क पावन बरें सद्धेमपात्रीं असे
घे पंचामृतही सुतोषमनसें स्नानार्थ मीं देतसे ।
घे शुद्धोदक मज्जनार्थ अमले ! नाना सुगंधें सती
आहे भावित सर्वतीर्थसलिलें मीं स्नापितों तूप्रती ॥ ३ ॥
घे पीतांबरयुग्म फार विलसे सत्कंचुकी साजिरी
नाना भूषणवर्गरत्नमय ते सर्वांगशोभा करी ।
मीं तूतें सति ! लेववीन पदकें ताटंकहारावळी
आई ! मंगळसूत्र धारण करी या कंबुसाम्यागळीं ॥ ४ ॥
माते ! दिव्य हरिद्रिकांगिकरि तूं जे स्वर्णपीता असे
भाळीं कुंकुम शोभवी अरुण हें सौभाग्यदायी असे ।
घेयीं हा पटवास सर्वसुरभीकस्तूरिकायें रजें
केला मिश्र जवादिकें सरवरें अर्पीन भावें निजें ॥ ५ ॥
घेयीं चंदन अष्टगंधयुत हें आहे स्वदेहीं धरीं
पाहे सुंदर भांग मीं भरितसें आरक्त या सेंदुरीं ।
नेत्रीं अंजन अंगिकार करि त गोदावरी माउली
पाहे दिव्य कटाक्षयुक्त मजला कीजे कृपासाउली ॥ ६ ॥
वेणीचे नगयुक्त विंचरुनिया घालीन वेणी शिरीं
हे नीलालक भाविले परिमळें स्नेहें महासुंदरी ।
जाळी हे तरि मस्तकीं मिरविजे तां माझिया आदरें
मुक्तामाणिकगुच्छयुक्त विलसे मानोनि घे सत्वरें ॥ ७ ॥

आर्यी ! कल्पसुमें विचित्र रचिले घे हार हे आवडीं
माझ्या अर्पण मीं तुतें करितसे हे प्रार्थना देवढी ।
पायीं मी तव अर्पितों अतिशयें आलक्तकें जावडें
तूझें पादसरोज शोभविन मी मातें असें आवडे ॥ ८ ॥
हे मंजीर सतीपदीं मिरविजे हे हंसही साजिरे
ज्याचा सध्वनि फार मंजुळ असा ब्रह्मांडगर्भी भरे ।
बोटीं या धरि जोडवीं अनवटें नाना विरोद्या फुलें
पोल्हारें झणकार फार करितीं शब्दें महाकोमलें ॥ ९ ॥
घेयीं धूप अनेकगंधनिवहीं आहे सती निर्मिला
श्रीखंडागरुगुग्गुलादिक रसें म्यां भक्तिनें अर्पिला ।
घेई दीप जगत्प्रकाश तुझिया तेजें तरी होतसे
ऐशाही अतुळप्रभेसि जननी ! हा दीप मी देतसे ॥ १० ॥
घे शाल्योदन दिव्यसूपयुत हें नानारसव्यंजनीं
शाखा सुंदर निर्मिल्या बहुविधा देती रुची भोजनीं ।
हे नानापरिचे सुभक्ष बरवे सभ्दोज्य लाडू खिरी
जेवीं रायपुरीसमेत रचिल्या नैवेद्य अंगीकरी ॥ ११ ॥
घेयीं दुग्धदधी सुलोणकढ हें हें आज्य हे जान्हवी
मायीं घे विविधापरी विरचिल्या म्यां माउली उत्सवीं
या कोशिंबिरिका अनेक रचिल्या देवी तुला तोषदा
मीं तों अर्पितसे स्वभक्तिविभवें संतृप्त तूं सर्वदा ॥ १२ ॥
घे शुद्धोदक फार शीतळ असें हे पाटलें चंपकें
यलोशीर सुगंधयुक्त विलसे म्यां भाविलें नेटकें ।
अंतःशीत करी तृषा परिहरी सर्वांग ही नीववी
आहे दिव्य सुधोपमान अमले ! भूतांसि हे जीववी ॥ १३ ॥
द्राक्षें आम्रफळें सजंबुफणसें अंजीर अक्रोट हीं
हे वा दाम खजूर दाडिमफळें सीताफळें मिष्ट हीं ।
इक्षूकर्दळिकासमेत बरव्या या श्रीफळा अर्पितों
हे अंगीकरि गौतमी ! अतिशयें मीं बाळ जें भावितों ॥ १४ ॥
घे तांबूल सुवर्णवर्ण असती हें नागवल्लीदळें
हें पूगीफळ युक्त दिव्यखदिरें चूर्णादिकें निर्मिलें ।

एला जाति लवंग कर्पुर अशा नानासुगंधें बरा
आहे युक्त म्हणोनि अंगिकरि तूं गंगे ! निवेदीं करा ॥ १५ ॥
मेरू मंदर दक्षिणा भगवती नानावनीं आकरीं
रत्नांच्या निकरीं समर्पण करी मीं, सर्व अंगीकरीं ।
सूर्येंदूपर तेज पूर्ण विलसे नीराजनें कोटिशा
मी दोवाळुनि गौतमी ! तव वपू पाहेन हे सयशा ॥ १६ ॥
नाना कल्पसुमें विचित्र रचिली पुष्पांजुळी स्वीकरीं
मी हें तूज प्रदक्षिणा करितसे त्रैलोक्यराजेश्वरी ।
घे साष्टांग अनेक वंदन करीं दंडापरी सर्वदां
मी तों दीन अनन्य किंकर तुझा आतां न सोडी पदा ॥ १७ ॥
माझे तों अपराध कोटिवरि ते होती निशींवासरीं
सारे सोसुनि बाळ मी म्हणुनियां स्नेहें स्वहस्तीं धरीं ।
तूं तों वाग्विषयातिदूर ! तुझिया स्तोत्रासि कैसा करूं
मीं तों मूढ म्हणोनि पादकमळा अच्छिन्नभावें स्मरूं ॥ १८ ॥
केले म्यां उपचार स्वल्प परि ते संपूर्ण घे मानुनी
देवी ! त्र्यंबकराजमस्तकमणी तूं तो जगत्पावनी ।
आतां क्षीरनिधीसमेत बरव्या सद्धेममंचावरी
माझ्या हृत्कमळाख्यमंदिरवरीं सानंद निद्रा करीं ॥ १९ ॥
पूजा हे रचिली **निरंजन** अशा नामें कवीनायकें
श्रीमन्माधवनंदनें नर यया भावें पढे आयके ।
तो पूजाफळ **पूर्ण** पाउनि वरी गोदावरीपादुका
पापीही परि मुक्तियोग्य घडतो सद्भक्त हो ! आयका ॥ २० ॥
हे पूजा यशपुत्रलाभधन दे सत्कीर्ति दे मान्यता
या लोकीं सकळार्थसिद्धिफळ तें पावे पहा आयिता ।
स्वर्गीं भोगुनियां अनेक सुख तें सेखीं हरीच्या पदा
पावे साधक हें **प्रमाण** कथितों सद्भाविकां सर्वदा ॥ २१ ॥

इति श्रीनिरंजनमाधव**योगीविरचित** श्री गोदावरीमानसपूजा समाप्ता ॥

संपूर्ण श्रीसुंदरकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीरस्तु ॥ शुभमस्तु ॥

---

## ९ श्रीभागीरथीस्तोत्र.

विष्णूच्या पादपद्मीं वससि शिवजटेमाजि तूं देवगंगे
ब्रह्माच्या तोयपात्रीं विलससि अमले मृत्युसंसारभंगे ।
स्वर्गीं मंदाकिनी तूं म्हणविसि धरणीमाजि भागीरथी तूं
पाताळीं तुज भोगावति म्हणति शिवे ! तूं जगा मुक्तिहेतू ॥ १ ॥

तीघां देवां त्रिलोकां तुजविण दुसरी भूषवाया असेना
उद्धाराया जगातें तुजसम अणखी साच कोणी दिसेना ।
यासाठीं देव तेही पितृगण समुदें ते ऋषी दीर्घदर्शी
तुझ्या तीरींच सारे निवसति अमये ! सर्वदा पूर्णहर्षीं ॥ २ ॥

चर्माचीं वसनें जटा मिरवणें प्रेतावनीं राहणें
सर्वांगीं शवभस्म शुभ्र धरणें भिक्षान्न तें भक्षणें ।
भूतांसीं सहवास नित्य करणें मत्तापरी नाचणें
ऐसा ही शिव जाहला शिव शिवे ! त्वत्तोयसंधारणें ॥ ३ ॥

कित्ती ते खग ते किती फणिपती तें पीतवस्त्रें किती
कीत्ती कौस्तुभशंख अंबुजगदा चक्रायुधें तें किती ।
त्वत्तोयीं तुझिया तिरीं तनु किती गंगेजळीं मज्जती
ते जंतु शुभलक्षणें दृढ अशीं घेऊनियां उठती ॥ ४ ॥

गंगे ! मंगळरूपिणी तव जळीं आश्चर्य म्यां देखिलें
स्नानार्थीं उदरीं प्रवेश करितां या मानवां लाधलें ।
कंठीं नीळ शरीर शुभ्र निडळीं अग्नी गळां वासुकी
वामांगीं अबळा वृषासन करीं खट्वांग ये कौतुकीं ॥ ५ ॥

अंबे ! हें तव तोय चित्र विलसे वाचे नये बोलतां
केलें स्नान तयासि म्यां निराखिलें होतां असें तत्वता ।
अर्धांगीं स्तन हेमवर्ण नयनीं फुल्लाब्ज वेणी शिरीं
अर्धांगीं शशिगौर नीळगळ तो भालाक्ष मुंडें धरी ॥ ६ ॥

गंगे ! निर्मळशंबरांत तुझिया ऐसें कसें उद्भवे
एकांगीं घननीळ हेमवसनें चक्रांबुजें गौरवे ।
एकांगीं शशिखंडभूषित दिसे प्रालेयगौराकृती
स्नानें प्राणिगणासि साच वरितें हें रूप कैचें सती ॥ ७ ॥

होतों मत्त मतंग मीं वृषभ मीं मार्जार मीं श्वान मीं
होतों ग्रामवराह काक बक मीं गोमायु मानुष्य मीं ।
त्वत्तीरीं निधनासि पाउनि असे भागीरथी जे नवे
झाले शंकर तोषयुक्त वदती अन्योन्य ते आवघे ॥ ८ ॥
त्र्यैलोक्येश्वरि जान्हवी ! तव तटीं प्राणी लया पावले
तेही श्वानशृगालवायसगणीं वोढोनियां भक्षिले ।
ते गेले विधिच्या पदा मणिमयीं सत्पुष्पकीं शोभले
देवीसीं रमले सुराप्सरगणीं विद्याधरीं गायिले ॥ ९ ॥
क्षेत्रीं जे समरांगणीं निवटती कीं योगवेत्ते यती
जाती भेदुनि सूर्यमंडळ अशी वाहे निशाणें श्रुती ।
अंबे ! त्वज्जळसाम्यता न पवती संग्रामयोगास्थिती
प्राणी सेवन बिंदुमात्र करिती वैकुंठ ते पावती ॥ १० ॥
त्वत्तोयीं जरि स्वल्प कीकस पडे पापी कृती तो घडे
तो देवेंद्रपदा चढे सुरवधूसंभोग त्या आतुडे ।
जो तूझ्या सलिलीं बुडे त्रिषवणीं साष्टांग पायां पडे
पूजी प्रेमदृढें शिवे ! तरि तया कां मुक्ति येना पुढें ॥ ११ ॥
स्वर्गंगे ! तुझिया जळीं सुरसती येती सदा मज्जना
तद्वक्षोरुहकुंभकुंकुमरजें ये पीतता जीवना ।
तेथें स्नान करोनि पूत घडती या मानवांचीं गणें
जाती कोटिकुळांसमेत हरिच्या सच्चित्पदाकारणें ॥ १२ ॥
व्याघ्रीक्रूरजरामुखीं चघळिले रोगानळें भर्जिले
नानादुःखविपत्तिदुष्कृतमहावैरीगणीं तर्जिले ।
ते तूझ्या पुलिनांगणीं भगवती ! पंचत्व जैं पावले
झाले ते तरणे नवे सुरवधूचित्ता हरूं लागले ॥ १३ ॥
यज्ञातें करणें तपानुचरणें ऐंद्री पुरी पावणें
पुण्यांतीं पतनें पुन्हां जननिच्या गर्भालयीं कष्टणें ।
हें सारें जनबोलणें तंव असें भागीरथी मीं म्हणें
जों नाहीं तव तोयपान घडलें या मानवाकारणें ॥ १४ ॥
हो कां तो यमदंड दुर्धर तसे तद्दूत भीषाकृती
हो कां वैतरणी सुदुस्तर अशी पत्रें वनेंही अती ।

कुंभीपाकमुखादि रौरव महा या यातनाही तरी
गंगे ! त्वज्जलबिंदुमात्र जठरीं ना प्राशिला तोंवरी ॥ १५ ॥
काशाला अमरीपुरी सुखकरी कैलास काशा गिरी
कां जावें हरिमंदिरीं वसतिला भागीरथी शंकरी ।
त्वत्तोयीं शफरीकुलीरमकरीमंडूकता ते बरी
नेच्छीं मी दुसरी कदा गति सरिन्नाथे ! नमो सुंदरी ! ॥ १६ ॥
झाला अंनकदंड पुंडरिकसा ते पाश झालीं बिसें
झाले ते यमदूतहीं बुजवणें शेतीं तृणाचें जसें ।
तो मित्रात्मज मित्र होउनि पुढें ये जान्हवीदर्शना
त्वत्तीरीं क्षणमात्र राहुनि सुखें जे सेविती जीवना ॥ १७ ॥
झालें कीं मरणेंचि मंगळ तुझ्या तोयार्द्रदेहा जना
झालें जीवन धन्य तें तव तटीं वस्ती जया पावना ।
स्वर्गातें तृण मानितात तुझिया गंगामृता पीउनी
येथें काय विशेष सांग करणें लोकांतरा जाउनी ॥ १८ ॥
विष्णू हो शिव हो विरंचिपद हो भागीरथी तूं विना
जे कां मानिति थोर त्या गति नसे मायांधका दुर्जना ।
त्वत्तोयीं करितांचि मज्जन तयां ईशत्व ये तत्क्षणीं
आयी सागरनायिके ! न मनतीं मातें वृथा बोलणीं ॥ १९ ॥
वांचें एक भगीरथें स्वपितरां मोक्षासि नेलें सती
गोहन्या मुनिगौतमें निरसिली एकाप्रवाहें क्षिती ।
ते अद्यापि अनंतकोटिपितरां मोक्षार्थ संपादिती
पापी या कलिचे अनेकपरिचीं ते पातकें क्षाळिती ॥ २० ॥
गंगागंगा म्हणोनी जपति जरि मुखें अंत्यजांत प्रतोषें
गांवें लक्षावधीही वसुनि सुमनसें त्यांसिं तें होय ऐसें ।
जे तुझे तीरवासी लभति पद तशा सत्पदालागिं जाती
तेही तूझ्या कृपेनें हिमगिरितनये ! श्रेष्ठजाती विजाती ॥ २१ ॥
येतां म्लेंच्छपुलिंद भिल्लशबरां त्या धीवरां अंत्यजां
त्वत्तीरीं जळसेवनार्थ अथवा हिंसार्थ हो तोयजां ।
तेही पावति सद्गतीस तुझिया गंगामृतस्पर्शनें
ताराया तुजला निवाड सहसा नाहींच हें मी म्हणे ॥ २२ ॥

तूतें हा जन दूर राहुनि भजो तीरासि येवो सती
तोयीं मज्जन आचरो उदक हें सेवोच भागीरथी ।
त्यागो देह तुझ्या सुरम्यपुलिनीं नेसील मुक्तीप्रती
नाहीं ते यमभीति या कलिजना तूं वर्ततां या क्षिती ॥ २३ ॥
कृष्णा हो भयमोचनी भवहरा हो भीमरा सर्वदा
कावेरी कलिनाशना तरि असो ते नर्मदा शर्मदा ।
एकांशासि तुझ्या तरी न पवती कोटींत भागीरथी
त्यातें तूं करितेसि पावन जळीं राहोनि त्यांच्या सती ॥ २४ ॥
तूं तों विष्णुपदी तुला नर नदी सामान्य जे भाविती
त्यातें ते यमदूत बांधुनि महा दुर्यातना दाविती ।
ते होती शत जन्म कोलकुतरे गोमायु गोपुच्छहीं
होती कुक्कुट काक कंक खर ते ना सूटका त्या कहीं ॥ २५ ॥
तूं ब्रह्मद्रवरूपिणी अजहरां त वंद्य नारायणी
तूं सर्वेश्वरशक्ति सर्वघटणी मायामळक्षाळणी ।
तूं जीवांस शिवस्वरूपकरणी संतापसंहारिणी
तूं भागीरथि ! शंभुमरतकमणी त्रैलोक्यसंतारिणी ॥ २६ ॥
आतां या कलिच्या जना भय नसे येतां तुझ्या दर्शना
जातीं पाउलपाउलीं अघगणें नासोनि सर्वात्मना ।
तूझ्या या अमृतोपमानसलिला आलोकितां वंदितां
येतें पुण्य शताश्वमेधकृत तें आपामरां सर्वथा ॥ २७ ॥
आहेता सरिता उदंड सरितानाथासि कांता प्रिया
श्रीहैमाचलपुत्रिके ! तव तुला कैं पावती वो तिया ।
एक्या बिंदुजळेंचि विष्णुपदवी पाप्यांसिही अर्पिसी
तूझें नाम सकृत् जपे तरि तया सौख्यार्णवीं ठेविसी ॥ २८ ॥
आम्हां केवळ आळशां निरखितां सत्कर्महीनां जडां
मायामोहमदाभिमानकलुषां अज्ञानवंतां मुढां ।
तूं तो दीनदयाळ तारक जना या भूमिलोकाप्रती
माये ! आलिस सत्य जाण अमुच्या भाग्येंचि भागीरथी ॥ २९ ॥
निःश्रेणी तरि तूंचि मोक्ष उपरी ! पावावया या जना
तूं विश्रांति निजानुभूतिसुखदा होसी सदा सन्मना ।

संन्यासी निजवस्तुचिंतनबळें धामासि ज्या पावती
अंबे ! त्वज्जळसेवनें अबुधहीं तद्रूपता लाहती ॥ ३० ॥
देवि ! त्वत्तटमृत्तिकेसि समते येनाच चिंतामणी
भाळीं भूषवितां भवाप हरुनी देते भवत्वा जनीं ।
मात्रा हे तरि मृत्युपाशशमनीं मंदासि मंदाकिनी
मोक्षाची घटका म्हणोनि सहसा मीं वंदितों सन्मनी ॥ ३१ ॥
त्वत्तीरास्थितमृत्तिकोर्ध्वतिलकें त्वद्ध्याननिष्टामनें
कंठीं श्रीतुळसीस्रजें हरिपदांभोजार्पितें पावनें ।
ऐसे हे तव भक्त शोभति सती ! प्राणप्रयाणोत्सवीं
ते झाले अतिधन्यमान्य जगतीं ते जन्मले मानवीं ॥ ३२ ॥
तूझें जें पररूपचिंतन किजे निर्नामरूपात्मजें
सच्चिन्मात्र सुखस्वरूप भरलें विश्वांतरीं पूर्ण जें ।
हें तूझें द्रवरूप तारक जना प्रत्यक्ष भागीरथी
तूं आहेसि जडांसि निर्गुणपदा नेणार तूं सारथी ॥ ३३ ॥
फुल्लांभोरुहवक्रनीळनळिनें केशावळी साजिरी
नेत्रें तें शफरी सुबाहुलहरी वेणीगणभ्रामरी ।
सद्वक्षोरुह चक्रवाकयुगळें सर्वांग यादावळी
ऐसी सुंदर मूर्ति मंडित दिसे भागीरथी भूतळीं ॥ ३४ ॥
जे तूतें पुजितात्ति भाविक तया तूं माउली पूजिसी
जे तूझ्या चरणासि लागति तयां पायांसि तूं लागसी ।
भाळीं अग्निशिखा तुझ्या विरचिती तद्भाळ देशीं शिखी
तूंही ठेविसि या जगीं प्रतिकृती नाहींच तूं सारिखी ॥ ३५ ॥
तूझें जें हरितात्ति पंक मनुजीं तत्पंक तूं वारिसी
तूझा जे जळवोघ भेदिति तयां पापौघ तूं भेदिसी ।
गातां श्लोक तुझे यथार्थ करिसी सुश्लोक तेही जनीं
नाहीं तूसम ते कृतप्रतिकृती म्यां देखिलें लोचनीं ॥ ३६ ॥
त्वत्तीरीं नीरमात्राशन करुनि सुखी राहिजे देवगंगे
अन्यत्रीं भूपतित्वा लभुनि सरस तें मिष्ट शाल्यन्न नेघे ।
तूझ्या दिव्यामृतातें अशन करुनियां जायिजे मुक्तिधामा
राज्यांतीं दीर्घदुःखें शमन पुरवरीं भोगिती ज्या न सीमा ॥ ३७ ॥

शंभू हो हरि हो चतुर्मुख असो देवेंद्र हो जान्हवी
तूझ्या या करणीस साम्य न पवे कोणी तरी या भवीं ।
ते देती पद आपुलेचि भजकां तूं सर्व त्यांचीं पदें
देसी एकपळांत त्वन्नतजना ते नेच्छितां ही मुदें ॥ ३८ ॥
तूं माझी जननी यथार्थ असती भागीरथीनामिका
तूं तों माधववल्लभा म्हणविसी लोकत्रयव्यापिका ।
मीं तों दीन असें स्तनंधय तुझा तूं क्षीर पाजी मला
माझ्या पूर्ण करीं मनोरथफळां तूं अंतरीं कोमला ॥ ३९ ॥
त्रैलोक्येश्वरसंपदा मज नसो शर्वत्व विष्णुत्वही
तूझ्या तीरसमीप पामर तरी होवोनि राहे मही ।
ऐसें दे पद रंक केवळ जनीं त्याहोनि सानें करीं
देई तूं पदभक्ति मात्र वरदे हस्ताब्ज ठेवीं शिरीं ॥ ४० ॥
मी तों स्तोत्र तुझें तरी करुं कसा जाणेन एका मुखें
झाले वेद सुरेंद्र शेष असल्या वर्णावया ना टके ।
सर्वांहीं निगमागमीं तव कथा व्यापोनि जे ऊरली
ते आली सरितामिसें क्षितिजना तारावया माउली ॥ ४१ ॥
मातें वेद नको न शास्त्रपठणें ते सत्क्रिया ही नसो
किंवा मुख्य धरामरत्व शतशा जन्मांत देऊं नको ।
दे तूझा तटवास मात्र सरितानाथे दयासागरे
तेणें मी न गणीन सर्व विबुधां हें मात्र मातें पुरे ॥ ४२ ॥
मी मूढाहुनि मूढ जाण विषयी पापी अकर्मी जनी
नाहीं आवडिही मला शिवरमानाथाचिया पूजनीं ।
माते ! एक तुझ्या धरोनि पदरा शार्दूलविक्रीडिता
काळातें न गणोनि निश्चित असें भक्तापरीं तत्वता ॥ ४३ ॥
केलें स्तोत्र यथामती भगवती ! ते अंगिकारीं बरी
येणें जे स्तवितील तूज करुणापांगें तयां स्वीकरी ।
दे सर्वार्थ तयासि इच्छित असे प्रार्थी **बनाजी** कवी
मातें ठेवि तुझ्या निरंजनपदीं ब्राह्मीं महावैभवीं ॥ ४४ ॥

इतिश्री **योगी**निरंजनमाधवविरचितं भागीरथीस्तोत्रं संपूर्णं ।

श्रीसद्गुरु सुंदरकृष्णार्पणमस्तु ॥

---

## १० सांबशिवस्तुतिध्यान.

वृत्त—शार्दूलविक्रीडित.

ॐश्रीमद्दक्षिणामूर्तिगुरुभ्यो नमः श्रीवासुदेवाय नमः ।

श्रीमद्भैरव भूतनाथ भगवन् भर्गा भवानीपती
भोगींद्राभरणा भवाभवभयच्छेदा सुभव्याकृती ।
भीमाभर्म गिरीश भूतिनिलया भस्मांगरागप्रिया
भालाक्षा भ्रमनाशका तुज नमो भक्तार्तिहा स्वामिया ॥ १ ॥
कैलासाचल वंदितो कलिमल ध्वंसावयाकारणें
जेथें सुंदर कल्पपादपवनें तें शोभतीं पावनें ।
चिंतारत्नशिलामला विसलती त्रैलोक्यचिंताहरा
तेथें मीं नमितों स्वभक्तिमनसें न्यग्रोधवृक्षेश्वरा ॥ २ ॥
वेदीं वेदनुता विचित्र विलसे वज्रोपलें निर्मिलीं
वैडूर्यें विमलें विशेष रचिलीं सोपानमाला भली ।
वापी दिव्यसुधोपमान सलिलें शोभे जया सन्निधी
पद्में फुल्लसुवर्णकेशरयुतें जीमाजि कोल्ह्यावधी ॥ ३ ॥
द्वारीं पद्मक शंखमुख्य नवही स्यां तें निधी वंदिले
तेथें दिक्पति अष्ट अष्टककुभें सन्नद्ध ते पूजिले ।
गंधर्वादिक सिद्ध किन्नर तशा त्या अप्सरासुंदरी
रंभा ऊर्वशि मेनकादि करिती गानें महासुस्वरीं ॥ ४ ॥
जेथें नारदतुंबरादिक उभे सानंद वीणा करीं
गाती सुस्वर सामगान सवनें सानंदले अंतरीं ।
जेथें सिद्ध शुकादि मुक्त वसती व्यासादि सारे ऋषी
मार्कंडेयकुमारमुख्य नमिले दिव्यौघ सन्मानसीं ॥ ५ ॥
जेथें रावणबाणमुख्य गण ते चंडीश नंदीश ते ।
हातीं कांचनदंड तिष्टति महाद्वारीं सदा धीर ते
पाहे मीं प्रमथादिभूतगणहीं वेताळमात्रावळी
तेहीं सायुधवाहनें विसलती स्यां वंदिले त्या स्थळीं ॥ ६ ॥
श्रीमद्भास्कर दिव्यरूपधर हा रश्मीसहस्रें बरा
जो कां सर्वदिशा प्रकाशित करी दे दृष्टि निद्रातुरां ।

त्रैमूर्त्यात्मक कर्मकारण विभू सृष्ट्यादि लीला स्रजी
म्यां भावें नमिला ग्रहाधिप असा संबद्धहस्तांबुजीं ॥ ७ ॥
ब्रह्माणीसह बद्धपाणिपुटकें ब्रह्मा उभा सन्मुखीं
स्तोत्रें तोषवितो शिवा श्रुति शिरें वर्णोनि चारीं मुखीं ।
हंसारूढ कमंडलाक्षवटिकासंयुक्त दृष्टांतरें
विज्ञानांबुधि आदिदैवतगणा म्यां वंदिला सादरें ॥ ८ ॥

लक्ष्मीकांत खगेंद्रवाहन पुढें तिष्ठें सदा सांवळा
कंदर्पायुत सुंदराकृति दिसे देवेश सर्वांगळा ।
हस्तीं अंबुजशंखचक्र बरवीं कौमोदकी सुंदरी
कंठीं कौस्तुभरत्न दिव्य मिरवीं म्यां वंदिला श्रीहरी ॥ ९ ॥

जो साक्षाद्वृषरूप धर्म विलसे सानंद नंदी पुढें
जैसा तो स्फटिकाद्रि उन्नत महाशृंगें मना आवडे ।
घंटा किंकिणिका गळां विसलती सेंव्या पदीं नूपुरें
दों कर्णीं चवरें विराजति असा म्यां वंदिला सादरें ॥ १० ॥

तिष्ठे श्रीगणराज कुंजरमुखें जो विघ्नहर्त्ता विभू
सिंदूरारुण अंगराग मिरवे सर्वायुधांसी प्रभु ।
भाळीं चंद्रकळा भुजंगम गळां जो उंदिरीं शोभला
भक्ताभीष्ट समस्तही पुरविता चिंतामणी वंदिला ॥ ११ ॥

साक्षाच्छंकरपुत्र षण्मुख पुढें मातापिता तोषवी
बालादित्यसमप्रभाव विलसे लीला स्वयें दाखवी ।
सेनानी शिखिराजवाहन पहा सच्छक्ति शोभे करीं
क्रौंचारी अभिवंदिला निजहिता चिंतोनि म्यां अंतरीं ॥ १२ ॥

श्रीसिंहासन कोटिभास्करकळानाथापरी भासतें
नक्षत्रासम मौक्तिकस्रजयुतें सन्मंटपें शोभतें ।
पाहा! रत्नवितान हें विलसतें मांजिष्टवर्णोवरीं
तें म्यां वंदियलें अभीष्ट फळ दे भक्तांसि सर्वांपरी ॥ १३ ॥

तेथें आसन रक्तकंबळ महाचित्रें विचित्राकृती
पाहा ! त्यावरि पद्मकोमळदळें दाहा शतें शोभती ।
वामांकीं गिरिजासमेत निवसे शंभू जगाचा धणी
तो म्यां सुंदर वंदिला अभय दे भक्तांसि देवाग्रणी ॥ १४ ॥

देवी सुंदर पर्वतेंद्रदुहिता नामें उमा शंकरी
कामाक्षी कमलानना भगवती जे सर्वभूतेश्वरी
नानारत्नविभूषणीं विलसलीं दाळिंबपुष्पांपरी
झगा बारिक नेसली कुचतटीं ते कंचुकी साजिरी ॥ १५ ॥
माथां नीलगुडालकें मिरवतीं रोलंबपङ्क्तीवरी
मध्यें गल्लकपंक्ति रम्य विलसे अत्यंतशोभाकरी ।
नेहीं सिंदुररेघ सुंदर दिसे संयुक्त मुक्तास्रजें
भाळीं भांगटिळा विचित्र झळके साम्यासि येना दुजें ॥ १६ ॥
वेणी रम्य विराजली नवमणिश्रेणीगणीं शोभली
त्यांतीं त्यावरि कल्पपादपसुमें सन्मौक्तिकें निर्मिली ।
भाळीं ते शिसफूलचंद्र मिरवे अर्धेंदुखंडापरी
नक्षत्रासम भोंवती विकसलीं मुक्ताफळें साजिरीं ॥ १७ ॥
शोभे अष्टमिच्या शशांकसम तें सद्भाळ हें त्यावरी
साजे हा मृगनाभिबिंदु बरवा पाहा कळंकापरी ।
कामाच्या धनुषाकृती विलसती त्या भोंवया साजिऱ्या
नाराचापरि पक्ष्मपंक्ति दिसती अत्यंत या गोजिऱ्या ॥ १८ ॥
नीलांभोजसमान नेत्रयुगळें आधींच होतीं बरीं
पाहा त्यावरि अंजनें कृत दिसे शोभा अनंतापरी ।
बाणानें गरळेंचि माखुनि जसें त्या मन्मथें ठेविलें
शंभूच्या हृदयारविंददळणा शस्त्रासि या निर्मिलें ॥ १९ ॥
पाहे भक्तजना कृपार्द्रनयनें कूर्मी जसी बाळका
हेही त्याचपरी त्रिलोकजननी अंबा जगत्पाळका ।
कारुण्यामृतवृष्टि वर्षण करी या दृष्टिधारा घनीं
लोकानुग्रहकारणी भगवती माहेश्वरी पावनी ॥ २० ॥
आकर्णांत विशाल रम्य दिसती भावें अनेकापरी
संपूर्णानन चंद्र त्यावरि दिसे हे चित्रशोभा बरी ।
सौंदर्यांबुधिमाजि शुक्तिशकलें हे श्रोत्रयुग्में बरीं
मध्यें मुक्तमणी ययांत दिसती बाळ्या फुलें साजिरीं ॥ २१ ॥
रत्नाच्या बुगड्या अपूर्व रचिल्या तें भोंकरें सोज्वळें
हीरे चंद्रसमान ते मिरवती ताराकृती केवळें ।

ताटंके मणिमंडितें विलसतीं सद्रत्नकर्णद्वयीं
कामाचा रथ वक्रपंकज तया चक्रें तशीं निश्चयें ॥ २२ ॥
आधीं नासिक कीरतुंडसम हें कीं नीट चांपेकळी
किंवा हें तिळपुष्प काय ह्मणिजे शोभा दिसे आगळी ।
तेही बेसरयुक्त फार मिरवे त्या ओष्टबिंबावरी
मुक्तामाणिकहेममिश्रित दिसे देवेंद्रचापापरी ॥ २३ ॥
आधी वोष्ट सुसूक्ष्म पल्लव तसे तांबूलरागें अती
झाले शोण अतीव हे विलसती बंधूकपुष्पाकृती ।
मध्यें दाडिमबीजपंक्तिसम ते दंतावळी शोभली
किंवा मौक्तिकपंक्ति वक्त्रकमळीं उत्पन्न हे जाहली ॥ २४ ॥
शोभे हे अतिमंदहास्य वदनीं अंतस्थमुक्तप्रभा
साम्यें शुभ्र अतीव हे विलसतें अन्योपमा दुर्लभा ।
माणिक्योत्तम कंदुकासम पहा साजे कपोलाकृती
किंवा पंचशरें पिधान रचिलें तारुण्यरत्नाप्रती ॥ २५ ॥
लावण्यामृतपात्र कीं चुबुक हे लावण्यपेटी हनू
मुद्रा गोंधुनि मन्मथें विरचिली ऐसेंचि आम्हीं गणूं ।
किंवा श्रीमुख आरसा चुबुक हें दांडी तयाची वरी
पाहावें जरि वाटतें शशिधराहस्तें ययातें धरी ॥ २६ ॥
वाणी हे पिकनायकाकलसमा माधुर्यदा शोभली
रेखा कंठगता विचित्र विलसे जे कां त्रिभागें भली ।
किंवा हे अमृतौषधी शुभलता ग्रीवेसि वेष्टीतसे
कंदर्पज्वरतप्त शंकर तया सौख्यप्रदा होतसे ॥ २७ ॥
बाहू कोमल हेचि नाळकमळें पाणीतळें शोभती
पांकोळ्यासम अंगुळी विलसती हस्ताब्ज कोशाकृती ।
चुंबाया नळिनीस चंद्र बहुधारूपें धरी ज्यापरी
तैसीं हे नखचंद्रपंक्ति उजळी दाही दिशा सुंदरी ॥ २८ ॥
केयूरें वलयें विचित्र परिचीं तें भूषणें शोभतीं
रत्नाच्या विविधापरी विरचिल्या सन्मुद्रिका साजती ।
आलक्तें अतिरंगिले दिसति ते बालारुणाचे परी
भक्ताचे परिकल्पितार्थ उदया हे आणिती सत्वरी ॥ २९ ॥

वक्षीं बाळकरींद्र कुंभसमता वक्षोज हे शोभती
किंवा हे कनकाचलात्मज भयें इंद्राचिया राहती ।
ज्याचें गोपन हें करी स्वपदरीं झांकोनि अत्यादरें
कैसें या शरणागतासि त्यजिजे ऐशा कृपेच्या भरें ॥ ३० ॥
किंवा हे घटकांचनीं भरुनियां पीयूष देवाधिपें
आहे ठेवियलें असेंचि दिसतें पाहा महासाक्षपें ।
जैं हालाहळतप्त शंकर घडे तैं या कुचालिंगनीं
व्हावी शांति ह्मणोनि निश्चित असें वाटे कवीच्या मनीं ॥ ३१ ॥
किंवा सूर्यशशांकमंडलयुगें राहूभयें ये स्थळीं
आली कीं वसतीस काय न कळे राहावया निश्चळीं ।
पाहा ! हो शिवहृत्सरोज विकसे ज्यातें दिठीं देखतां
किंवा नेत्रचकोर तृप्त घडती नोहे वृथा हे कथा ॥ ३२ ॥
नाना तें पदकें अमोलमणिचीं मुक्ताफळांच्या स्रजें
केले भूषित कुंकुमाक्तमकरीं पत्रें यया चित्रिजे ।
कीं हे मन्मथसंगरीं रणधुरे जाणोनि धाता यया
ठेवी साच पुढें करोनि बरवें काठिण्य देखोनियां ॥ ३३ ॥
यातें वेष्टितसे सदा भगवती रत्नाचिये कंचुकीं
हे तों मन्मथकोशरक्षण किजे ऐशापरी कौतुकीं ।
या अत्यंतकृषोदरीं त्रिवळिका पाहा ! कशा शोभती
जैसा रोमलतेसि मंडप दिजे पावावया उन्नती ॥ ३४ ॥
नाभी हा अतिनिम्नकाय ह्मणिजे हे तों सुधावापिका
जेव्हां मन्मथभंग होत समरीं येथें घडे जीविका ।
नोहे हे शिखिकुंड धूम्र उठिला रोमावळीच्या मिसें
कामी होमिति ये स्थळीं नियत तें हव्यें तशीं मानसें ॥ ३५ ॥
पाहा ! हा कटि सूक्ष्म फार मिरवे पंचास्यमध्यापरी
किंवा हे तरि विश्वकर्मपुतळी निर्मोनि मुष्टी धरी ।
तेव्हां बारिक माज साच घडला मुष्टींत हा मातसे
नाहीं अन्य कदापि यासि उपमा याची ययाला असे ॥ ३६ ॥
पाहा स्थूळ नितंब वाटति मला मातंगगंडस्थळें
येथें सिंहभया त्यजोनि असती आंगीं इच्या निश्चळें ।

रंभास्तंभसमान हे जड कवी ऊरुद्वया मानिती
हे ऐरावतपोतशुंड परि हे सन्मार्दवें शोभती ॥ ३७ ॥
जानू रत्नकरंडमंडित महा साजे पिधानापरी
देवीं सौष्ठव तें हरोनि भरिलें भांडार या भीतरी ।
जाणों वासवगोपवर्ण रचिल्या सत्कामतूणीरशा
जंघा शोभति मंगळप्रद्जना देती सदां सद्यशा ॥ ३८ ॥
घोटे तों कुरुविंदपाटल तसे वर्णें बरे साजती
टांचा पद्मपलाशविद्रुम तशा संध्यारुणा जिंतिती ।
कूर्मांगाहुनि उच्चता धरिति ते पादांबुजाचे कळे
श्रीचे हे सुखधाम होउनि कसे लोकत्रयीं शोभले ॥ ३९ ॥
किंवा बालशशांक हे उगवले दाहा कसे एकदां
तैसी ते नखकांति दिव्य मिरवे पादांगुळांतीं सदा ।
किंवा हे भगिनीवियोगविरहें संक्षीणता पावले
सत्प्रेमाकुल एकदांचि दशधा रूपें तिला भेटले ॥ ४० ॥
वज्राब्जांकुशऊर्ध्वरेखसहितें चिन्हें पदीं शोभतीं
त्रैलोक्येश्वरनायका म्हणुनियां लोकत्रयीं दाविति ।
शंभूचें मन मोहिते पर शिवा सौंदर्य ऐसें धरी
ईची काय तुला घडेल वनिता वर्णावया दूसरी ॥ ४१ ॥
लावण्यांबुधिमाजि हा उपजला संपूर्ण तारापती
अंबेचें मुख हा घडोनि जगतीं पावे महाउन्नती ।
लक्ष्मी तों वदनारविंदभुवनीं राहे सदा सुंदरी
राहे दिव्यसुधा करोनि वसती या रम्य वोष्ठांतरीं ॥ ४२ ॥
शोभे कार्मुक भ्रूलता घडुनियां हे कामधेनू दिठी
दोर्वल्ली घडली सुकल्पलतिका सद्बांधवांची मिठी ।
याचा सोदर कंबु घेउनि असे हा दिव्यकंठाकृती
क्षीराब्धीतनुजास मुख्य पदवी हे साधिली निश्चितीं ॥ ४३ ॥
मातंगीगमनांगिकार करुनी राहे पदीं शाश्वतीं
रंभा हे उरुयुग्म साच घडली देखों तदीयाकृती ।
चिंतारत्नमणी इच्या पदनखीं पाहा सदां राहिला
त्याचा दिव्यमहाप्रभाव समुद्या भक्तीं असे पाहिला ॥ ४४ ॥

लज्जा कंधर नम्रता धरितसे उच्चैःश्रवाचे परी
देवी हे तरि पारिजातकुसुमामोदासि देहीं धरीं ।
संसारामयनाशनी घडतसे प्रत्यक्ष धन्वंतरी
अश्रद्धापर दुष्टकामिकमना मोही सुरेच्या परी ॥ ४५ ॥
अज्ञानांधजनार्थ हे धरितसे सत्काळकूटक्रिया
मृत्यूपासुनि मृत्यु पावविं करी हें सज्जनातें दया ।
ऐसा रत्नसमूह सर्वहि जिच्या आंगींच राहे सुखें
झाली हे शिववल्लभा म्हणुनियां गाती श्रुती हे मुखें ॥ ४६ ॥
ऐसें सुंदर साहजीक विलसे हें रूप लोकोत्तरीं
याहीनाजि विशेष भूषण गणी अत्युन्नतीतें वरी ।
केयूरें वलयें अनेक परिचीं जांबूनदें माणकें
मुद्राहार गळां सरत्नपदकें संवेष्टिलीं मौक्तिकें ॥ ४७ ॥
ऐशी हे हिमशैलजा विलसली जैशी लता कांचनी
किंवा हे चपलत्व टाकुनि धरी सन्मूर्ति सौदामिनी ।
श्रीकंठांकमहासनीं मिरवली त्रैलोक्यराजेश्वरी
ते म्यां सादर वंदिली भवहरा अंबा महासुंदरी ॥ ४८ ॥
आतां शंकर वंदितों सुरनरू भक्तार्तिसंहारिता
ज्यातें वेष्टितसे सदा भगवतीदाक्षायणी चिल्लता ।
विश्वाभीष्टफलप्रदानकरणीं उद्युक्त जो सर्वदा
जो कां दीनजनावनीं विमुखता घेवोंचि नेणे कदा ॥ ४९ ॥
कर्पूराद्रिसमानगौर विलसे चिन्मात्र दिव्याकृती
किंवा हा शरदभ्र शुभ्र मिरवे रूपें यया निश्चितीं ।
वामांकीं विलसे यया गिरिसुता नैश्चल्यसौदामिनी
प्रालेयाचलअंकमंडित जशी सानंद मंदाकिनी ॥ ५० ॥
माथां दिव्यजटासुवर्णरुचिरा या राजती सुंदरा
बालादित्यकळा जशा मिरविती मूर्ध्नीं महामंदरा ।
तेथें दिव्यशशांकखंड विलसे ते पुंडरीकाकृती
जें कां शोभविते मला गमतसे गंगाबुरोधाप्रती ॥ ५१ ॥
ते विस्तीर्ण कपाल फाराचि दिसे रेखा अनेका धरी
मध्यें पावकनेत्र तो विलसतो शोभा दिसे साजिरी ।

क्षीराब्धीलहरींत युक्त दिसतो और्वाग्नि संदीपला
येणें कामपतंग दुर्धर महा तात्काळ विध्वंसिला ॥ ५२ ॥
हें आस्यांबुज पुंडरीक वरित्या भृंगावळी देवढी
भ्रूयुग्में अतिनीळ ते विकसली पाहों अह्मीं आवडी ।
हा रातोत्पळपत्रताम्रनयनें भक्तार्तितापा हरी
कारुण्यामृतवृष्टि पूर्ण अपुल्या अंतःप्रसादें करी ॥ ५३ ॥
शोभे सुंदर नाशिका तिळसुमा चिंतोनियां नेटकी
किंवा तें शकतुंड नीट ह्मणती त्यातें प्रभावें ठकी ।
विश्वोत्पत्तिकसूत्र काय धरिलें देवें स्वनासामिसें
हा विश्वस्रज आपुल्याच विभवें सद्रूप हें घेतसे ॥ ५४ ॥
दोन्ही दिव्य कपोल ते मिरवती आदर्शबिंबापरी
कर्णीं कुंडलिकुंडलें विलसतीं रत्नें अनर्घ्यें शिरीं ।
वोष्ठीं पल्लवराग पूर्ण दिसतो संपक्क तुंडीं फळें
किंवा विद्रुमखंड हे मिरवती माधुर्यधारागळें ॥ ५५ ॥
मध्यें कुंदकळ्यासमान बरवी बारीक दंतावळी
किंवा हीरकपंक्ति रम्य मिरवे रम्यप्रभा आगळी ।
कंदर्पायुत कोटिचंद्र सगळे वोवाळिले ज्यावरी
ऐसें सुंदर आस्यपद्म विभुचें अत्यंत शोभा धरी ॥ ५६ ॥
कंठीं नीळमणीसमान बरवें ते क्ष्वेड साजे जया
कस्तूरी धरिली विलासविभवें तैसें दिसे स्वामिया ।
ऐशीं पंचमुखें बरीं विलसतीं देवांत पंचास्य हा
यासाठीं सुर सर्व यासि नमिती सर्वांहुनी श्रेष्ठ हा ॥ ५७ ॥
देवाचा विभु आदिदेव ह्मणती गाती श्रुती सादरें
श्रीपादांबुजरेणु दिव्य धरिती ते मस्तकीं भास्वरें ।
दाहाबाहु करींद्रशुंडसमता आजानु ते शोभती
भक्ताभीष्ट समग्र पूर्ण करिती कल्पागशाखस्थिती ॥ ५८ ॥
घंटा पाश त्रिशूल सन्मृगकरीं डौरासि एकें धरी
दोंहस्तें वरदाभयासि विवरी खट्वांग ही आदरी ।
एकें बाणपिनाक सज्जुनि धरी तें खड्ग साजे करीं
ऐसे हे दशहस्तसायुधवरीं म्यां ध्यायिलें अंतरीं ॥ ५९ ॥

जें अत्यंत विशाल वक्ष विलसे नक्षत्रलोकांपरी
जें कां दानवदैत्य शस्त्र किणते शोभा उडूची वरी ।
दीजे या उदरासि एक उपमा अश्वत्थपर्णीं जरी
ते तों हीन म्हणोनि लज्जित घडे माझी तदा वैखरी ॥ ६० ॥
त्रैलोक्याश्रय कुक्षि विस्तृत तया अन्योपमा ते नसे
देती सत्कविराज भाविकबळें चित्तास मानें तसें ।
नाभी हा अतिखोल फार दिसतो पाताळलोकापरी
तेथें कुंडलिका निवास करिते ते आदिशेषा सरी ॥ ६१ ॥
त्याचा ही तळिचा जसा दिसतसे श्रीकूर्म येथें असे
पाहा ! हा कटिभाग उन्नत तसा लोकांसि दावीतसे ।
शोभा स्फाटिकखांबसाम्य धरिती ऊरूयुगें सुंदरें
जें पृष्ठीवरि आदरेंचि धरिजे सानंद नंदीश्वरें ॥ ६२ ॥
रत्नाच्या मुकुटाकृती मिरवती जंघा बऱ्या गोजिऱ्या
जें कां शैलसुतांकपीठउपरी संलालिजेल्या बऱ्या ।
घोंटे माणिकगुच्छ तुच्छ करिती शोभा असी साजिरी
कूर्मांगा जिणती प्रपाद उपमा येना यया दूसरी ॥ ६३ ॥
भक्तांचें सुखकंद पादयुगळें शाखाकृती अंगुळी
पुष्पें हे नखपंक्ति शुभ्र विलसे मोक्षादिसिद्धीफळीं ।
छाया शीतळ शांति दे अतिशयें संसारपांथा जना
विश्रांतीप्रति हेतु जाणुनि किजे अत्यादरें पूजना ॥ ६४ ॥
हे पादांबुज दीन भाविककुळां तारावया तिष्ठती
संसारार्णवलंघना प्लव तसे प्रत्यक्ष हे दीसती ।
हें जे जाणति तत्व तेच भजती त्यांतें कळीचीं भयें
बाधूं नासकती कृतांतभट ही भीती तया निश्चयें ॥ ६५ ॥
श्रीनागाभरणें कडीं मणगटीं ग्रैवेय–हारादिकें
मुंडें अक्षमणी उरे झळकती संमिश्र तें स्फाटिकें ।
आंगीं शुभ्र विभूतिलेप विलसे शार्दूलकृत्तीं कटीं
खांदीं सद्गजचर्म रम्य धारिलें पाहों दिठी धूर्जटी ॥ ६६ ॥
पाहा ! काळकळी धरोनि बरवे या तोडरीं बांधिले
दासांतें भय काय यावरि असें प्रत्यक्ष म्यां देखिलें ।

हा मृत्युंजय मृत्युनाशन करी ध्यातां यया मानसीं
बाधूंनाचि शके कदापि सुजना माया महाराक्षसी ॥ ६७ ॥
याचें हें यश वेद सर्व कथिती गातीं पुराणें किती
सारे हे मुनिवृंद हेंचि वदती ब्रह्मादिही वर्णिती ।
पापी देखतदेखतांचि तरती जे चिंतिती एकदां
संसारार्णव लंघिती न फिरती आश्चर्य नोहे कदा ॥ ६८ ॥
ऐसा म्यां शिवधूर्जटी निरखिला सानंद म्यां ध्यायिला
कायावाचिकमानसीक समुदा सद्भाव त्या अर्पिला ।
केलें स्तोत्र यथामती पशुपती चिंतोनिया अंतरीं
माझे चोविस पाश तोडुनि कृपासिंधू धरो या करीं ॥ ६९ ॥
जो कां निर्गुण निष्प्रपंच निगमीं निर्धारिला ज्यापरी
ध्याती दिव्य निरंजनाख्य समुदे ज्योतिस्वरूपीं तरी ।
आहे साच परंतु हें धरितसे सद्रूप दीना जना
तारावें ह्मणवोनि सत्करुण हा ध्यायीं सदा तूं मना ! ॥ ७० ॥
राणी योग्य उमा समानाविभवें या योग्य काशीपुरी
नंदीही तरि योग्यवाहन यया चंद्रावतंसा धरी ।
दोघे पुत्र षडेभवक्त्र असती माळा गळां वासुकी
हे लोकोत्तरसंपदा मिरवली साम्या न ये आणखी ॥ ७१ ॥
कैलासाचल शुभ्र त्यावरि उभा नंदी बरा पांढरा
तत्पृष्टीं गिरिनंदिनीसहित तो देखों विभू साजिरा ।
गंगा पन्नग अर्धचंद्र ढवळे संपत्ति हे सात्विकी
शैवीं वेदविदीं असें स्तवित कीं देखों अह्मीं नेटकी ॥ ७२ ॥
ब्रह्मा वेद फणींद्र वर्णन करूं ज्यातें कदा नेणती
त्याचें वर्णन अल्पधी करिन मी कोण्यागुणें निश्चितीं ।
भूमीचे रज मोजवेति परि ते याच्या गुणा मोजितां
ना झाला पहिला पुढें तरि नव्हे वाटे मना तत्वता ॥ ७३ ॥
तो म्यां शंकर वर्णिजे स्वमतिनें सामर्थ्य कैसें घडे
तत्रापी कथितों स्वशक्ति जितुकी सद्भक्तिभावें दृढें ।
सूर्यातें लघुदीप घेउनि जसें नीराजनातें किजे
सिंधूतें चुलुकोदकेंचि सहसा अर्घ्या जसें अर्पिजे ॥ ७४ ॥

धाना हो हरि हो त्रिलोकपति हो ते दिक्पती होतु कां
येईनान कदापि साच सहसा या शंकराच्या तुका ।
ज्याचें पूजन एकदाचि करितां कैवल्य दे आपुलें
यासाठींच कवी **निरंजन** सदा चिंतीतसे पाउलें ॥ ७५ ॥

ज्याला सर्वार्थसिद्धी अभिमत असती तो पढो स्तोत्र वाचे
किंवा निष्कामभावें पदयुगभजनीं नित्य लागो शिवाचे ।
ध्यानीं ध्यावा सदा ही सगिरिगिरिसुता पार्षदांशीं सुतांशीं
शंभू वांछील त्यातें श्रुतिशिरगत त्या पूर्ण बोधामृतासी ॥ ७६ ॥

इति श्रीमत्कविराजनिरंजनमाधवयोगीविरचितं सांबशिवध्यानमंगळस्तोत्रं संपूर्णम् । श्रीमत्सद्गुरुमूर्तिसिद्धेश्वरचरणारविंदार्पणमस्तु ॥ श्रीसुंदरकृष्णार्पणमस्तु ॥

---

## ११ श्रीसद्गुरुस्तव.

गुरू गुणालया परापराधिनाथ सुंदरा
शिवादिकांहुनी वरिष्ट तूंचि एक साजिरा
गुणावतार तूं धरोनि या जगासि तारिसी
सुरां मुनीश्वरां अलभ्य त्या गतीस दाविसी ॥ १ ॥

तुझी अगाध कीर्ति वर्णना परायुषें तरीं
घडोंचिना कदापि, तैं मदीय दीन वैखरीं
वदेल केंवि ? मानमात्र मीं करूं किमर्थ जी ?
मनासि पैस ना घडे न वेदही समर्थ जी ॥ २ ॥

पुराण शास्त्र मंत्र जाल तंत्र यंत्र सर्वही
तुझ्या कृपाबळेंचि सर्व रूढले यया मही
समस्त वाङ्मयामृतासि हृत्सरोजकुप्पिका
तुझी विराजली जगत्रयाय तूंचि देशिका ॥ ३ ॥

गुरू जया नरा नसे तयासि काय तें दिसे
असोनि नेत्र काय ते मयूरपिछिचे तसे
महाभ्रमें मदांध मोहसागरीं निमज्जती
कलत्रपुत्रगेहवित्तचिंतनासि लागती ॥ ४ ॥

अखंड कामिनीमनांत दामिनीसमान ते
कुभोगपंक्ति सर्वही तयांसि साच वाटते ।
अनश्वरत्व नश्वरीं विलोकिताति देखतां
परस्परें जगांत याच मृत्युदुःख भोगितां ॥ ५ ॥
शरीर हेंचि आत्मभान जाहलें तयाप्रती
तदर्थ इच्छिताति सौख्य नाशवंत संपती ।
अमित्रमित्रभाव आपुल्या गुणेंचि जाणती
समस्त भूतमात्रकीं दया कदापि नेणती ॥ ६ ॥
न साधुवाद ठाउका असे तयासि पामरा
तदां विवेक सद्विचार केंवि त्या घडे नरां ।
गुरांहुनी खरांहुनी तयांसि नीच बोलिजे
अपार भार वाहते प्रकामपुष्ट जाणिजे ॥ ७ ॥
नसे जयांसि साधुसंगकामना मनांतरीं
सदैव लोभपाशबद्ध गुंतले धनांतरीं ।
न वेद धर्म कर्म तीर्थ यज्ञ दान साधणें
व्रतादिही न जाणताति सज्जनासि बाधणें ॥ ८ ॥
कुळांत कज्जलासमान तेचि शोभती बरे
तयांसि वाहतां धरा भरें बहूत हुंबरे ।
वृथाचि वृक्षजीवनासमान दुष्ट वांचती
पिशाचभूतराक्षसांसमान नीच नाचती ॥ ९ ॥
कलींत ते कलिप्रियत्व पावले सुशोभले
तयांसि त्यांसमान लोक वानिती भलेभले ।
मरोनि ते कृतांतधाम पावती न चूकतां
अनर्थ काळदंड दुःख भोगिती यथार्थता ॥ १० ॥
सुजारिणीसुतासि बापनांव ठाउकें नसे
तयापरी गुरूविहीन तत्व जाणती कसे ।
गुरू जयासि भज्य तेचि पूज्य या जनांतरीं
सुरीं नरीं महोरगीं तयांसि वंदिजे शिरीं ॥ ११ ॥
गुरूविना अणीक मुख्य तत्व दुष्ट मानिती
तयां नरांसि निश्चयें पहा घडे अधोगती ।

गुरूचि देव धर्म सर्व तीर्थ मोक्ष याविना
नसेचि हाचि निश्चयो नमो नमो तया जना ॥ १२ ॥
जयां गुरुत्व बोधलें तयांसि कार्य साधलें
भवार्णवासि लंघिलें सुविघ्नदुर्ग भंगिलें ।
महा रिपूंसि जिंतिलें निजात्मतत्व चिंतिलें
परात्परासि पाहिलें प्रकष्ट दुःख साहिलें ॥ १३ ॥
मनोजनाश जाहला सुखात्मबोध बोधला
मनासि वेध वेधला स्वयेंचि वायु रोधला ।
गिरेसि मौन बैसलें दिठीस तेज पैसलं
अनाहतध्वनीस या भरोनि कान ऐकिलें ॥ १४ ॥
उदान कंठ रोधिला अपान ऊर्ध्व चालिला
समान मध्य राहिला सुमान कुंभ कीं भला ।
त्यजोनि नीज पन्नगी स्वमार्ग ते धरी उगी
प्रवाळवर्णसाजिरी म्हणोनि वर्णिती जगीं ॥ १५ ॥
षडेकचक्रभेदनी सुकुंडली निघे झणी
पिळोनि नाडिकारसासि पुष्ट होय पीउनी ।
हृदब्ज तें विकासवी चिदंबरासि दाखवी
सहस्त्र पत्र पाउनी मरंद तेथ चाखवी ॥ १६ ॥
निजस्वरूपलाभ हा ययापरीं घडे पहा
महंत राजयोग हा प्रभाव दाखवी महा ।
अणीक एक सांगतों गुरूपुजेसि लागतों
तयासि भक्तिमार्ग तो मनांत पूर्ण जागतो ॥ १७ ॥
नवापरीं तया घरीं सुभक्ति रावते बरी
वसोनि नित्य अंतरीं तया त्यजीच्चना हरी ।
समस्त भूतजातही हरी दिसे यया मही
हरीविना नसे कही चराचरीं जगत्त्रयीं ॥ १८ ॥
हरीच तोचि जाहला हरीरुपें विराजला
हरीविना दुजी परी न देखतांचि रंगला ।
त्यजोनि मान कामना मदादि दंभवासना
अहंकृती कुभावना विटाळ नावडे मना ॥ १९ ॥

जनांत मित्रता बरी ऋजुत्व भावना धरी
असोनियां सदां घरीं नसे तसा दिसे तरी ।
उदार सर्वही गुणें समानदृष्टि देखणें
स्वकर्मभोग भोगणें न लक्षिजे पुरे उणें ॥ २० ॥
सदां प्रतोष अंतरीं अखंड आठवी हरी
क्षमाप्रसाद सारखाचि थोरलाहनावरी ।
सुसत्ववृत्ति चांगली तयासि गोड लागली
विशेष संतमंडळी मनासि मानली भली ॥ २१ ॥
जयावरी गुरूकृपा तयासि दुर्गुणीं त्रपा
न आतळे तमोरजादि भावना सरीसृपा ।
असाचि सूक्ष्म भक्तिचा निदान सर्व युक्तिचा
प्रभाव विष्णुशक्तिचा गडी प्रधान मुक्तिचा ॥ २२
गुरू उदार माउली प्रशांतिसौख्यसाउली
जया नरांसि फावली तयांसि सिद्धि धावली ।
गुरू गुरू गुरू गुरू म्हणोनि जो स्मरे नरू
तरोनि मोहसागरू सुखी घडे निरंतरू ॥ २३ ॥
गुरू चिदब्धिचंद्र हा महत्पदीं महेंद्र हा
गुरुप्रतापरुद्र हा गुरु कृपासमुद्र हा ।
गुरू स्वरूप दे स्वथा गुरूचि ब्रह्म सर्वथा
गुरूविना महाव्यथा नसे जगीं निवारिता ॥ २४ ॥
गुरु स्मरा गुरु स्मरा गुणांबुधींत संतरा
गुरूचि एक सोयरा भवीं नसेचि दूसरा ।
गुरूचि काशिकापुरींत मंत्र दे षडक्षरी
सुतारकोपदेश हा करोनि लोक उद्धरी ॥ २५ ॥
शिवाहुनी गुरू असे अधीक हें मला दिसे
नरांसि मोक्ष द्यावया गुरुस्वरूप घेतसे ।
शिवस्वरूप आपुलें न मोक्षदक्ष देखिलें
गुरुत्व पूर्ण घेतलें म्हणोनि कृत्य साधलें ॥ २६ ॥
हरी विरंचि ईश हो महेंद्र चंद्र शेष हो
गुरूसि साम्य यां नये म्हणोनि वेदघोष हो

पुराणशास्त्रआगमीं अनेकधा बुधोत्तमीं
गुरूचि थोर बोलिला म्हणोनि मीं तया नमीं ॥ २७ ॥
गुरूचि बाप माउली गुरूचि दीनसाउली
गुरूचि शिष्यवांसुरांसि कामधेनु गाउली ।
गुरूचि चिंतितार्थ दे गुरूचि तत्त्व तो वदे
अलभ्य मोक्षलाभ आपुल्या कृपें गुरूचि दे ॥ २८ ॥
गुरूचि भेद नासितो जडांधकार शोषितो
गुरूचि मोह वारितो अविद्यभाव सारितो ।
गुरूचि ब्रह्म दावितो गुरूचि ध्यान लावितो
गुरूचि विश्व सर्व आत्मरूप हें बुझावितो ॥ २९ ॥
गुरूचि मूळ दीप रे जगद्गुरुस्वरूप रे
समस्त देवही तदंश दीसताति साजिरे ।
गुरूचि पूर्णसिंधु रे तयांत देव बिंदु रे
गुरु स्वयंभ सूर्य अन्य सर्व ही मयूख रे ॥ ३० ॥
गुरूचि रत्नमाळ रे अणीक भास व्याळ रे
गुरूनभीं विशाळ सर्व लोक मेघजाळ रे ।
गुरूचि सर्व दीसतो गुरूचि सर्व भासतो
गुरूचि हा प्रकाशितो गुरूचि सर्व शोभतो ॥ ३१ ॥
गुरूचि दिव्य दृष्टि रे गुरूचि सर्व सृष्टि रे
गुरूचि ज्ञानबोध रे गुरूचि सर्व शोध रे ।
गुणांत तोचि विस्तरे मनांत तोचि संचरे
समस्त भूतमात्र चेष्टवोनि एकला उरे ॥ ३२ ॥
गुरू विराटरूप रे गुरू हिरण्यगर्भ रे
गुरूचि ॐ त्रिवर्ण पंचवर्ण मुख्यतार रे ।
गुरूचि विश्व तैजसू गुरूचि प्राज्ञ पूरुषू
गुरूविना दुजा नसे श्रुतीस घोष सर्वसू ॥ ३३ ॥
गुरूचि ध्येय ध्यान रे गुरूचि सर्व मान रे
नसे गुरूसमान रे जगीं गुरूस मान रे ।
गुरूचि थोर सान रे महासुखा निदान रे
गुरू गुरू गुरू गुरू करीं म्हणोनि गान रे ॥ ३४ ॥

गुरुस्वरूप चिंतिजे समाधि हेचि बोलिजे
समस्त वेदपाठ नाम मंत्र जाप्य जाणिजे ।
यथार्थ सर्वतीर्थ सद्गुरूपदाब्जतोय हें
गुरूचि सेवणें अनेक अश्वमेध यज्ञ हे ॥ ३५ ॥
नमो गुरू कृपाकरा नमो गुरू गुणाकरा
नमो गुरू परात्परा नमो गुरू महत्तरा ।
नमो गुरू सनातना नमो गुरू मनोन्मना
नमो गुरू घनाघना नमो गुरू निरंजना ॥ ३६ ॥
षट्त्रिपद्यमालिका कवी **निरंजनें** निका
रचोनि पूजिल्या अखंड देशिकेंद्रपादुका ।
यिला धरील कंधरीं तयासि मुक्तिनोवरी
वरील जाण निश्चयें निजात्मबोधमंदिरीं ॥ ३७ ॥
समस्त देव तुष्टती मुनी प्रसाद अर्पिती
निधी समस्त त्या घरीं अनंत सौख्य वर्षती ।
सुकीर्तिलाभ सर्वहीं ययासि होत निश्चयीं
भजा म्हणोनि बापदेवलक्ष्मीधरा तुम्ही ॥ ३८ ॥

इति श्रीमत्कविकुलतिलकनिरंजननाथवयोगीविरचितं सद्गुरुस्तोत्रं संपूर्णम्
श्रीपरदेवतार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

---

## १२ श्रीरामकर्णामृत.



### १ उत्तमपुरुषवर्णनः—

श्रीरामा सुरशेखरा सुखनिधे सौन्दर्यरत्नाकरा
साकेताधिप सूर्यवंशतिलका सर्वाद्य सर्वेश्वरा ।
सीतावल्लभ सद्विभूषणमणे संसारनिर्मूलना
सत्तानायक सिद्धवंदितपदा संतारिसी सज्जना ॥ १ ॥
ब्रह्मेशानसुरेंद्रमन्मथरवीचंद्रादि ते दिक्पती
विश्वेसाध्यमरुद्वसूपितर ते सिद्धेश जे वर्तती

हे सारे तुझियाचि पादभजनें पावोनियां उन्नती
लोका वंद्य घडोनि काम समुदें कल्पागसें अर्पिती ॥ २ ॥
रामा ! दिव्य तुझा पलंग अहि हा सामर्थ्य ऐसें वरी
त्रैलोक्यांग तुला रमा सहसुखें वाहे शरीरादरी ।
पाहा सर्षपबीजसी वसुमती अक्लेश माथां धरी
जे मेरूसरिता समुद्रभुवनाधारा विराजे परी ॥ ३ ॥
भूभारोद्धरणार्थ विश्वजनकें पूर्वी तुला प्रार्थिलें
यासाठीं क्षितिपाळ होउनि तुवां सत्कार्य संपादिलें ।
धर्मी सज्जनवेदयज्ञविबुधा संस्थापिले राघवा
तूं सर्वाद्य म्हणोनि खेळ करिसी शैलूष तैसा नवा ॥ ४ ॥
झाली धन्य तुझीच एक जननी त्या योषितांच्या गणीं
झाला श्लाघ्य तुझाच एक जनिता भूपाळचूडामणी ।
विश्वाचा जनिता तुला स्वजठरीं वाहे सती आदरें
देवा ! दाशरथी असें म्हणविसी कैं पुण्य वानूं सरे ॥ ५ ॥
रामा ! त्वत्तनुकांतिनीळ विलसे ऐसें मला हें दिसे
जे तूझे निजभक्तदोष समुदें त्वां घेतले भर्वसे ।
तूझे जे गुण शुद्ध सर्वहि तया त्वां दीधले सुंदरा
तूं दूर्वादलशामकोमलवपूधर्ता जगत्शेखरा ॥ ६ ॥
संसारातपतप्तदाहशमनीं तूं नीळमेघाकृती
रामा ! येउनि पूर्णवृष्टि करिसी स्वांतामृतें श्रीपती ।
झाली त्या समयींच जाण चपला देवी धरित्रीसुता
आतां तापविपत्ति राहिल कसा भक्तां तुह्मांदेखतां ॥ ७ ॥
तूझें रूप अनूपभूषणगणीं जें सांवळें शोभतें
सीतालिंगित भद्रपीठशिखरीं सानंद तें तिष्ठतें ।
जैसें सुंदर नीलवर्ण गगनें नक्षत्रमालागणें
पर्वी शारदचंद्रिकेसह जगीं या शोभिजे सद्गुणें ॥ ८ ॥
या तूझ्या वदनांबुजासम शशी लाहे कलंकी कसा
कंदर्पायुत सुंदरा जिणुनियां जें शोभतें राजसा ।
फुल्लांभोज तसें विकासित दिसे हें सर्वदां राघवा
जेथें हास्यसुधामरंद विलसे जो नित्य वाटे नवा ॥ ९ ॥

हे तूझे भुजयुग्म मार्गजमणिस्तंभापरी शोभती
औदार्यें तरि कल्पभूरुहमहाशाखांसि हे जिंतिती ।
शत्रूंतें वधिती स्वभक्तसुजनाधर्मासि संस्थापिती
कोदंडेशु धरोनि हे विलसती दीनावना सांप्रती ॥ १० ॥

नेत्रीं चारुकटाक्ष शीतकिरणा पीयूषधारा घना
जिंती शीतळ आणि माधुरपणें रामा ! जगत्कारणा ! ।
तूझ्या सत्करुणांवकें निरखिसी जीवासि ज्या चिद्धना
तो पावे परमंपदासि म्हणती गाती श्रुती पावना ॥ ११ ॥

हें तूझें हृदयारविंद सकळ ज्ञानासि राहावया
झालें आस्पद हें म्हणोनि वहुशा विस्तार पावे सया ।
तत्रापि द्विजपादचिन्ह मिरवे रोलंबसाम्यें वरी
जेथें नित्य करोनि पूर्ण वसती राहे रमासुंदरी ॥ १२ ॥

साजे तें वटपत्र पोट बरवें त्रैलोक्य जेथें वसे
सर्वांगीं सुर रा.ताति तुझिया रामा ! महासौरसें ।
तत्वें सर्व तुझ्याच आश्रयवशें देहीं तुझ्या राहती
तूं सर्वाश्रय, तूं विना अणिक ते कोणासि नाहीं गती ! ॥ १३ ॥

हें पीतांबर शोभतें कटितटीं संध्यांबराचे परी
जेथें सुंदर बूटचित्र दिसती त्रैलोक्य चित्रें बरी ।
तूझ्या श्रेष्ठ अशा विराटवपुला शोभा अनंता करी
हे लीला तव काय वर्णन करूं जाणे लघू वैखरी ? ॥ १४ ॥

रामा ! त्वत्पदपद्म पाउनि जरी ते इंदिरा सुंदरी
राहे लोधुनि आझुनी सुखघनामोदा मिलिंदीपरी ।
सेवी प्रेममरंद पावन सती जें जन्मभू नादरी
अद्यापी मुनिमानसें भ्रमरसीं ते भोंवती सादरीं ! ॥ १५ ॥

रामा ! त्वन्नखचंद्रिकारजयुता होवोनि भागीरथी
गेली सिंधुसमागमा समरसा पावोनि राहे सती ।
जेव्हां सागर मंथिला सुरवरीं हय्यंगवीनापरी
झाला हा शशिपिंडमंडित जगीं पीयूषज्योत्स्नावरी ॥ १६ ॥

रामा ! त्वत्करपंकजाहुनि बरे पादाब्ज हे आगळे
ऐसें बोलति सर्वही निगम ते मोठे कवीही भले ।
लंकाराज्य दिल्हें करीं धरुनियां वीभीषणा सद्यशा
पाहा पादरजें पळांत घडली पाषाण एणीदृशा ॥ १७ ॥

## २ शौर्यवर्णनः—

बालत्वींच कसा पराक्रम तुवां केला जगन्नाटका
दुष्टा एकशरेंचि ते निवटिली रात्रिंचरी ताटका ।
मारीचां गजरक्तआसव दिलें तां ( त्वां ) प्राशना सायका
विश्वामित्रमखासि रक्षण तधीं केलें रमानायका ! ॥ १८ ॥
केला त्र्यंबकचापभंग ह्मणतो हें तों न मानें मला
भूपालोद्धटगर्वभंग रचिला रामा ! घनःश्यामला ।
नाहीं ते जनकात्मजा परिणिली सत्कीर्ति पृथ्वीसुता
घाली माळ तुला जगत्त्रयगुरो ! साऱ्या जगादेखतां ॥ १९ ॥
कोदंडाप्रति जेधवां लवविसी जैं सायका योजिसी
तेव्हां त्या सुरसुंदरी अतिशयें खिन्नावती मानसीं ।
श्रीरामें अतिमत्त राक्षस रणीं संहारिले या क्षणीं
ते येतील अम्हांस भोगकरणीं स्वर्गासि या कारणीं ॥ २० ॥
रामा ! तूं धरितां शरासन करीं तैं कांपती ते अरी
जेव्हां जैत्ररथाधिरोह करिसी तैं मज्जती सागरीं ।
कोणी धीट घडे समोर समरीं शासी महेंद्री पुरी
लोळे भूमितळीं विदारित शरीं तो मुक्तिकांता वरी ॥ २१ ॥
रामा ! तूं करवाल दिव्य करिचा जैं कांपवीसी तदां
होती कंपित शत्रुभूप कर ते वंदोनि देती सदां ।
तूं आशा अवलोकितां त्यजुनियां ते जीविताशा प्रभू
होती म्लान तदा तयांसि न सुचे कैं देश कैं कोशभू ! ॥ २२ ॥
रामा ! कोप तुझा कृपेहुनि दिसे लक्षागुणें आगळा
जे लोकघ्न सुराप रात्रिचर ते खाते मुनीच्या कुळा ।
ऐसेही मदमत्त संगरवरीं निर्दाळिले त्वां शरीं
जाती ऊर्ध्व सुखें विमाननिकरीं ते सत्यलोकाशिरीं ॥ २३ ॥
रामा ! तां वाधिले निशाचर भले स्वर्गीं सुखे राहिले

देवींसीं रतले सुनंदनवनीं क्रीडा करों लागले ।
जैसे ते पहिले सुरेंद्र सगळे सेवाचर्या लाविले
केले त्वां तरि कृत्य काय न कळे कां संगरीं मारिले ॥ २४ ॥
वीराग्रेसर रामचंद्र तुझिया बाणानळें शोषिला
सापत्न्यांबुधि तेधवां क्षितितळीं तो कोरडा जाहला ।
तद्देहस्थितसंपदा शफरिका नेल्या तया धीवरीं
देखों तद्गुणरत्नपंक्ति अजुनी धुळींत लोळे बरी ॥ २५ ॥
रामा ! शत्रुकुळें तुझीं हतबळें झालीं महाव्याकुळें
कोठें त्यां न मिळेचि आश्रय तदा ते हिंडती भूतळें ।
ज्या खांदीं कडियें मुलें द्रुमफळें भक्षावया केवळें
छायावृक्षमुळें तयांसि सदनें होतीं गुहा देउळें ॥ २६ ॥
रामा ! धन्य तुझी विचित्र करणी संहारिले तां रणीं
ते गेले तुज देखतांचि रविच्या सन्मंडला भेदुनी ।
संन्यासी विजनीं जिणोनि पवनी झाले तपस्वी जनी
तेहीं विघ्नगणीं पिडोनि पडिले अच्छिन्न मायागुणीं ॥ २७ ॥
रामा ! तां दशकंधरा निवटिले आश्चर्य तैं वाटलें
धात्याचें वरदान काय न कळे कोणीकडे आटलें ।
देवा ! मस्तक तूटलें तव पदां जावोनियां भेटलें
झालें अंग पतंगसें तव महातेजानळीं लोटलें ॥ २८ ॥
शंभू विस्मित जाहला वरद तो ब्रह्मा उगा राहिला
रामा ! हा सुरवृंद पुष्ट घडला मोठ्या श्रमा मूकला ।
होता तो शशि पूर्ण सर्वसमयीं तो एकला सूकला
एका सौख्य विषाद एक पवती कैं साम्य काळा खळा ॥ २९ ॥

### ३ प्रतापवर्णनः—

रामा ! तूं रणरंगधीर समरीं कोदंड घेतां करीं
ब्रह्मांडोदर सर्वही तव शरीं झांकोळलें तैं हरी ।
कैंचा सागर ? कैं गिरी ? क्षितिनभा देखों न येतां सुरीं
होता दिग्भ्रम सत्प्रतापतपनें केला उदो अंबरीं ॥ ३० ॥
जेव्हां राघवसत्प्रतापतपनें उद्योतिल्या या दिशा
तेव्हां शत्रुयशःशशी मलिनता पावोनि घे दुर्दशा ।

दीर्घापत्ति घनांधकार सरतां गीर्वाणवक्रांबुजें
झालीं फुल्ल तदा सुकीर्ति कमला विश्रांति तेथें भजे ॥ ३१ ॥
रामा ! स्यंदन वेंधतां रथरजें साऱ्या दिशा स्पर्शिल्या
देवा ! त्वत्तरुणप्रतापमह त्या संयोगहीं पावल्या ।
झाल्या गर्भवती उभौ प्रसवल्या प्राची प्रतीची वधू
एकी ते रविबिंब आणि दुसरी संपूर्ण व्याली विधू ॥ ३२ ॥
त्रैलोक्येश्वर रावणें हटविले तो हैययें जिंतिला
त्यातें मर्दुनि सत्प्रताप जगतीं श्रीभार्गवें स्थापिला ।
त्याचें सयश तों समस्त हरिलें अक्लेश एकाक्षणीं
यासाठीं तुज सर्वलोक म्हणती तूं एक वीराग्रणी ॥ ३३ ॥
सांगे ते चक्रवाकी गुज निजपतिला ऐक कांता खगेंद्रा
दीनाचा पक्षपाती रविकुलमणि हा देखसी रामचंद्रा ।
आहे भानू दिसां तो निशि उदित असे सत्प्रतापार्क याचा
आतां नाहीं वियोगाब्धिजभय सहसा आपणांतें त्रिवाचा ॥ ३४
कूर्माधार तळीं फणींद्र वरुता तो दीर्घदंडाकृती
पृथ्वी त्यावरि पात्ररूप घडली तत्सूत्र भागीरथी ।
स्नेहें पूर्णसमुद्र सप्तसलिलें सूर्यार्चि हा आयिता
रामा ! त्वत्तरुणप्रताप विलसे दीपाकृती भूभृता ॥ ३५ ॥
सूर्याच्या उदयीं संतोष मिळती तें चक्रवाकें जशी
तैशी कीर्तिमहत्प्रताप तुझिया शौर्योदयीं सौरसीं ।
त्वद्दानोदसरित्तटीं विहरते हें युग्म राजेश्वरा
यातें देखुनि तोष फार विकसे मर्त्योरगां निर्जरां ॥ ३६ ॥
रामा ! त्वत्तरुणप्रताप विलसे कुंभोद्भवाचे परी
मोठा रात्रिचराब्धि शोषुनि बरा जो शोभला भूवरीं ।
वाली इल्वल भक्षिला बळनिधी सत्ख्याति केली जनीं
तद्द्वारें धरिली असेनि अजुनी राजेश्वरा मेदिनी ॥ ३७ ॥

## ४ यशवर्णनः—

रामा ! जे सगरान्वयीं उपजले राजे धरामंडळीं
त्यांचें सयश आजुनी प्रकट तें आहेचि सर्वास्थळीं ।

एकें निर्जर रक्षिले सुरनदी एकें जगीं आणिली
एकें दीर्घशिलोच्चयें विरचिला अक्षोभ्य सेतू जळीं ॥ ३८ ॥
रामा ! त्वद्यशसाम्यतेमि सगळा कैलास तो तोलिला
आला जोख उणा म्हणोनि वरुता नंदीशही ठेविला ।
गौरीशीं शिव त्यावरी बसविला गंगाफणींद्रें बरा
येना पूर्ति म्हणोनि इंदुशकलें संपूर्ण केलें हरा ॥ ३९ ॥
राना ! तां क्षितिमंडळीं विचरतां कृत्यें अनेकापरी
केलीं दुर्घट आजुनी विलसते सत्कीर्ति लोकांतरीं ।
मेरू एक दिल्हा नसे द्विजवरां क्षीराब्धि राहे तसा
ना केला शशि पूर्ण हेंचि न कळे कां नाणिलें मानसा ? ॥४०॥
पूर्वीं भूपति जाहले बहुतसे कर्में तयांनीं बरीं
केलीं भूवरि आझुणी विलसती तत्कीर्ति लोकोत्तरी ।
ब्रह्मांडोदरपोकळी न भरली एका नृपाळें कधीं
रामा ! त्वांचि यशें समस्त भरली देखों दिठी धीरधी ॥ ४१ ॥
पाताळीं भय दुष्ट दानवकुळां आनंद स्वर्गीं सुरा
पृथ्वीमाजि तुझी सुकीर्ति विलसे तारावयातें नरा ।
ब्रह्मांडांतरिं राघवा ! तव गुणांवांचोनि कोठें रितें ?
नाहीं साच मला मनासि गमलें हें शोधितां पूरतें ॥ ४२ ॥
रामा ! पूर्वील राजेश्वर गयनहुपातुल्य जे शत्रुतापी
त्यांचें आहे पुराणीं यश अझुनिवरी श्रेष्ठ पुण्यप्रतापी ।
तूझ्या कीर्तीसि त्यांचें यश सम तुळितां भानुखद्योतमानें
किंवा पक्षींद्रसाम्या मशकगणन तें सज्जना काय मानें ? ॥४३॥
रामा ! त्वत्कीर्तिचिंतामणिविमलशिला या जगीं प्राप्त झाली
तीची ते सज्जनांनीं मदनशतसमा मूर्ति निर्माण केली ।
दों हस्तीं तीस साजे शरधनुष बरें जानकीलक्ष्मणासीं
केली हृत्पद्मगेहीं स्थिति म्हणुनि सदा सर्वचिंता विनाशी ॥४४॥
रामा ! श्रीमंतगेहोद्भव तरि कथिजे वृत्त आम्ही कशाला !
तत्रापी राहवेना म्हणुनि विनवितों ऐक तूं सत्यशीला ।
तूझी ते कीर्तिकांता दिशि दिशि फिरते स्वर्गपाताळधात्री
देवा ! दैत्येंद्रराजेश्वरमुनिसदनीं राहते दीसरात्रीं ! ॥ ४५ ॥

रामा ! त्वत्कुळदोष एक विलसे अत्यंत दुर्वार कीं
तूझा तूंचि विचार यासि करिजे आणूं नये लौकिकीं ।
जे तूझ्या कुळिचे नृपाळ अपुल्या सत्पूर्वजांच्या यशा
मारे लोपिति आपुली प्रकटिती सत्कीर्ति दाही दिशा ॥ ६० ॥
मेरूच्याही शिळा त्या गणवतिल कदा रामनक्षत्रमाळा
धारा कल्पांबुदाच्या गणवतिल जना मोजवे रश्मिजाळा ।
मोजूं येती हिमाचे कण गणन घडे या क्षितीच्या रजाचें
रामा ! तुझ्या गुणांचें गणन न करवे वाक्य ऐसें श्रुतीचें ॥ ६१ ॥
रामा ! त्वद्गुणकीर्तना न करितां जे दुष्ट राजे जनीं
त्यांचें सेवनकीर्तनीं वय वृथा नेलें तया दुर्जनीं ।
जें लोकीं स्मरतांच पाप हरि त्या गंगोदका टाकुनी
जे भंगोदक सेविती जडमती त्यां साम्य मीं तें गणी ॥ ६२ ॥
रामा ! तूं गुणवंत संत तुजला ध्याती मनोमंदिरीं
ते तों त्वत्पद पावतां विलसती तूझ्या महामंदिरीं ।
जे जैसें करिती तसेंचि करिसी देवा रमानायका
नाहीं त्वत्सम दूसरा सुरवरीं मोक्षाचिया दायका ॥ ६३ ॥
गंभीरत्व तसेंचि तें परगुणग्राहींच आस्था जया
देणें दान समान पात्र सम तें दुर्लभ्य भूतांसि या ।
अंतःशीतल सद्रसें विलसतें पीयूषकूपापरीं
रामा ! त्वहृदयारविंद निववी सन्मार्गवंतांतरीं ॥ ६४ ॥

## ७ धैर्यवर्णनः—

पृष्टीं कूर्में फणींद्रा दृढतर धरिलें त्या फणींद्रें क्षितीला
पृथ्वी समाब्धिमेरूसह नग जग हें ते धरी धैर्यशीला ।
हें सारें एक तूझ्या धृतिगुणमहिमालेश पावोनि रामा
धर्ती अद्यापि ऐसो श्रुति वदत सुखें भानुवंशाब्धिसोमा ॥ ६५॥

## ८ औदार्यवर्णनः—

औदार्या गणितां सुराग अथवा चिंतामणी नंदिनी
ते तों हीन तुझ्या गुणांसि समता कैं पावती चिन्मणी ? ।
रामा ! ते गुणलेश पाउनि तुझा लोकांत या श्लाघती
तूं औदार्यसुधाब्धि ते कण तसे येनाति साम्यस्थितं ॥ ६६ ॥

नेसावीं वल्कलें तीं फळ जळ तुसधें भक्षणें वृक्षमूळीं
वस्ती शाखामृगांसी निशिदिवस पहा संग या कष्टकाळीं ।
लंका ते कांचनाची जिणुनि दशमुखा संकटें प्राप्त झाली
ते दिल्ही सेवकातें रघुकुलतिलका ! तूंचि औदार्यशाली ॥६७॥
दिल्हें बिभीषणातें सहज पद तुवां हेळणेनें दयाळा
ते तों ब्रह्मादिदेवां दशशिरहवनें नेदवे रावणाला ।
ऐसें औदार्य तुझें त्रिभुवनिं विलसे जाणतां जो भजेना
याहोनी हानि दूजी कवण असल तें राघवा! जाणवेना ॥६८॥

## ९ गांभीर्यवर्णनः—

रामा ! जें सगरान्वयीं विलसतें गांभीर्य तें सागरीं
दावी उद्भट हें यथार्थ जलधी हा निर्मिला सागरीं ।
तूंही सागरजात शोभसि वरा गांभीर्यरत्नाकरा !
तूझी ते तुळणा नयेचि सहसा ब्रह्मादिकां किंकरां ॥ ६९ ॥
सिंधूचा तरि थाव लागल कधीं रत्नासि संख्या वडे
त्याचाही परपार दृष्टिस कधीं होयील लोकांपुढें ।
तूझ्या खोलपणासि अंत नलगे तो पार लागेचिना
तूझी सद्गुणरत्नराशिगणना देवांसि होईचना ॥ ७० ॥
पाठीणी पुसते झषासि सगरीं हा खाणिला वारिधी
हा अक्षोभ्य अपार पार नलगे आह्मांसि याचा कधीं ।
झाला तत्कुलरत्न राघव विभू त्याच्या गुणाचा जना
कैसा लागल पार हेंच मजला आश्चर्य वाटे मना ! ॥ ७१ ॥

## १० ऐश्वर्यवर्णनः—

त्वद्दानोदक वाहतें क्षितिवरी चौहीं समुद्राभरी
जें कां याचकदीनतेसि बुडवी कल्पांबु पृथ्वीपरी ।
देवेंद्रादि पदें तदां विकसतीं फुल्लांबुजासारखीं
जाती षट्पदविप्रसेवन करूं षट्कर्मकर्ते सुखी ॥ ७२ ॥
सिंहासीं सम सूकरांसि तुळिजे हंसासवें कावळा
क्षीराब्धीसम पल्वलास ह्मणिजे ते गार मुक्ताफळा ।
श्रीमत्कल्पमहीरुहासम तुका आणूं नये बाबुळा
रामा ! सर्वगुणाकरा ! लघु नृपां येना तुझी ते तुळा ॥ ७३ ॥

राजेंद्रा धरणींत राज्य करितां जे तां प्रजा पाळिली
ते अद्यापि सुकीर्ति पावन तुझी आहेच विस्तारली ।
त्वां रात्रिंचर रावणादि वधिले संतोषवीले मुनी
देवांचे सकळार्थ सिद्ध घडले गेले तुला वंदुनी ॥ ७४ ॥
रामा ! सिंहासनीं तूं विलससि विपुला संपदेशीं प्रियेशीं
बंधूसीं जुत्पतीसीं वरसचिवगणीं सर्वभूपाळकांसीं ।
तेव्हां मानी असें मी शशिसकळकळीं रोहिणीसीं प्रभेसीं
नक्षत्रांसीं ग्रहांसीं अतिविमळ दिसे शारदी पौर्णिमेसीं ॥७५॥
तूं सिंहासनरूढ होसिल तदां लोकांत ऐसें घडे
पाताळीं विवरीं शिरोनि सभयें दारिद्र्य तेथें दडे ।
येना काळकळीं तुझ्या भयवशें देशांतही राघवा
देखों उत्सव मात्र पुष्ट बरवा विश्वांत या आघवा ॥ ७६ ॥
निर्गंधें सुमनें सुगंध घडलीं गोडें फळें सर्वही
झाल्या सर्वलता लवंगलतिका झाली सुवर्णा मही ।
झाले मर्त्य अमर्त्य दीनजन ते झाले धनेशापरी
झाल्या त्या सरिता सुधारसयुता सत्कीर्ति सर्वाघरीं ॥ ७७ ॥
वामे वैदेहकन्या सकळशुभगुणा भूषणालंकृतांगी
बंधू सौमित्र शोभे धनुशरधर तो सर्वदा दक्षभागीं ।
कैकेयीपुत्र साजे अरिदमनसवें चामरच्छत्रधारी
तिष्ठे तो अग्रभागीं विनययुत महा मारुती ब्रह्मचारी ॥ ७८ ॥

## ११ एकपत्नीव्रतः—

रामा ! तूं एकपत्नीव्रतधर ह्मणती लोक मी तें न मानी
हे तुझी कीर्तिकांता विलसत दुसरी ऐकतों नित्य कानीं ।
देवा ! नाना कळा त्या तुज वरुनि सुखें राहती तूजपाशीं
तूझ्या शक्ती अनंता ! असति गुणवती तूंचि मोठा विलासी ॥७९॥
लक्ष्मी सत्कीर्ति विद्या विरति सुजनता सुप्रभा शांति मैत्री
लज्जा भुतानुकंपा धृति मति विलसे नम्रता प्राणिमात्रीं ।
ऐशा नाना विभूती तव तनुभुवनीं नांदती तोषयुक्ता
श्रीरामा ! सार्वभौमा तव गुणगणनीं शारदाही अशक्ता ॥८०॥

## १२ सत्यवर्णनः—

रामा ! तूं सत्यवादी म्हणवुनि पितरादेश वंदोनि माथां
जासी त्या दंडकातें अनुजसह सुखें जानकीप्राणनाथा ! ।
ऐशी लोकीं पृथा हे नवल मज नसे सच्चिदानंदरूपा
सत्यें हें विश्व सारें विरचुनि अमला स्थापिसी सत्प्रतापा ॥८१॥
सत्यें स्तंभाविना हें सदन उभविलें ऊर्ध्व तें सप्तताळें
भोंयारें सात केलीं रघुकुलतिलका ! तिष्ठती अंतराळें ।
तेथें चित्रें विचित्रें परम विरचिलीं देवमर्त्योरगांचीं
नक्षत्रांचीं वितानें रविशशि रचिले दीप आच्छिन्नअर्चीं ॥८२॥
बोलावें तरि वाक्य तांचि रुततें नाहीं असा दूसरा
हातीं बाण तसाचि एक तुझिया तूं शोभवीसी बरा ।
स्थापावें तरि तांचि आश्रितजना रामा ! यया मेदिनी
अर्थ्यांतें परिपूर्ण तांचि करिजे एकाचि वेळे धनी ॥ ८३ ॥

## १३ वैषम्यनैर्घृण्यपरिहारः—

कीर्तीनें तरती क्षितीं मनुज ते पाताळिच्या दानवां
पावाया तव भीतिकारण घडे तूझ्या पदीं वैभवा ।
रामा ! स्वर्गवतां तथा मुनिजनां त्वद्भक्ति तारीतसे
द्वेषीभक्तउपेक्ष्य यापरि तुला वैषम्य देवा नसे ॥ ८४ ॥
शिष्टांतें परिपाळितोसि म्हणती दुष्टांस संहारिसी
माया मात्र तुझी दिसे उभयतां तूं निश्चयें पाळिसी ।
कोण्या एकमिसें दयांबुधि तुवां उद्धार त्याचा किजे
देवा ! निर्घृण तूं ह्मणोनि तुजला त्या तामसीं मानिजे ॥ ८५ ॥
आहे मी सम सर्वभूतनिवहीं वैषम्य नाहीं मला
गीतेमाजि असाचि अर्थ बरवा त्वां अर्जुना बोधिला ।
तैं आलें मम मानसाप्रति बकी मारावयाला तुला
आली ते जननीगतीस मिनली नाहीं पदा ज्या तुळा ॥ ८६ ॥
रामा ! त्वत्प्रियवल्लभा दशमुखें नेली वनीं चोरुनी
तेणें कष्ट तुला बहूत घडले ते हिंडतां मेदिनी ।
ऐशा दुष्टमतीसही पद तुवां दिल्हें ! मुनींद्राप्रती
नोहे लभ्य अनंत सौख्य विलसे तैं पावला निश्चितीं ॥ ८७ ॥

### १४ भक्तोत्कर्षः—

रामा ! त्वद्भट मारुती कपितरी गोपाद आपांपती
लंकेमाजि मनी त्रिलोकुनि महासंतोष दे तीप्रती ।
केला रावण तो तृणोपम पुरी ते कांचनी जाळिली
नेला अक्षय नक्षयासि महिमा तूझी जगीं दाविली ॥ ८८ ॥
जो चौदाच्युद योजनें नभपथें द्रोणागिरी आणिला
केला लक्ष्मण सावधान अगरवी नेवोनि स्थापिला ।
जो एका निशिमाजि उद्भट अशा कर्मासि जो कां करी
रामा ! त्वत्करुणाकटाक्षमहिमा दावी त्रिलोकांतरीं ॥ ८९ ॥
कोठें रावण ! कें सुवर्णनगरी लंका समुद्रोदरीं !
कोठें राक्षस ते महाद्भुत सुरां त्रासिती संगरीं ।
रामा ! ते कपि सत्वहीन असतां पालाफळें खायिरीं
त्यांपासोनि अशांसिही वधविलें ! तूझी कृपा हे खरी ॥ ९० ॥
रामा ! ते शबरी किरातकुळिची तीनें फळें अर्पिलीं
जें कां मांचुनि ठेविलीं सुरटलीं उष्टीं जुनीं आपुलीं ।
तीं त्वां स्वीकारिलीं म्हणोनि कळलें भक्तीं तुला अर्पिलें
दोषादोष न पाहतां प्रभुवरा ! आरोगिसी चांगलें ॥ ९१ ॥

### १५ नाममहिमाः—

रामा ! त्वन्नगरी महोन्नत खरी नामें अयोध्यापुरी
सातांमाजि धुरी म्हणोनि पहिली आली गणाया तरी ।
जे शोभे शरयूतिरीं सुखकरी ध्यातां तितें अंतरीं
तीही मोक्ष वरी तुझा जप करी तैं काय आहे उरी ? ॥ ९२ ॥
जे तूझी करिती पुजा पुजिसी तूं, ते वंदितां वंदिसी
ध्यातां ध्यासिल सर्वदा निजजनां ठेवोनियां मानसीं ।
जैसे जे करिती तुझी सुखघना तैसाचि तूं वर्तसी
रामा ! तूज अमा कृतप्रातिकृती लोकीं नसे चौदशीं ॥ ९३ ॥
रामा ! त्वन्नामगोडी निशिदिनीं जपतां एक शंभूचि जाणे
दोर्दंडाच्या प्रतापा पुरहरधनुषें मापिलें सत्य जाणें ।
पादाब्जाच्या रजाचा मुनिवरवनिता जाणता हे प्रभावा
बाणाचा धाक चित्तीं जळनिधि अझुनी वाहतो साच देवा ९४

जेथें गोड फळें सुगंधसुमनें नाहींत जेथें सुमें
तेथें गोड फळें नसेति जगतीं आहेति वल्लीद्रुमें ।
तूझी नामलता सुपुण्यसुमनें मोक्षैफळें भारली
रामा ! केवलसीं त्रिलोकविपिनीं अत्यंत विस्तारलीं ॥ ९५ ॥

## १६ कृपाप्रसादः—

रामा ! त्वां जोडिल्या त्या आतिकठिणशिळा बांधितां सेतुतें जें
श्रीशा ! तूझ्या कृपेनें तव गुणमणि त्यां जोडिले आणि वोजें ।
आहे सामर्थ्य तूझें अमित परि खरें त्वत्कृपेसी तुळेना
सामर्थ्यें जें घडेना घडवि तव कृपा पार तीचा कळेना ॥ ९६ ॥
कर्ता कोण शिळावधू क्षितितळीं पाषाण तारी जळीं ?
ऐसा कोण पुरीच नेे स्वमहिमें वैकुंठधामा वळीं ? ।
कोणाचें तरि नाम तारक घडे प्राणप्रयाणोत्सवीं ?
रामा ! तूजसमान अन्य न दिसे धुंडाळितां या भवीं ! ॥ ९७ ॥
रामा ! त्वां नगरीच सर्व अपुली वैकुंठलोकाप्रती
नेली साच गमे श्रुती सकळही त्वत्कीर्ति वाखाणिती ।
तूतें जे स्मरताति अंतसमयीं त्वद्धाम ते पावती
जे तूशीं रमले अहर्निश तयां नोहे कशी सद्गती ? ॥ ९८ ॥
पापी हो परदारवित्तहर हो वंचो जनाकारणें
मातातात वधो द्विजांप्रति छळो हो क्रूर सर्वांगुणें।
ऐसाही मरणागमीं मुखपुटीं त्वन्नाम उच्चारितां
रामा ! तो न पवेल त्वत्पद असें कोणा नये बोलतां ! ॥ ९९ ॥

## १७ महिमाः—

कामाचे शर पांच एकशर तूं; तो सर्व पीडा करी
तूं दुष्टांप्रति मात्र पीडिसी दया संपूर्ण भूतांवरी ।
तो आहे रतिकांत तूं विरतिचा प्राणेश राजेश्वरा
रामा ! त्वन्महिमा कसी वरिल बा क्रूरा अनंगा स्मरा ?॥१००॥
इंद्राचे बहुनेत्रही द्विनयनापांगासि ते इच्छिती
सूर्याचे बहुपादही तवपदांभोजासि ते स्पर्शिती ।
शेषाचीं बहुतें मुखें तव मुखा एकासि ते वर्णिती
ऐशी राम ! तुझी विचित्र महिमा या जाणवेना मती ॥ १०१ ॥

विष्णु श्रेष्ठ समस्तनिर्जरगणीं कल्पाग तो पादपीं
धेनुश्रेष्ठ समस्तगोधनकुळीं ते श्रेष्ठ शंभु तपीं ।
तारानायक पूज्य तारकगणीं ग्रावांत चिंतामणी
तैसा या धरणीतळीं विलससी श्रीराम भूपाग्रणी ।। १०२ ॥

स्वर्गीं देवगुरू बृहस्पति जसा शैलांत मेरू गुरू
रत्नीं तो गुरु पद्मराग मिरवे आपीं गुरू सागरू।
धातूंमाजि गुरू सुवर्ण म्हणिजे ज्योतिर्गणीं भास्करू
तैसा राम मनोभिराम जगतीं कोदंडदीक्षागुरू ।। १०३ ॥

मीं सत्यव्रत मत्स्यरूपधर तूं तारी भवीं दुस्तरीं
मी झालों जड मंदराद्रि कमठाकारें स्वपृष्टीं धरी ।
होयीं यज्ञवराह मद्हृदयिंचा हेमाक्ष पापी विरीं
मीं प्रल्हाद म्हणोनि तूं नरहरी रक्षीं मला लौकरी ॥ १०४ ॥

माझें कर्म बळी म्हणोनि वटु हो घाली तळीं पालथा
माझ्या षड्रिपुनाशनीं भृगुपती हो राम तूं भूभृता ।
माझा मोहदशास्य नाशन करी तूं ज्ञानबाणानळीं
केशी कंस मदांध काळकाळि ते कृष्णात्मका निर्दळी ॥ १०५ ॥

हिंसाकर्म अधर्म बुद्ध चुकवी पाखंड नाशी बळें
म्लेंच्छप्राय सुदुष्टभाव निवटी कल्की महा तुंबळें ।
आतां तूं कृतकृत्य सत्वर करीं ध्यानीं नियोजीं मला
रामा ! ध्यायिन मी अहर्निश तुझ्या पादांबुजा कोमला ॥१०६॥

हातीं चाप अनूप बाण शरधी पाठीं असे बांधिला
माथां रत्न किरीट कौस्तुभ गळां बालार्कसा शोभला ।
कांचीदाम सहेमवास मिरवे ज्याच्या कटीं पीवळा
सीतालक्ष्मणयुक्त म्यां निरखिला श्रीरामजी सांवळा ॥ १०७ ॥

झाली सौंदर्यसीमा तव वपु घडतां शिल्पसीमा विधीची
झाली माधुर्यसीमा मुखकमळभवा वाक्यमुक्ताफळांची ।
दोर्दंडीं शौर्यसीमा पदकमळवरीं दीनसंतारणाची
झाली मद्भाग्यसीमा तव गुणगणनीं योजितां बुद्धि साची १०८

रामा ! श्लोकें अनंतें स्तविति मुनि तुला व्यासवाल्मीक ऐसे
पुण्यश्लोका ! तुझ्या या स्तवनिं पुरवती हे शतश्लोक कैसे ? ।

सूर्यातें काडवाती करुनि उजळिजे सागरा अर्घ्य दीजे
तैसा सद्भाव अंगीकरुनि मज विभू या जगीं धन्य कीजे ॥१०९॥
झाली हे धन्य वाणी रघुपतिचरणीं अर्पिली पद्ममाळा
काव्यामोदें विराजे नवरसभरिता तोष दे सज्जनाला ।
यीतें कंठीं धरावें ह्मणुनि बुधवरां प्रार्थितों मी **बनाजी**
श्रीरामीं भक्ति ज्याची अतुळ विलसते मान्य हो त्या **जनां जी** ॥

श्रीरामकर्णपीयूषस्तोत्र योगी**निरंजनें**
ग्रथिलें भावगंभीरें राघवार्पितसन्मनें ॥ १११ ॥

॥ इतिश्रीनिरंजनमाधवविरचितं श्रीरामकर्णामृतस्तोत्रं संपूर्ण ।
श्रीरामार्पणमस्तु ॥ शके १६९१ विरोधि संवत्सर चैत्र शुद्ध प्रतिपदा
भृगुवासरे लिखितामिदं समाप्तम् ॥ श्रीरस्तु ॥

---

## १३ श्रीतुलसीस्तोत्र.

**शा०**—देवि श्रीतुळसी हरीस तुळसी तूं एक या भूतळीं
तूं तो केवळ वल्लभा निवससी श्रीकृष्णवक्षस्थळीं ।
तूं वांचोनि तया कदापि न गमे याकारणें सर्वदा
राहे तो तुजसन्निधी नरहरी तूं मानवा मुक्तिदा ॥ १ ॥
घेतां संदर्शनातें सकळ अघ हरे स्पर्शितां पुण्यदात्री
रोगांतें वंदिता ते निरसुनि शमना सिंचितां भीतिकर्त्री ।
जीच्या आरोपणानें हरिसम तनु दे अर्पितां श्रीशपायीं
देते सायुज्य ऐशी त्रिभुवनजठरीं तूळसी हेचि आयी ॥ २ ॥
**आ०**—गंगा पुष्करमुख्यें तीर्थें सरिता सरोवरें कांहीं ।
श्रीपति मुख्यामर ते वसती तुळसीदळीं सुखें तेही ॥ ३ ॥
श्रीहरिहर्षापासुनि उपजुनि संहारिसी जगत्क्लेशा ।
तुळसी हरिपदसुख दे हरिप्रिये ! वंदितों तुतें शतशा ॥ ४ ॥
संसारीं कंसारी तारक मनुजांसि एक तूं नारी ।
तुळसी भवसंहारी म्हणोनि सारी श्रुतीच डांगोरी ॥ ५ ॥
**शा०**—लक्ष्मी संपति दे जनांसि निवसे श्रीकृष्णवक्षस्थळीं
तीतें प्रार्थिति देव मानव तथा गंधर्वसिद्धावळी ।

तत्रापी अविनाशसंपति सती देऊं सकेना कदां
देशीं त्वद्भजकांसि साच जननी लक्ष्मीपतीच्या पदा ॥ ६ ॥
कित्ती तें तरि मद्यपानअघ कीं ते स्वर्णचोरी किती
कित्ती तो गुरुदारसंग अथवा ते ब्रह्महत्त्या किती ।
संसर्गात्मक दोष तो तरि किती देवी ! तुझ्या दर्शना
नेच्छी तोंवरि यांनि उरवानि असें हें साच माझे मना ॥ ७ ॥
तुझ्या श्रीवनदर्शनासि निघतां माथेंचि हत्त्या सरे
भीतीनें तरि मद्यपानअघ तें मागील सारें झुरे ।
स्वर्णस्तेय दडे सुकौतुक घडे तल्पा दिसेना पुढें
संसर्गासह पापपंक्ति समुदी धूळीप्रमाणें उडे ॥ ८ ॥
गोहिंसा विचरो सपुत्रस्वनिता विप्रोत्तमा संहरो
मातानात भजोनि कुडमति हा लोकीं सुखें संचरो ।
पापें जीं लिहिलीं कृतांतसदनीं तीं सर्वही हा करो
येवो श्रीतुळसी ! समीप तुझिया किंवा ठिकाणीं स्मरो ॥ ९ ॥

आ०—तुळसी तुळसी तुळसी जपति त्रैवर्ण्य तीनदां कोणी ।
विष्णुस्वरूप म्हणिजे तो नोहे मृत्युलोकिंचा प्राणी ॥ १० ॥
तुळते विष्णुसमेता लक्ष्मीहुनि आवडे हृषीकेशा ।
शिवपद दे सुजनानें पावे तुळशी सुनामनिर्देशा ॥ ११ ॥

शा०—जेथें श्रीतुळशीवनें हरितसीं तेथें वसे श्रीहरी
जेथें पद्मसरोवरें सुखकरें आवास तेथें करी ।
श्रीमद्वृष्णअविप्रसंदिरवरीं राहे प्रियेसीं तरीं
तीं स्थानाहुनि धुंडितां न गिवसे श्रीश त्रिलोकांतरीं ॥ १२ ॥
नाहीं क्षीरनिधींत शेषशयनीं नाहीं अनंतासनीं
श्वेतद्वीपनिवास त्यासि म्हणती हेही वृथा बोलणीं ।
योग्यांच्या हृदयांतही न गिवसे श्रीसूर्यनारायणीं
पाहावा तरि कंजलोचन पहा श्रीतूळसीच्या वनीं ! ॥ १३ ॥
हो कां आम्रतरू रसाळ सुरभी चांपेयस्वर्णाकृती
हो अश्वत्थ हरिस्वरूप वट हो शंभू शिवा मालती ।
एका श्रीतुळसीदळासि समता एकासिही नाघडे
विष्णूच्या पदपंकजीं सुहृदयीं कंठीं शिरीं जे चढे ॥ १४ ॥

आ०-केतकि मालति मल्ली अणखी वल्ली सुगंधसंपूर्णा
तुळसीसुगंधमहिमा पावतिना कृष्णतोषदा पूर्णा ॥ १५ ॥

शा०-तूं भक्तोद्भवदोषकुंजरगणा प्रत्यक्ष पंचानना
तूं तापत्रयअंधकार-दळणा भानुप्रभा पावना ।
तूं आपत्तिभुजंगमा विनतजा त्या वैनतेयीपरी
यासाठीं तुळसी ! तुला नरहरि आनंदे कंठीं धरी ॥ १६ ॥

लक्ष्मी त्वद्भगिनी खरी परि तशी तूझी न आहे तरी
तूं देतीस जनांसि मोक्ष, कमळा लोटी भवाच्या पुरीं ।
ते राहे हरिच्या उरीं, पदनखापासोनि आंगीं शिरीं
वस्ती तूं करिसी बरी तुळसिके ! माते ! मला उद्धरी ॥ १७ ॥

गौरांगी कमळा, हरी घननिळा, माल्या नये केवळा
श्यामांगी निरखोनि माधव तुला कंठीं धरी कोमळा ।
लक्ष्मी पंकजगंधिनी, मृगमदामोदा म्हणोनी भला
देवी श्रीतुळसी ! मृगांककुळिचा शौरी बहू भाळला ॥ १८ ॥

स्र०-व्याली ते पुत्र दोघे जलनिधिदुहिता एक वेदास्य दूजा
झाला अनंग (अनंग) येना हरिसम म्हणुनी नावडे त्यासि भाजा
तूझे ते पुत्र साधू नवजलदवपू सांवळे चौभुजांचे
होती कोट्यानुकोटी प्रियतम तुळसी ! तूंचि होसी त्रिवाचे ॥१९॥

लक्ष्मीचा पुत्र पाहा विधिवदन तया चारि पांचा मुखांचा
झाला तत्पुत्र तोही प्रसवत बरवा पुत्र साहा मुखांचा ।
तूझे सत्पुत्र भक्तोत्तमकुळ समुदें वंशपारंपरेनें
होती श्रीकृष्णसाम्ये म्हणवुनि तुळसी ! तूं प्रिया त्यासि जाणे ॥२०॥

आ०-तव काष्ठोद्भवमाळा धरिती श्रीकृष्णभक्त जे कंठीं ।
होउनि भवनिधिनौका तारुनि नेसील त्यासि वैकुंठीं ॥ २१ ॥

वसंत-कर्णीं धरी तव मणी तरि कर्णधारी
होवोनि तारित हरी भवसिंधुपारीं ।
कंठीं धरी तरि तयाप्रति कंबुकंठी
ठेवी स्वरूपपद देउनि तो विकुंठीं ॥ २२ ॥

मातें श्रीतुळसी ! असें करि मला प्राणप्रयाणोत्सवीं
श्रीकृष्णासह धांव घेउनि पुढें टाकें महावैभवीं ।
आपादस्रजमंडिता हरितनू पीतांबरालंकृता
तूझ्या ह्या करुणारसें निरखितां पावें पदा शाश्वता ॥ ३९ ॥
काशाला मज वेदशास्त्रपठणें कां तीर्थयात्राव्रतें
काशाला मज नाम यज्ञ करणें सेवोनि नानामतें ।
मी तों अक्षय सर्वदा तव पदां घालोनि आहें मिठी
पापीही परि तूजलाचि पडलें मी तारिजे सेवटीं ॥ ४० ॥
व्याली ते जननी त्यजोनि मजला गेली स्वकर्में गती
गेला तात नसेचि बंधुगण ते टाकोनियां संगती ।
एकाकी भयभीतपालकमती आलों निदानीं तुला
लक्षांनीं शरणार्थ रक्षण करीं टाकूं नको तूं मला ॥ ४१ ॥
म्यां नाहीं तुज पूजिलें निरखिलें ना ध्यायिलें वंदिलें
नाहीं त्वद्वनसन्निधीस कधिंही दीपासिही लाविलें ।
ऐसा दुष्ट कृतघ्न मी परि तुझ्या दासानुदासीं गणी
आतां त्याग करूं नको मज सती लोळें तुझ्या अंगणीं ॥ ४२ ॥
म्यां नाहीं वन लाविलें घटजळें एका तरी सिंचिलें
नाहीं श्रीपतिपादपद्मयुगळीं पत्रासिहीं अर्पिलें ।
आतां ते यमभीति दुर्धर महा दुर्वार दुर्यातना
ते कैशी तरि दूर होइल कधीं तूझ्या कटाक्षाविना ॥ ४३ ॥
झालों वृद्ध दशेंद्रिया शिथिलता आली श्रुती नायकें
नेत्रीं या तम दाटसें अतिशयें दंतावळी पारखे ।
द्वारें सर्वहि एकदांचि झरती त्या सौहृदीं त्यागिलें
आलों श्रीतुळसी । तुला शरण मीं टाकूं नको वेगळें ॥ ४४ ॥
त्राहि त्राहि कृपाकरे ! भयहरे सर्वार्थसिद्धिप्रदे
आहे दीन तुझा अनन्य गति मी पाचारितों सादरें ।
रक्षीं या अभयंकरीं धरुनियां मी बाळ तूं माउली
मीं तापत्रयतप्त आजि करि तूं पादांबुजें साउली ॥ ४५ ॥

**आर्या**–धन्योहं धन्योहं पुण्योहं गलितमोहजालोहं
धृततुलसीमालोहं जितकालोहं रमेशबालोहं ॥ ४६ ॥

श्रीतुळशीस्तवनातें रचिलें सप्रेम भक्तिसंपन्नें ।
माधवतनयकवीनें वाहुनि वाक्पंकजें प्रमोदानें ॥ ४७ ॥
याच्या पठणें श्रवणें श्रीहरिधामीं वनांत तुळशीच्या ।
त्याच्या पुण्या गणना करूं सकेना बृहस्पती वाचा ॥ ४८ ॥
ज्या ज्या मनोरथाची आवडि ज्यांच्या मनीं जशी आहे ।
जपतां तुळसीसन्निध थोड्या काळांत सर्वही लाहे ॥ ४९ ॥
विद्यारंभविवाहीं कृषि-उद्यमिंवसंग्रहीं त्यांहीं
तात्काळ सर्व सिद्धी तुळशीस्मरणेंचि पावती देही ॥ ५० ॥
स्र०-राजद्वारीं प्रवासीं आतिकठिणतरप्रानसंकष्टकाळीं
कांतारीं चोरमार्गीं घनतरसमरीं शत्रुमेळीं अवेळीं ।
दुःस्वप्नीं दुष्टसत्वीं जलशिखिविषमीं ईतिबाधाप्रसंगीं
जो प्राणी भक्तिभावें स्मरल तुळसिका रक्षिते त्यासि वेगीं ॥५१॥
॥ इतिश्रीयोगीनिरंजनमाधवविरचितं श्रीतुळशीस्तोत्रं संपूर्णं श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

## १४. वनशंकरीस्तोत्र.

श्रीमाते ! वनशंकरी सुखकरी माहेश्वरी सुंदरी
साष्टांग प्रणिपात नम्रशिर हे ठेवोनि पायांवरी ।
आहे दीन तुझा म्हणोनि सदये ! तारी भवाच्या पुरीं
नाहीं अन्य पदावलंब मजला तूंवीण शाकंभरी ॥ १ ॥
इच्छा हे तव पादकंज नयनीं पाहावयाची असे
हा गेहादि उपाधिबंध चरणीं बांधोनि पाडीतसे ।
यातें तोडुनि यावयास सहसा हे शक्ति नोहे मला
जे हे दुर्घट निर्मिली पराशिवें मायामयी शृंखला ॥ २ ॥
चित्तीं चिंतन मी करीन म्हणतां वित्तादि चिंता मला
नेती वोढुनि आपल्याच तिकडे यावें कसें म्यां तुला ।
कीजे अर्चन सांग सांग विभवाभावीं कसें तें घडे
भाग्यार्थीं नृपसेवनादि करणें हें तों मना नावडे ॥ ३ ॥
नानास्तोत्र सुमंत्र जाप्य करितां चित्ता जडे कामना
त्या कामीं मन गुंततां सबळता पावे पुन्हां वासना ।

तेव्हां संसृतिमार्ग टाकुनि घडे निःसंगता कैं मला
निःसंगाविण पाविजे भगवती कोण्या उपायें तुला ? ॥ ४ ॥
नाहीं भक्ति मनांत युक्ति न सुचे अंबे ! तवाराधनीं
नेणे इंद्रियनिग्रहादिक कथा, वैराग्य कैचें मनीं ? ।
माते ! तूं जरि तारिसील करुणा आणोनि चित्तांतरीं
तेव्हां पामर मी तरेन भव हा एकाक्षणाभीतरीं ॥ ५ ॥
आतां हेंच करी मनीं दृढ धरीं मी त्याच सर्वांपरीं
आहें दीन तुझ्या समर्थसदनद्वारीं भिकारी तरी ।
नोहे जाण उपेक्षणीय सहसा त्रैलोक्यरक्षाकरें
यावें पादसरोजदर्शन मला जें जन्मजन्मा पुरें ॥ ६ ॥
तूं विद्या त्रिपुरा शिवादिजननी माया जगन्मोहिनी
तूं सर्वात्मकविश्वरूपघटना हे ही तुझ्या सद्गुणीं ।
तूं ब्रह्मादि सुरेंद्रधाम तुझिया योगें चिदानंदता
पावे जीवसमूह हा, भगवती सत्ता तुझी तत्वता ॥ ७ ॥
मी तों मूढ अनादि बंध घडला नेणोनियां आपणा
मिथ्याहंकृति मानितो जडपणें संबंध दुर्वासना ।
माझें शाश्वत सर्व, मी बुधजनीं सर्वागुणें आगळा
ऐशी हंमति घोररूप जडली अछेद्य लोहार्गळा ॥ ८ ॥
हेंही सर्व तुझें विचित्र करणें लोकीं अविद्यापणें
तोडावा निजबंध मोहमय हा कीजे कृपा आपणें ।
यावें दर्शन पूर्णभक्ति हृदयीं त्वद्दास्यकर्मीं मती
मागें माधव नंदनांघ्रियुगळें वंदोनि हे वीनती ॥ ९ ॥
॥ इतिश्रीनिरंजनमाधवविरचितं वनशंकरीनवरत्नस्तोत्रं संपूर्णमस्तु ॥

---

## १५. श्रीमहालक्ष्मीस्तोत्र.

निरीक्षिले म्यां बहुदेव, माये ! । ते वंदिती सर्व तुझेचि पाये ॥
सत्कीर्ति तूझी भुवनांत गाजे, । विष्णुप्रिये ! सुंदरी लोकपूज्ये ॥ १ ॥
वाणी स्तवों काय सकेल तूला ? । उदार तूझी गुणरत्नमाला ॥
जे शोभवीती निजकंठदेशीं । ते शोभती सर्व जगीं विलासी ॥ २ ॥

त्यांच्या घरीं सुंदररत्नशाला । स्थूणामणींच्या रचिता विशाला ॥
गजाश्व धेनू धन दासदासी । देशील तूझ्या करितां जपासी ॥ ३ ॥
**माला** गळां शोभति त्याजला गे । जो दास तूझ्या चरणासि लागे ॥
तन्मंदिरीं सर्वसुखा दिवाळी । महाकृपें वर्तत नित्यकाळीं ॥ ४ ॥
**हंसी** तशी सोज्वळ कीर्ति त्याची । विराजते केवळमानवाची ॥
तूझें महाद्वार धरोनि राहे । महत्तमे मूर्ति तुझीच पाहे ॥ ५ ॥
तयासि ते बाधिल **विष्णुमाया** । होयीचना; जे भजताति पायां ॥
तरोनि जाती भवसागरातें । कटाक्षमात्रें भगवत्पदातें ॥ ६ ॥
तयांसि लाभे अतिरूप **जाया** । विमुक्तिनाम्नी अकलंककाया ॥
वियाच तूं त्यांप्रति मोक्षधामीं । आनंदधात्री घडतेसि लक्ष्मी ॥ ७ ॥
यथार्थ तूं क्षीरसमुद्र**बाळा** । प्रसिद्ध तूझी जगतींत लीळा ॥
नरासि देशी अमरत्व आयी । येथें म्हणों ये नवलाव कायी ? ॥ ८ ॥
**आर्द्रा** तुझी दृष्टि, सती ! विराजे । सुधा तिला देखुनि फार लाजे ॥
जरामृती वारुनि भाविकांच्या । मोक्षासि देसी अमले ! विवाचा ९॥
स्वभक्तिमंता घडसील भद्रा । नोहे तुझी प्राप्ति तया अभद्रा ॥
म्हणोनि ध्याती तव पादपद्मा । पद्मालया केवळ सौख्यसद्मा ॥ १० ॥
सरोज-नेत्रे शतपत्रपाणी । **प्रेमामृतें** जीवविं विश्वखाणी ॥
वाखाणिती वेदपुराण लीला । जिणे तुझा दास बळें कळीला ॥ ११ ॥
**रामा** अनंता असती सुरांच्या । न पावती त्वन्महिमेसि साच्या ॥
त्या किंकरी होउनि पाय तूझे । समर्चितां सौख्य तयां विराजे ॥१२॥
**ऋद्धी** घरीं होऊनि सर्व दासी । पद्मोद्भवे ! सेविति त्या पदासी ॥
तूझ्या पदाब्जीं रतले तयांतें । प्रसन्न होसी, हरिसी भयातें ॥ १३ ॥
उदार ते पावति **शुद्धबुद्धी** । हरिप्रिये ! पावति सर्व सिद्धी ॥
त्वत्पादपंकेरुहभक्ति ज्यातें । धन्यत्व ये त्याचि महाकुळातें ॥ १४ ॥
चौदापरीच्या उपजाति वृत्तें । संप्रार्थिलें म्यां हरिवल्लभेतें ॥
इंद्रादि साम्राज्यपदीं उपेक्षा । मानूनि तूझी धरिली अपेक्षा ॥ १५ ॥
उपेंद्रराणी सकलार्थ खाणी, । दयार्णवा फुल्लसरोजपाणी ॥
प्रसन्न होते जरि सुस्तवासी । पढोनि भक्तोत्तम तो उपासी ॥ १६ ॥
**बनाजी** कवी शीकवी सर्व लोकां । पढा सुस्तवा विष्णुपत्नी विलोका ॥
इहामुत्रसंपत्ति भोगा अनंता; । मिळा मुक्त होऊनि शेखीं अनंता॥१७॥

॥ इतिश्रीनिरंजनमाधवयोगिविरचितं लक्ष्मीस्तोत्रम् ॥

## १६ ' ॐ नमो भगवते वासुदेवाय ' स्तोत्र.

ॐ कारात्मक विश्वरूप घटना निर्माण केली स्वयें,
तो त्यामाजि प्रवेशला हरि जसें आकाश भूतान्वयें ।
सूत्रात्मा जडजंगमांत कुसुमीं गंधापरी राहिला,
तो हा श्रीपति नंदगोपतिघरीं रांगे बरा तान्हुला ॥ १ ॥

नंदें खेळविला, सखीं कवळिला, आवे स्तनीं लाविला,
गोपी चुंबिति सुंदरास्यकमला प्रेमें पदीं न्हाणिला, ।
अंगीं भूषण लेववीत अबला, कोणीं सुखें भोगिला,
भावें गोरज पाजिला, वज्रकुळीं हा भोगिती सोहळा. ॥ २ ॥

मोठाले दैत्य गाढे धड सबळ पुढें देखतां देव वेडे,
होती सक्रोध, दाढे रगडिती, तंव ते टाकिती स्वर्गवाडे ।
ते कंसें बैल घोडे करुनि हरिपुढें पाठवीले निवाडें,
त्यांतें संग्राम होडे निवटुनि तुकडे थोर केले पवाडे. ॥ ३ ॥

भक्तांचें विघ्न वारी, दुरित परिहरी, शोखिली बाळमारी
माया दावी मुरारी, अघ बक समरीं मारिले दैत्य भारी, ।
रांगे जैं नंदद्वारीं यमलतरुवरीं घेतली मुक्ति हारी,
ऐसा हा दानवारी नमित सुरवरीं बाळभावांगिकारी. ॥ ४ ॥

गंधर्वादिक सिद्ध गाति बिरुदें तो यादवांच्या कुळीं
झाला आनकदुंदुभीसुत, अरी वाढे तुझा गोकुळीं, ।
ऐसा श्रीपति नारदें विनविला तो देव जाणावया,
प्रेरी भोजपती वडील चुलता अक्रूर आणावया. ॥ ५ ॥

वंशीं मारक जन्मला म्हणुनियां चिंता करी भूपती
तेणें दैत्य विदारिले रणमहीं स्यां प्रेरिले जे क्षितीं; ।
हा गोवर्धन थोरला उचलिला, तो बाळ कैसा म्हणों ?
जेणें भक्षुनि वोणवा विझविला त्या केविं आम्ही जिणों ? ॥६॥

तेव्हां चापमखासि निर्मुनि करी आज्ञा प्रभू गोकुळा
यावें कृष्णहलायुधासह पुरीं पाहावया सोहळा, ।
मार्गीं यादव चालतां म्हणतसे पाहेन तो श्रीपती,
ज्याचे पाय अपाय दूर करिती, ब्रह्मेंद्र ज्या वंदिती, ॥ ७ ॥

वाणी ही स्तवितां शिणे, निगम तो त्यालागिं नेणें म्हणे;
तो देवेश विलोकितां व्रजकुळीं हर्षी घडो पारणें. ।
देखे भूवरुते अपूर्व हरिच्या पादांबुजाचे ठसे,
लोळे त्यांवरि भक्तिनम्र पुरता सुप्रेम ज्या उल्लसे. ॥ ८ ॥

सूर्यास्तीं रथ पातला व्रजपुरीं अक्रूर आला घरा,
ऐसें जाणुनि भेटली सुरपती हा आमुचा सोयरा, ।
साष्टांग प्रणिपात कोमल करी, महेंद्र ज्या वंदितो
तेंही जाणुनि भाव हृत्कमळिंचा भक्तेंद्र या पूजितो ॥ ९ ॥

देवा घेउनि चालिला, व्रजवधू अक्रूर तो निंदिती
देवें दाखविलें स्वरूप यमुनाडोहीं स्वभक्तांप्रती ।
नेला मोक्षपथासि कंसनृपती चाणूरमल्लासवें,
स्थापी राज्यपदीं यदूत्तम पुन्हा मातामहा वैभवें. ॥ १० ॥

वाहे भार वसुंधरा दडपली दैत्येंद्र राजें बळीं
गर्वी कौरव बाण भूसुत जरासंधादि चैद्यावळी ।
त्या सर्वांसि वधोनि धर्मनृपती संस्थापिला आदरें
केला दिग्विजयी महा विजय तो भूभार जेणें हरे ॥ ११ ॥

एके सोळा सहस्र क्षितिपतितनया भोगिल्या एक वेळा
स्वर्गीच्या कौतुकानें सुरवराविटपी आणिला द्वारकेला ।
केला श्रीवासुदेवें कुरुयदुमथनीं बोध पार्थोद्धवाला
ते झाली ज्ञाननौका भवनिधितरणोपाय सद्वैष्णवाला ॥ १२ ॥

श्रीकृष्णाचीं चरित्रें परम शुभकरें ऐकतां दोष जाती
स्वच्छंदें प्रेमबंधें हरिजन हरिची सत्कथा नित्य गाती ।
हृत्पद्मीं ब्रह्मरंध्रीं सुदहरकुहरी लक्षिती वासुदेवा
ध्याती त्या पंकजाक्षा नवजलदनिभा अर्पिती भक्तिभावा ॥ १३ ॥

मंत्राचे वर्ण बारा प्रणव प्रथमतो वासुदेवाभिधानी
त्यावर्णीं श्लोक बारा रचुनि हरिपदीं अर्पिली रम्य वाणी ।
कैंचें सामर्थ्य मातें परि सकळ कृपा बापलक्ष्मीधराची
प्रार्थी भावें बनाजी कविवर परिसा कीर्ति हे केशवाची ॥ १४ ॥

## १७ श्रीमल्लारीस्तोत्रराज.

मल्लारी, विभु, म्हाळसापति, तुझ्या वंदूं पदांभोरुहा.
दे भक्तासि अचिंत्य कामफळ हें निंदोनि स्वर्भूरुहा. ।
गाती सादर नाथ, पुण्य चरितें जे भक्त तूझे, हरा,
संसाराब्धि तरोनि पावति सुखें मुक्तीचिया मोहरा ॥ १ ॥

संसारीं रत जीव पंच कलुषें दुःखें सदा वाहती.
जे स्वर्गीं नरकीं मनुष्यनिवहीं कर्में स्वकें राहती. ।
त्यांचें बंधन केंवि दुर्घट तुटे ? माया कधीं हे घटे ?
ऐशीं हे करुणा करोनि चरितें केलीं तुवां दुर्घटें. ॥ २ ॥

माराया मणिमल्ल दुष्ट, कपटी, मायानिधी, तो स्वयें
तेणें निर्जर दंडिले, म्हणुनियां प्रार्थावयातें भयें. ।
आले त्या अभया दिल्हें, करुनियां शत्रूसि उन्मूलना,
ऐसा हा अवतार केवळ तुझा दीनांचिया पालना. ॥ ३ ॥

विश्वात्मा, जडजंगमांत भरला राहोनियां, सर्वदा
लीला जे करिसी विचित्र सुजना तारावया सर्वदा. ।
देसी मुक्ति तसीच भुक्ति, सहजें ध्यातां तुतें सादरें
कैंची ते नरकादिभीति अथवा कष्टें महादुर्धरें ? ॥ ४ ॥

सारें विश्व तुला भजोनि तरतें संसारमायानिधी;
ऐसा तूं भजकांसि लभ्य सहसा झालासि जैसा निधी. ।
गेले दुखदारिद्रसंभव पुन्हां काशासि दुष्टापदा
पाहों हे सकतील पामर तरी पावोनियां त्वत्पदा. ॥ ५ ॥

या लोकीं मज एकलेंचि त्यजिलें तां काय तें पाहिलें ?
माझें पातक काय एकवटलें, कीं आड तें राहिलें ? ।
पाप्यांमाजि मलाच कां निवडिलें ? खोटें मना वाटलें ?
या दुःखें मज नीर हें अतिशयें नेत्रांबुजीं दाटलें ॥ ६ ॥

पूर्वीं पातकवंत काय नव्हते ! तां टाकिले कोणते ?
तूं दीनोद्धर हें विचित्रचरितें गाताति, बा, जाणते ।
पायीं तोडर बांधिला उकलिला माझ्याचि या कारणीं ?
ऐसा हा तुज काय भार पडिला महादोषसंहारणीं ? ॥ ७ ॥

जें तूझ्या स्मरणेंचि पाप न सरे, ऐसें नसे देखिलें
 पाप्यातें करवेचिना, सुरगुरू, त्याला न जें लेखिलें; ।
ऐसेंही असतां, मदीय दुरितें तूं चिंतिसी दुर्धरें,
 तेव्हां पामर मी जगांत न कळे कैशापरी उद्धरें ॥ ८ ॥
तूझ्याही महिमांबुधीहुनि असे मज्जेष्ट पापांबुधी;
 तेव्हां मीच वरिष्ट तूजहुनि या सन्मानिजे या बुधीं; ।
तूझा तो पुरुषार्थ हीन वडला तारावयातें मला;
 तेव्हां कोण भजेल या त्रिजगतीं पादांबुजा कोमला? ॥ ९ ॥
मोठासा मणिमल्ल दुष्ट वधिला त्वां ज्या प्रतापें तरी,
 तो होता विबुधां बुधांसि वळसा देणार त्या अंतरीं ।
तैसा पातकदैत्य हा विकसतो मद्देहवासी वधीं
 तेव्हां त्वत्पुरुषार्थ मानिन खरा दुःखासि तूं आवधी ॥ १० ॥
कामाचा वधतांचि कीं विराचिला, क्रोधासि तां दंडिलें,
 शोकातें अतिदूरता उडविलें, लोभासि तां भंडिलें ।
मोहातें तरि मर्दिलें प्रभुवरा, उच्छेदिलें त्या मदा
 साहाही रिपुंच्या जयासि करुनी तूं वर्तसी, शर्मदा. ॥ ११ ॥
तूतें जे भजती तयांसि न घडे हे दुष्ट बाधा कधीं
 ते ना पाहाति आपदा कलिकृता, देवा ! कधीं ना कधीं ।
तूं विश्वंभर, तूं परात्परगुरू, तूं आद्य सर्वां जनां
 कल्पांतीं तुझिया स्वरूपसरिते ये विश्व हें मज्जना ॥ १२ ॥
ब्रह्मा होउनि सृष्टि तूंचि करिसी, विष्णूचि तूं पाळिसी
 भूतात्मा सकलांतरीं वसुनियां तूं, चिन्मया, चाळिसी ।
कल्पांतीं नटतांडवासि करुनी भक्षोनियां राहसी
 पूर्णात्मा निजवैभवासि अपुल्या इच्छावशें पाहसी ॥ १३ ॥
ऊर्णायूसम विस्तरोनि जग हें, तूं ग्रासिसी मागुती
 पूर्वींपासुनियां स्वभाव असला तूझा श्रुती सांगती ।
हे गाथा तव कर्णरम्य विलसे गोडी सुधेचेपरी,
 यीतें प्राशिति सिद्ध, सज्जन, मुनी; जे श्रेष्ट सर्वांपरी ॥ १४ ॥
कल्याणी तव देव पावन कथा मी सर्वदा गातसें
 तूझें सुंदर रूप हें निजमनीं मी सर्वदा ध्यातसें ।

आतां तूं अविलंब पावन करीं येना मना तेधवां,
तुझें वर्म जगांत दाविन खरें, श्रीह्माळसाच्या धवा ! ॥ १५ ॥
कोठें तो तव वृद्ध बैल ? हय हा कैंचा तुवां आणिला ?
कोठें मूठवळी ? सुवर्णमणिचा हा जीन पालाणिला ।
कैं खट्वांग जुनें घुणें लिबाडिलें ? हें खड्ग कैचें करीं ?
भिक्षापात्र त्यजोनि, भूपति कसा झालासि, बा ! लौकरी ?॥१६॥
चर्में टाकुनि, दिव्यराजवसनें कोठें मिळालीं तुला ?
मुंडें सांडुनि, मौक्तिकस्रज गळां ज्यांतें शशीची तुला ? ।
कैं गेलें शवभस्म, बेल ? बरवें भंडार भाळीं दिसे
कैं गेले प्रमथादिभूतगण ते ? तो एकही ना दिसे ॥ १७ ॥
सर्पांचीं वलयांगदें विलसती ग्रैवेयकें कुंडलें,
ते कांहींच न दीसती, पुरहरा ! माथां जटामंडळें ।
आतां सन्मणिकुंडलें मिरवती कानीं, कडीं हस्तकीं
दिग्वासा ! विमलांबरांसि धरिसी उष्णीष हें मस्तकीं ॥ १८ ॥
कैंचें हें तुज दिव्य वैभव असें आलें कळेना मला ?
होता कीं बहुकाळ वास तुजला प्रेतावनीं नेमला ।
आतां थोरपणासि घेउनि अम्हां संगेंचिना बोलसी
श्रीकंठाविभवेंचि माजुनि कसा मत्तापरी चालसी ? ॥ १९ ॥
ञाणार्यी हरिली तुवां धणगरी लोभें तरी कोणत्या ?
देवी सुंदर ह्माळसा असुनियां राणी घरीं जाणत्या ! ।
घाणेरी धुरटी तुला तरि कसी ते मानली नाकळे ?
तीसंगें तुजला कसें सुख गमे ? तूझें तुला हें कळे ! ॥ २० ॥
तूझी ते प्रियसुंदरी, वरसती, दाक्षायणी, चित्कला,
तीनें दक्षमखांत देह अपुला जाळोनियां टाकिला ।
झाली भस्म पळांत ते भगवती श्रीअन्नपूर्णेश्वरी
अन्नार्थी तुजला तदां निरखिलें भूलोक देवेश्वरीं ॥ २१ ॥
तेव्हां त्या मुनिनायकीं स्ववनिता अन्नें करीं देउनी
तूला पाठवितां, प्रसन्नमन तूं झालासि तें सेउनी ।
अन्नें पुष्ट घडोनि, काम उपजे त्या सुंदरीदेखतां,
तेव्हां लिंग तुझें गळोन पडलें, शापानळा प्रेरतां ॥ २२ ॥

लज्जेनें विष भक्षिलें; परि नये तो मृत्यु, मृत्युंजया
केलें विव्हळ त्या हळाहळरसें जैं तूजला, दुर्जया !।
तैं ते देखतसे तुला भगवती, नारायणी, मोहनी,
जे देवांसि सुधा समर्पण करी, दैत्येश्वरां मोहुनी ॥ २३ ॥
ते झाली तव वल्लभा, म्हणुनियां झालासि तेव्हां सुखी
अर्धाधांग घडोनियां विलसलां तुह्मी तदा चित्सुखीं ।
तीनें या तुज वैभवासि दिधलें दारिद्र्य तें खंडिलें
ते माता अम्हुची तिच्याच सुकृपें ऐश्वर्य हें जोडिलें ॥ २४ ॥
झाली साह्य म्हणोनि शक्ति तुजला आली वधाया अरी
इंद्राच्या कुलिशा असाध्य हरिचा कुंठीत झाला अरी ।
तां खड्गें मणिमल्ल दैत्य वधिला या ह्माळसेच्या बळें
तां कीजे तरि काय कृत्य न कळे शक्तीविना दुर्बळें ? ॥ २५ ॥
झाला कीं पुरुषार्थ सर्वहि तुझा तो आजि ठावा मला
ते तूझी गृहिणी असे भगवती, जे कां लता कोमला ।
देवीनें तुज नाम रूप दिधलें, तैं लौकिकीं रूढता
झाली; हें, त्रिपुरांतका ! न विसरें घेवोनियां मूढता ॥ २६ ॥
मोक्षाचा प्रभु दानदीक्षित खरा, स्वातंत्र्य तेथें तुला
आहे साच; परंतु अद्भुत तिच्या कृत्यांसि नाहीं तुला ।
ज्या जीवांप्रति मोक्ष देसिल तयां देवीच विद्या घडे
ऐसे वेदमुखें अम्हीं परिसिले हे बोल, बा ऊघडे ॥ २७ ॥
तूझी भाज महालसा घरधणी तूं नागवा, जोगडा
मी झालों अतिदीन याचक तुझा मीहूनि तूं ऊघडा ।
मागावें तुज काय तें ? म्हणुनियां मौनासि म्यां वाहिलें
तूंही देसिल काय सांग मजला तूझें तुपें राहिलें ॥ २८
आतां व्यर्थ कशासि काय करणें वाग्जल्प हा आगळा ?
दुःखें म्यां बहु भोगिलीं म्हणुनियां दाटोनि आला गळा ।
प्रेमें मी वदलोंच निष्ठुर तरी तां पाहिजे साहिलें
दीनातें करुणाकटाक्ष करुनी तां पाहिजे पाहिलें ॥ २९
शांतात्मा करुणानिधी म्हणविसी तूं या जगीं एकला
तें साचें करणें तुलाच पडलें, खंडेश्वरा निर्मळा !।

आहे ब्रीद तुझें; करी जतन तूं दासांचिया संकटीं
टाकावीच उडी तुलाचि पडली, विश्वंभरा, एकटी ! ॥ ३० ॥
मागेना तुज ईश्वरत्व अथवा साम्राज्य लोकत्रयीं
नेच्छीं मी, विभु, सार्वभौम पदवी जे स्पृष्ट तापत्रयीं ।
देईं पादसरोजभक्ति अतुळा, हे एक वांछा मनीं
यीवांचोनि दिली तरी, पुरहरा ! ते मुक्ति मी ना मनी ॥ ३१ ॥
भक्तीचा महिमा तुझा न गणवे जन्माशतें धातया
हे ज्यांला फळली तुझ्याच करुणे, पूजीच वेदा तया ।
यासाठीं, जगदीश्वरा ! मज असो त्वद्भक्ति हे शंकरी
सिद्धी सर्व इच्या पदीं विलसती; मुक्ती घरीं किंकरी ॥ ३२ ॥
ज्या जन्मीं भजनीं तुझ्या मन रते, तो धन्य मानीं, भवा !
नेच्छीं त्वद्भजनाविना हरिहरब्रह्मांचिया वैभवा ।
सारीं जातिल जैं लयासि, निरखूं; आम्ही उरों सेवटीं
हांसों त्यांप्रति भक्त होउनि कसे ना वांचलां संकटीं ? ॥ ३३ ॥
अव्यक्तीं लय पावलां, पुनरपी व्यक्तीस येणें घडे
ऐसें हें भ्रमणें तुह्मांसि पडलें, गीता वदे ऊघडें ।
आम्हीं भक्त तरोनि मायिकपदा, अव्यक्तही जिंतिलें
झालों चिन्मय मात्र भक्तिविभवें; श्रीभैरवा चिंतिलें ॥ ३४ ॥
तेही शंकित जाहले, म्हणाति कीं ना चिंतिला हैबती
हे तो धन्य, सुभक्त, भक्तिविभवें आह्मां शिरीं रावती ।
आह्मी ईशमदें भुलोनि पडलों अच्छिन्न मायाभ्रमीं
यातायात पुनः पुन्हा घडतसे आलातचक्रक्रमीं ॥ ३५ ॥
आतां हे नलगे, ह्मणोनि भजती त्वत्पादपद्मांप्रती
भक्तीनें तरती, अनन्यगतिका, मायानिधी सांप्रती ।
यासाठीं तव पादभक्तिमहिमा दावी तुझ्या चित्पदा
त्वद्भक्तीविण सर्व देवपतिची दुःखार्ह ते संपदा ॥ ३६ ॥
तूं अव्यक्त, अनादि, निर्गुण, विभू, तूं शुद्ध, बुद्ध, स्वयें
सद्रूपाप्रति जाणतोसि तुझिया तूं एकला निश्चयें
मायातीत, विशुद्धसत्व असतां खेळों तुला आवडे
तेव्हां निर्मिसि सर्व मायिकपदा बाळापरी रोकडें ॥ ३७ ॥

मायो ते तरि अंगिकारुनि जगीं ईशत्व तूं पावसी
मायाधीन तसा नटोनि बहुशा लोकांपरी दाविसी ।
आकाशादिक पंचभूतनिवहीं, मात्रामयीं, इंद्रियीं
सूत्रात्माचि घडोनि वर्तसि, विभू पाहों असें निश्चयीं ॥ ३८ ॥
वेदांतीं कथिलें तसेंचि कथितों, सर्वत्र तूं एकला
तूं सारें नटलासि दाउनि तुझी ऐशी महाचित्कळा ।
जें जें दृश्य दिसे, तुझेंचि विलसे हें रूप, सत्यात्मका
मल्लारी, करुणाघना, हयपती, चिन्मूर्ति, चिन्नामका ॥ ३९ ॥
आतां तूज नमो नमो; पुनरपी साष्टांग तूला नमो
सूक्ष्मा, तूज नमो, नमो गुरुतरा, रूपा, अरूपा, नमो ।
लोकातीत नमो; तमात्पर नमो, सर्वांतरेशा नमो
जेजूरीपुरनायकासि शतशा भैराळभूपा नमो ॥ ४० ॥
आतां तूं अपुले म्हणोनि जन कां पायांतळीं ठेविजे ?
तूझें जें निजरूप अव्यय असे, तें या दिठीं दाविजे ।
माझें निष्ठुर बोलणें सकळही, मायेश्वरा, साहिजे
माझ्या हृत्कमळीं, परात्परगुरू ! तां सर्वदा राहिजे ॥ ४१ ॥
ऐसा हा स्तवराज माधवसुतें निर्मोनि पादांबुजा
केला अर्पण, दिव्यवाक्यलतिका वेंचोनि पद्मांबुजां ।
हे माळा जरि भक्तियुक्त धरिती कंठीं प्रमोदोत्करें
खंडेराय दया करील करुणासिंधू सुधाशीकरें ॥ ४२ ॥
त्यातें हा भवसिंधु वत्स ? पदसा होयील पादप्लवें
ध्यावाहर्निश म्हाळसापति सदा प्रेमें महाउत्सवें ।
वाचावा स्तवराज भाविकजनीं शार्दूलविक्रीडितें
भावें दिव्य निरंजनें विरचिला सुक्ताक्षरें पंडितें ॥ ४३ ॥
मल्लारीस्तव भक्तिमुक्ति फळ, दे सत्पुत्र, कन्या सती,
अष्टैश्वर्य, धनेशता, विपुल दे सत्कीर्ति ते शाश्वती ।
विद्याभ्यासविनाचि लाभुनि घडे चातुर्यचिंतामणी
दीर्घायुष्य, कलत्र सुंदर मिळे त्रैलोक्यनारीमणी ॥ ४४ ॥
॥ इति श्रीमन्निरंजनमाधवविरचितमल्लारीस्तवराजः ॥

---

## १८ श्रीविठ्ठलस्तोत्रम् ।

श्रीमत्त्रैलोक्यनाथा, त्रिभुवनजनिता एकला तूंचि होसी
तूझ्या आंगींच सारें जग करुनि, पुन्हां पोषिता तूंचि त्यासी
विश्वात्मा मी असेंही ह्मणविसि, अगुणा, मूळमायाविलासा !
सोंगें घेवोनि सारीं नटसि तुज नमो, पांडुरंगा, परेशा ॥ १ ॥
ब्रह्मांडांचीं अनंतें वसति तव महारोमकूपांतराळीं
ऐसा तूं भूमरूपी असुनि ह्मणविसी मी त्रिलोकासि पाळीं ।
तोही तूं गोपवेषा धरुनि व्रजकुळीं रक्षिसी गोधनातें
आतां आलासि, देवा ! वसतिस आमुच्या रक्षणा पंढरीतें ॥ २ ॥
जेथें वाहे सुषुम्ना अमल सुरनदी भीवरा पापभीमा
तत्तीरीं वास तूझाअतिशय मिरवे, विठ्ठला, दिव्यनामा ।
माझ्या निष्ठाख्य वीटेवरि तुज, बरवें स्यां उभें साच केलें
माचित्तें पुंडरीकें तुज, भुवनयशा ! ये स्थळीं आळवीलें ॥ ३ ॥
तूझें राउळ हें विचित्र विलसे हृत्पद्म माझें, विभू !
तेथें वास तुझा निरंतर असे, सर्वांतरस्था, प्रभू ।
आत्मा ईश्वर तूंचि, बुद्धि बरवी तूझी प्रिया रुक्मिणी
विद्या तेचि परा, म्हणोनि घडली लोकत्रया स्वामिनी ॥ ४ ॥
पंचप्राण; दशेंद्रियें सकळही गोपाळ, तूझे गडी
माझे दैहिक भाव सर्वहि तुझे सद्भक्त हे आवडी ।
ध्यातीऽहर्निश पूजिताति तुजला, ' सोहं ' सुमंत्रावळी,
उच्चारोनि समस्तभोगविषयां अर्पोनि पुष्पांजळी ॥ ५ ॥
निद्रा हेचि समाधि, वंदन तुतें लोटे तनू भूवरी
सारी तेचि प्रदक्षिणा घडतसे संचार जो मी करीं ।
वाचा हे सहसा तुझ्याचि करिते स्तोत्रासि, लक्ष्मीधरा !
आतां तूंविण कोण आणिक असे मातें जगीं सोयरा ? ॥ ६ ॥
कृष्णा, गोदावरीही, सुरनदि, यमुना, नर्मदा, सिंधु, तापी
कावेरी, ताम्रपर्णीहुनि बहुत असे हेचि भीमा प्रतापी ।
यीच्या तीरीं, विभू, तूं वससिल भुवना पावना मुख्य हेतू
येथें तूझा विराजे अमलयशपटे थोरला मोक्षकेतू ॥ ७ ॥

विश्वात्मा तूं, हरी तूं, त्रिभुवननुत तूं, सर्व तूं, सर्वसाक्षी
पृथ्वी तूं, आप तें तूं, अनळ, मरुत तूं, व्योम तूं, विश्वकुक्षी ।
इंदू तूं, पद्मबंधू पुरुष, तुज असें वानिती वेद चारी
तूंही तैसाचि सारा घडुनि विनटसी अष्टधा या प्रकारीं ॥ ८ ॥
तूं ब्रह्मा, सृष्टिकर्ता, म्हणविसी अपुल्या योगमायाविलासें
पाळाया विष्णु होसी, हित मग करिसी प्राणियांचें विशेषें ।
संहारात्मा पुन्हा तूं घडुनि विनटसी रुद्ररूपें क्षणार्धीं
लोकांतें विश्ववंद्या! धरिसिल उदरीं तूंचि अंतीं परार्धीं ॥ ९ ॥
सृष्टीचा खेळ कर्ता तुजविण दुसरा कोण आहे कळेना ?
ब्रह्मा तो पुत्र तूझा म्हणति निगम ते; रुद्र नातू, सुजाणा ।
सारे आंगींच तूझ्या विलसति सुर हे; भिन्न कोणी दिसेना
तूझ्या साऱ्या विभूती म्हणुनि मिरवती, मुख्य तूं देवराणा ॥ १० ॥
तूं कर्ता या जगाचा असुनि, म्हणविसी सर्वथा मी अकर्ता
तूं योगें या जगातें धरुनि, म्हणविसी मी नव्हे यासि धर्ता ।
ऐशा तूझ्या व्यलीका समजुनि न कळे कोण जाणेल तूतें
यासाठीं वेद तेही म्हणति न समजूं नाटका या विभूतें ॥ ११ ॥
कां, बा, ऐसा जगातें ठकिसिल, न कळे तूं जगन्नाथ होतां
आतां कोण्या उपायें तरि तुज समजों ? पाविजे जी अनंता ।
माया तूझी विचित्रा; अमित गति तिची; तत्वता ते कळेना
तीच्या अंतर्हितत्वें असासि म्हणुनि तूं कोण हें आकळेना ॥१२॥
आतां काशासि आम्ही श्रम करुनि वृथा वेदकांतार ध्यावें ?
कां शास्त्रांच्या शिळाही वरि वळवुनियां निर्गुणातें पहावें ।
आम्ही प्रत्यक्ष देखों समचरण उभें रूप हें पंढरीशा
सानें दृष्टीस वाटे परि नवल कसें भव्य सर्वा, सुरेशा ॥ १३ ॥
तूं तों आम्हांचिसाठीं त्यजुनि बदरिकाधाम आलासि येथें
ताराया या जडांतें; म्हणउनि वदती आठरा भाट जेथें ।
दीनार्थी तीन मूर्ती घडुनि विलससी क्षेत्रतीर्थाभिधानें
सद्रूपें देउळीं या निवससि भजती भक्त ते सद्विधानें ॥ १४ ॥
भक्तीनें साध्य होसी, भजति म्हणुनियां भाविकां सज्जनांसी
भक्तीचा तूंचि दाता; जरि धरिसि मनीं तारिजे या जनांसी ।

भक्तीनें मुक्ति ते तों न चुकत वडते नेच्छितांही, दयाळा !
तें कां आम्हीं चुकावें भजन न करितां विठ्ठला, लोकपाळा ॥१५॥
भक्तीची काय आतां वदवल महिमा ? ऐकतां चोज वाटे
एका गंधार्पणानें धरि तुज पदरीं कूबडी जात वाटे ।
हेंही, देवा ! असो दे ! फुकट गवळणी बांधिती तूज दावें
गोविंदा ! काय त्यांचें रिण तुजवरितें पूर्विलें हें वदावें ॥ १६ ॥
हेंही राहो यशोदा तुज, शशिवदना, अप्रमेया, विभूतें
त्रोसंगीं स्तन्य पाजी; वसति तव कुसीं थोरलीं पांचभूतें ।
ब्रह्मांडें लक्षसंख्या नियतचि वसती रोमकूपांतराळीं,
ऐशातें पुत्रभावें निशिदिन कडिये घेउनी धन्य झाली ॥ १७ ॥
तूं आनंदी सुखांचा असुनि तव मुखा चुंबिते प्रेमभावें
तूं तों विश्वायकुक्षी; तुज धरि हृदयीं, भाग्य हें कैं वदावें ? ।
देवा ! गंगादिसिंधूजनक, तुज कसें न्हाणिते स्वल्प पाणी
घालोनी अंजुळीनें, नियत पदयुगीं घेउनी नंदराणी ? ॥ १८ ॥
तूं तो त्रैलोक्यरक्षामणि असुनि, करी तूज ते दृष्टिरक्षा
आवा, सर्वाश्रयातें, तुज तरि निजवी पाळण्यासाजि, दक्षा ।
वेदावेद्यासि कैसी बहुबहुपरिचे हल्लरीं गीत गाते !
पाहा ज्ञानांजनातें नयनिं निजकरें कज्जळा लेववीते ॥ १९ ॥
श्रीलक्ष्मीच्या धवातें बहुत मणिगणीं भूषणीं भूषवीते
वैरिंचाद्यासि नाना कथुनि सुखकथा फारसी तोषवीते ? ।
त्रैलोक्यांगासि कैसें अभिनव चिमणें आंगडें लेववीते ?
कैसें बा ! नित्यतृप्ता दधिघृतसहिता वोदना जेववीते ? ॥ २० ॥
पाजी स्तन्यासि, तेव्हां तव मुख निरखीं; तें गळे दूध होटीं
जृंभा देतां निरीक्षी त्रिभुवन सगळें रम्य तूझ्याच पोटीं ।
तूंही नाना प्रकारीं नटसम बहुशा दाविसी योगमाया
मायातीता तुला हें उचिताचि दिसतें, भंगणें भक्तमाया ॥ २१ ॥
वैश्यां, शूद्रां, स्त्रियांतें, परम गति वडे माझिया भक्तियोगें;
ऐसें गीतेंत कृष्ण प्रकट निजमुखें अर्जुनालागिं सांगे ।
तें मी प्रत्यक्ष पाहें, नरहरि, तुझिया पंढरीमाजि डोळां
मुक्तीचें द्वार सोपें उघड दिसतसे सर्वदां भाविकांला ॥ २२ ॥

क्षीराब्धीजा पती तूं, तदुपरि धरणी पाळितां गोधनातें,
देसी तूं दुग्ध मातें, म्हणउनि धरितां पादपद्माश्रयातें, ।
तूं तो मोठाचि, देवा ! ठक पय सहसा नेदितां, पांडुरंगा,
मातेचें दूध माझें सुलभ उडविलें कां पुन्हां सांग तूं, गा ! ॥ २३ ॥
पोटीं ब्रह्मांडकोटी असुनि, न चढवे उंबरा गौळियांचा
वेदांचा मूलवक्ता, परि वदसि मुखें बोबडी मंद वाचा ।
त्रैलोक्याधीश्वरांचा अधिप, परि निशीं चोरिसी काय लोणी
ऐसी लीला स्वभक्तां निरखाविसि, जगन्नायका, विश्वखाणी ॥ २४ ॥
लोण्याची नित्य चोरी करिसि म्हणुनि तूं सांगती गोपदारा,
मोठ्या रागें यशोदा धरुनि करतळीं तूजला जैं, उदारा, ।
काठी घेवोनि हातीं, करिन म्हणतसे ताडणा; त्याच काळीं
भीतीनें वक्त्रपद्मा निरखिसि तिचिया साश्रुनेत्रीं विशाळीं ॥ २५ ॥
नंदाच्या गेहपंकीं रमसि, नव जशी विप्रयागीं त्रिशुद्धा
गायींच्या हुंबरातें प्रतिरव करिसी, बाहसी मौन वेदां ।
गोपाच्या पुंश्चलींचा सकळहि करिसी आवडी गेहधंदा
आलें मातें कळों हें, वश घडसि खरें भाविकांतें मुकुंदा ॥ २६ ॥
गोपांचीं काय उष्टीं प्रिय बहु तुजला लागती, गोपनाथा
अन्नाचा आजि मोठा दुकळचि पडला वाटतो साच आतां ।
कोण्या प्रेमें तुला ते वश करिति ? मला सांग मी त्या प्रकारीं
भक्तीनें पादपद्में भजुनि, करिन, जी, दास्य भावें, मुरारी ॥ २७ ॥
तेही दिल्हें तुला कीं तनु, मन, धन तें साच निर्द्वंदभावें
यासाठीं युक्त देवा, म्हणसिल पडलें चोज त्यांचें करावें ।
मीही सप्रेम तूतें सकळहि करितों अर्पणा पादपद्मा
देईं सुप्रेम मातें, त्रिभुवनविनुता, विठ्ठला, सौख्यसद्मा ॥ २८ ॥
गोपांच्या रक्षणार्थीं धरिति करतळीं थोरल्या डोंगरातें
केलें तां भग्नदर्प त्रिभुवनविभवाधीश्वरा, वासवातें ।
यासाठीं हेंच मातें नियतचि कळल, दीनसंरक्षणार्थीं ।
तुझी आहे प्रतिज्ञा, म्हणउनि भजती भक्तही मोक्षणार्थी ॥ २९ ॥
डोहीं जो सर्प होता बहु दिवस बळी सूर्यजेच्या, महंता
त्याच्या तीव्रा विषातें न सहुनि, घडसी तूंचि तद्गर्वहंता ।

गोपांच्या सौख्ययोगास्तव करिसि असीं साहसें, चक्रपाणी
रक्षावें तां अनन्यांप्रति, करिसि यथातथ्य हे लोकवाणी ॥ ३० ॥
हेंही राहो, मुकुंदा, यमलतरुवरां तारिलें तां दयेनीं;
तेहीं, जा; काय केलें तव भजन, विभू, सांग मातें जडांनीं।
वरार्थीं (?) पूतनेतें परम पद दिल्हें, जें यशोदेसि द्यावें
या औदार्यासि तूझ्या कवण तुळल ? बा, काय आम्हीं वदावें?३१
कष्टें मोठ्या तपातें करिति सनियमें पर्वतीं ते, वनांतीं
प्राणांचे रोध तेही करुनि निरशनें तीक्ष्ण पंचाग्नि घेती।
तेही तूझ्याच अर्थीं श्रुतिगदित सदाचारकर्त्या नरातें
होईना भेट तूझी, परम यश दिलें भेटुनी वानरांतें ॥ ३२ ॥
यासाठीं भक्ति तूझी अतितर विलसे, श्रेष्ठ नेणोनि तीतें
मायाऽहंकारयोगें करिति तव तरी पावतीना गतीतें।
विघ्नांच्या संकटीं ते पडति बहुतरा; भ्रष्टती साच अंतीं
भक्तीनें विघ्न माथां पदकमळ सुखें ठेविलें जें महंतीं ॥ ३३ ॥
भक्तीनें श्रेष्ठ पार्थादिक बहु तरले, कीर्ति अद्यापि त्यांची
तारी लोकांसि, तूझ्या विमलगुणरतें रंगली भाविकांची।
नाना कष्टें उदंडें खळरिपुजनितें जिंतिलीं त्वत्प्रसादें
त्यांचा तूं पक्षपाती घडुनि वसविलें त्वत्पदीं नित्य मोदें ॥ ३४ ॥
घोडीं ध्यावीं तयांचीं; कवण करि असें नीच सारथ्यकर्मा ?
उष्टींही काढिजे कां परघरिं ? करणें काय त्या दौत्यधर्मा ?।
मोठें तूझेंचि वाटे नवल अपुलिया लोपिलें ईश्वरत्वा
सद्भक्तांच्या प्रतापा मिरविसि, अमला सादरें शुद्धसत्वा ॥ ३५ ॥
पांचाळीचीं कितीदां परिहरुनि महासंकटें लाज तीची
तां, देवा ! राखिली कीं विनययुत तुझ्या पादपद्मीं सतीची।
अश्वत्थामास्त्रतापें जळत निरखिलें, रक्षिलें गर्भवासीं
देवा ! तां देवराता; मग अभय दिल्हें प्रार्थितां उत्तरेसी ॥ ३६ ॥
गर्भीं तूला विलोकी; मग पुसत असा कोण तूं चक्रधारी
माझ्या संरक्षणातें करिसिल ? बहुधा तूंचि होसी मुरारी
त्वद्भक्तीच्या प्रभावें जननिजठरिच्या बाळकानें परीक्षा
झाली, तूझ्या कृपेनें नवलचि न घडे त्वज्जनांतें, सुदक्षा ॥ ३७ ॥

मातातातांसि रागें त्यजुनि अनुसरे, पोळला वाक्यबाणें
पांचा वर्षां वयाचा तुज अनुसरला बाळ सेवोनि रानें ।
बैसे तूझ्याच पायीं ध्रुव धरुनि बरा ध्यानयोगासि सारी
तों त्यातें श्रेष्ठ दिल्हें अचळपद तुझें, दीनपाळा ! मुरारी ॥ ३८ ॥
प्रऱ्हादातें पिता तो तव भजनरता प्राणनाशांत दंडी;
नाना शस्त्रें, विषाग्नीं, गिरिनिधिसलिलीं, नागपाशांत कोंडी ।
ना त्यागी भक्ति तूझी, म्हणउनि घडलें धांवणें रक्षणार्थीं
स्थूणागर्भासि येणें उचित, हरि ! तुला स्वाश्रितापक्षपाती ॥ ३९ ॥
स्थूणा पैतामहीतें नियतचि घडली भाविनी ब्रह्मयाची
ऐशीं तूझीं चरित्रें अमित वदवती अद्भुतें केंवि वाचीं ? ।
हें सारें भक्तियोगाविण घडल कसें ? सांग तूं, पांडुरंगा
धन्यातें प्राप्त झाली तव पदकमलीं जन्मली भक्तिगंगा ॥ ४० ॥
पूर्वींही शोध केला बहुत बुधजनीं वेदशास्त्रें, विचारें
देवा ! ज्ञानाहुनीही अधिक निवडली भक्ति लक्षाप्रकारें ।
या भक्तीच्या प्रतापें जडमति तरले, पावले त्वत्पदातें
गोपी, गोपाळ, गायी, वनचर, फिरणें मागुती नाच जेथें ॥ ४१ ॥
गोपी त्या कामबुद्धिस्तव रमति तुसीं जारभावें मुरारी !
सख्यें गोपाळ तेही तवपदिं रतले दैवयोगें विचारी ।
पुत्रत्वें नंदगोपादिक बहु तरले पार्थ ते आप्तभावें
ज्ञातित्वें यादवांतें नियतचि घडलें मुक्तिपंथासि जावें ॥ ४२ ॥
द्वेषें केशिककुद्मप्रभृति असुर ते पावले धाम तूझें
भीतीनें कंस तोही तव पदिं मिनला; टाकिलें भ्रांतिवोझें ।
भक्तीनें नारदादिप्रियजन तरले; उद्धवाऽक्रूर तेही
कोण्या एक्या मिसेंही तुज भजति, तयां फीरणें साच नाहीं ॥४३॥
दिल्हें बीभीषणातें सहज पद तुवां हेळणेनें, दयाळा !
तें तों ब्रह्मादि देवां दशशिरहवनें नेदवे रावणाला ।
ऐसें औदार्य तूझें प्रकट त्रिभुवनीं, जाणता जो भजेना
या हानीहूनि हानी मग कवण असे ? विठ्ठला ! जाजवेना ॥४४॥
नक्रें पायीं गजेंद्रा कवळुनि सलिलीं वोढितां, अन्य कोणी
नाहीं रक्षावयातें, म्हणुनि तुज तदां चिंतिलें चक्रपाणी ।

पद्मासी हस्तपद्मीं धरुनि करिं करा काढिलें देवराया !
दोघे नेले विमानीं बसवुनि, करुणासागरा ! मूळ ठायां ॥ ४५ ॥
देवेंद्राच्या प्रसंगा निरखुनि, मुनिनें शापिली जैं अहल्या
झाली मोठी शिळा ते, बहु दिवस वनीं राहिली वज्रतुल्या
केली तैं शुद्ध पादांबुजरजविभवें तत्क्षणीं पंकजाक्षी
ऐशी तूझी विचित्रा पदरजमहिमा वर्णिती वेद साक्षी ॥ ४६ ॥
पाप्यातें पुत्रमोहें सहज मुखपुटीं नीघतां नाम तूझें,
नेला वैकुंठलोका, अवगणुनी महापातकें दुःखबीजें; ।
ऐसी हे पद्मनाभा, धरिसि जरि मनीं दाविसी योगमाया
नाहीं तैं पुण्यकर्त्यां न दिससि नयनीं एकदांही नमावा ॥ ४७ ॥
वेश्या ते पापरूपा, नरकपुरमहाद्वारतुल्या, अमान्या
झाली तूझ्या कृपेनें अमल अतिशयें, पिंगळा लोकमान्या ।
ते गेली ज्या पदातें न व्रजति नियमें हंस संन्यासयोगें
त्वद्भक्तीचें सुरेंद्रा, फळ अतुळ असें, वेद सिद्धांत सांगे ॥ ४८ ॥
पापी ब्रह्मांडगर्भीं मजहुनि दुसरा शोधितां आढळेना
म्यां नाहीं पाप केलें जगिं कवण असे राहिलें; हें कळेना ।
दीनानाथा, दयाळा, नरहरि, करुणासागरा, पापनाशा
आलों मी पादपद्मा शरण परिहरीं यातना रुक्मिणीशा ॥ ४९ ॥
तूझ्या, देवा, दयेनें अघटित घडतें, पाप त पुण्य होतें,
होतां तूझी उपेक्षा, सकळहि सुकृतें पाप होती यथार्थें
यासाठीं भक्तिहीनीं करुनि शतमुखें भोंवती चक्रवातीं
भोगायालागिं जाती सुरयमसदनीं, मृत्युलोकासि येती ॥ ५० ॥
यासाठीं भक्ति देईं तव पदकमळीं सर्वदा, देवराया
भक्तीच्या या प्रभावें तरत अतिशयें दुर्धरा विष्णुमाया ।
दारापुत्रार्थ गेहीं दृढ जड ममता पाशविच्छेदकारी
देईं विज्ञान तूझें मज, जगतिपर्ता, मुक्तिदाता, मुरारी ॥ ५१ ॥
आधीं वैराग्य यावें, दृढतर विषयीं तुच्छता होय जेणें
नेच्छीं मी स्वर्गलोका, विमल विधि यदा; नाशवंतासि जाणें ।
भक्तीच्या या सुखातें विधिपदसुख तें षोडशांशा मिळेना
तेव्हां तें काय कीजे मज सुरपदवी निंद्य ते कां जळेना ॥ ५२ ॥

प्यालों त्वद्भक्तिदिव्यासव, मज चढली मत्तता; मी गणेना
आतां कोण्या सुखातें, तुजविण दुसरें साच चित्तीं स्मरेना ।
गेलें कर्माख्य माझें वसन गळुनियां; त्वत्कृपें मुक्त झालों
लोकांची काय आतां मज गरज ? विभू, विठ्ठला, मी बुझालों ५३

चित्तीं चिंता कशाला मज ? तुज असला मस्तकीं स्वामि जेव्हां
नालोकीं मी धनांधा कुमति नृपगणा मंदभाग्यासि तेव्हां ।
लक्ष्मीचा कांत माझा जनक, जननि, तूं इष्ट, बंधू, उदारा
दाता सर्वा सुखांचा असुनि फिरन मी काय दुर्भूपदारा ? ॥ ५४ ॥

तूं चिंतारत्न माझें; परिहरिसि, हरी पापिणी घोर चिंता
तूं माझी कामधेनू; सकळ पुरविसी काम माझे, अनंता ।
तूं माझा कल्पशाखी; सकळ करिसि तूं पूर्ण साधी विशाला
मी तूझ्या सर्वभावें शरण पदयुगा, अन्य इच्छूं कशाला ? ॥ ५५ ॥

आतां साष्टांग माझें नमन तव पदीं, भानुकोटिप्रकाशा
विश्वाया, विश्ववंद्या, विमलगुणमयां विठ्ठला, इंदिरेशा ।
केलें म्यां स्तोत्र भावें अतिजड मतिनें, सादरें अंगिकारीं
प्रेमाचे बोल माझे अखिलजननुता, विश्ववंद्या, मुरारी ॥ ५६ ॥

या स्तोत्रातें पढे जो तव पदनिकटीं भक्तिभावें त्रिकाळीं
या लोकीं पूर्ण पावो सुख, विभव; पुढें मुक्ति देवोनि पाळीं
गोपाळा, हेचि माझी अतिशय विनती, साच कीजे, कृपाळा
दासां सांभाळकर्ता तुजविण न दिसे, दीनबंधू निराळा ॥ ५७ ॥

श्रीमाधवात्मज निरंजन राजयोगी
स्तोत्रें स्तवोनि विभु विठ्ठल, मुक्ति भोगी ।
स्तोत्रें सुधी पढुनि केवळ सौख्य पावा
वाग्रत्नदीप उजळा तुम्हि, देवदेवा ॥ ५८ ॥

इति श्रीमत्कविनिरंजनमाधवविरचित पांडुरंगस्तोत्र.

---

## १५. व्यंकटेशस्तोत्र.

कुलस्वामी माझा त्रिभुवनपती, वेंकटपती
सदाही सद्भावें सुरमुनि महाभक्त जपती ।
तुझ्या पायां मी या सतत नमितों, दीनशरणा
प्रभू, पंचक्लेशात्मक भवनिधीमाजि तरणा ॥ १ ॥

त्यजोनी वैकुंठा, भुजगगिरिमाथां विलससी,
तथापि त्रैलोक्यीं भरुनि, विभु, संपूर्ण असशी ।
जनाच्या उद्धारा प्रकटुनि महीमाजि विभवा
महामाया तूझी अकळ विबुधेंद्रा विधिभवां ॥ २ ॥

महालक्ष्मी तूझ्या हृदयकमळीं नित्य निवसे
तिला विश्रामातें आणिक दुसरें स्थान न वसे ।
प्रिया तूझ्या ठायीं अचपळ गुणें साचचि रमे
जिला ब्रह्मेंद्रांच्या सदनिं पळ तेंही न करमे ॥ ३ ॥

तळींचा जो होता फणिपति महातल्प घडला
स्वरूपें शैलाच्या तव पदतळीं शीघ्र जडला
नदीस्वामी तीर्थाभिध निकट देवोनि विरजा
हरीते लोकांच्या सकळ कलिसंभावित रजा ॥ ४ ॥

सदा जे वैकुंठीं हरिजन तुझे मुक्त वसती
महाद्रीच्या शृंगीं तरुउपलभावें निवसती ।
तुझ्या संगीं ज्यांतें सतत रमणें, श्रीप्रियकरा !
तयां कंठे कैसें तुजविण पदीं भक्तनिकरा ॥ ५ ॥

तुझ्या ज्या वीभूती असति अणिमाद्यष्ट, महती
वसोनी प्राकारीं करिति भजकांच्या श्रमहती ।
महापीयूषाचा निधि सरस नैवेद्यपद वी
स्वयें अंगीकारी, सकळजनसौभाग्यपदवी ॥ ६ ॥

तुझ्या चारी मुक्ती विभुसदन दारींच वसती
तुझ्या सेवे येती जन सुजन त्यांलाच पुसती ।
ध्वजस्तंभाकारें गरुड निवसे सन्मुख, हरी
जनाच्या तापातें क्षण न लगतां जो परिहरी ॥ ७ ॥

महानंदाचा हा कळस झळके गोपुरवरी
तुझ्या सद्भक्तांतें क्षणिं निरखितां त्यांप्रति वरी ।
सदा प्राकारत्वें प्रणव घडला साच दिसतो
दिठीं लाहे ज्यातें अमृतमय त्यालाच दिसतो ॥ ८ ॥
पहा श्वेतद्वीपें धवळ रचिल्या पर्वतशिळा
दुर तैं पापाचा मळ निरखितां कुत्सितशिळा ।
निधी नौहीं झाले नव दिवस नौरात्र बरवे
तदा ब्रह्मा देवांसहित मुनिसंघेंचि मिरवे ॥ ९ ॥
वनें, पुष्पें, वल्ली, फळ, जळ, असे दिव्य शिखरीं
सुरीं नाना रूपें धरुनि असिजे हे श्रुति खरी ।
चहूं वेदीं तूझी अमित महिमा वर्णित दिसे
पुराणां शास्त्रांतें तुजविण दुजा ठाव न दिसे ॥ १० ॥
रमाकांता ! तूझी अचळगुणसंपत्ति वदतां
गणाधीशा झाली म्हणति अमळा एकरदता ।
फणींद्राची जिव्हा चिरुनि घडली दोनि तुकडे
विधाता चौं तोंडें गणुनि बसला येकिचकडे ॥ ११ ॥
रथोत्साहीं तुझ्या विधिहर करीं वेत्रधर ते
सदा सेवेमध्यें असति, विभु, संलग्न पुरते ।
सुरेंद्राच्या कोटी नमिति विधुसंघांबरमणी
महासंघर्षें तैं गळति मुकुटाचे वर मणी ॥ १२ ॥
अनंतब्रह्मांडोदरगत जन उत्सव घडे.
समस्तांचे दैवें, प्रभु, तव कृपाद्वार उघडे ।
जगाच्या कल्याणास्तव निघसि तूं दिव्य वहनीं,
सुधासारें दृष्टी भरति वरदा याच अहनीं. ॥ १३ ॥
रथीं जेव्हां, देवा, वळघसि, महावैभवधरा,
त्रिलोकीलोकांहीं अतिशय घडे पीडित धरा ।
सुरां, मर्त्यां, नागां, मिसळण पडे याच दिवशीं
तदा साने मोठे म्हणुनि कवणा कोण गिंवसी ? ॥ १४ ॥
सहस्राक्षाचींही नयनकमळें तैं न पुरतीं,
महाशोभा पाहूं म्हणति अमला दिव्य पुरतीं; ।

तदा दों नेत्रांच्या लघुतर नरां कैं निरखवे ?
न माये ब्रह्मांडीं किति म्हणुनि तैं या हरिखवे ॥ १५ ॥
सुरेंद्राच्या वामा वरुषति शिरीं दिव्य सुमनें
महानंदें गाती चरित भजतां नित्य सुमनें ।
महावाद्यांचेही गजर सुरगंधर्व करिती
नटी नाट्यारंभीं अभिनय कळायुक्त धरिती ॥ १६ ॥
अशा पुण्योत्साहीं भजति नियमें भक्त तुजला
यथाशक्ती पूजा करिति; तुळसीपुष्पसुजळां ।
समर्पोनी तूतें, नमिति चरणीं ते तव पदीं
महामोदें क्रीडा करिति तुजसीं त्यक्तविपदीं ॥ १७ ॥
महानंदाचा तूं जलधि, सुरशाखी निजजनां;
समस्तांच्या चित्ता करिसि अति उत्साह भजना ।
फळाचा दाता तूं; तव पदिं जया काम निवसे,
तयाच्या हस्तीं ते परम पद संपूर्ण गिंवसे ॥ १८ ॥
महायात्रे येथें मिळति धरणीमाजि जितुके
नरांचे नारींचे गण सधन येवोनि तितुके ।
विचित्रें ते लेणीं विविध वसनें भाषण तसें
समस्तांच्या चित्ता कुतुक परभारें करितसें ॥ १९ ॥
विचित्रां वर्णांच्या विलसति पताका, ध्वज किती
ध्वनी वाजंत्रांच्या सुरपति निशाणासि जिंकिती ।
विमानांच्या दाटी कुतुक निरखूं पाहाति सती,
सुरांगंधर्वांच्या अतुळ विभवें ज्या विलसती ॥ २० ॥
त्रयस्त्रिंशत्कोटी जगतिस वसे तीर्थगणना
प्रसिद्धत्वें अन्यें न सरति कदा लेखगुणना ।
समस्तें ते येथें अहिगिरिस सौख्यें निवसती
स्वपापाच्या नाशा विचरुनि सुमोदें विलसती ॥ २१ ॥
समाधी ये स्थानीं सहजचि सुषुप्ती मन लयें
तपें होती येथें करुनि वसतां दिव्य निलयें ।
महापापें तेही घडति सुकृतें भोग समुदा
वैंडे, देवा, तुझ्या भुजगशिखरीं कारण मुदा ॥ २२ ॥

महाशापें कैसा अजगर घडे तुंबर मुनी ?
पडे शैलीं, दैवें त्रिदिव वळघे तूज नमुनी ।
पहा मोठे मोठे ऋषिवर गुहेमाजि वसती,
स्वरूपें जे मध्यंदिनइनसमत्वें विलसती ॥ २३ ॥

विधि प्रार्थी तूतें, त्रिभुवनविभूतें, सुविनयें
रचीतों मी सारें जग; तदपि मातें यश नये ।
वृथा जातो माझा श्रम, सकळ ते व्यर्थ मरतां
न जाती मुक्तीतें तव भजन तें नानुसरतां ॥ २४ ॥

तयांतें मुक्तीची करिसि घटणा स्वल्प सुकृतें,
तदा होती माझीं नियत अवघीं सार्थक कृतें ।
अशा या दीनोक्ती परिसुनि, कृपापूर्ण वचनें
तया आज्ञा केली, विधि करित जा लोकरचने ॥ २५ ॥

असे माझ्या येथें धरणिवरि हा पन्नगगिरी;
वसें मीही साक्षात्करुनि वरवी पुण्यनगरी ।
स्वभावें जे येती नर, तरति पाहोनि मजला
पदा जाती माझ्या नियत कथितों व्यक्त तुजला ॥ २६ ॥

किती पूर्वीं त्वांही त्रिभुवनतुता भक्त घडिले !
गिरिशृंगीं आले सकळ निजधामा दवडिले ।
नसे इच्छा ह्यांतें, तुजविण, निजानंदभुवनीं
प्रभू, वैकुंठींची अभिलषिति हे पुण्य अवनी ॥ २७ ॥

स्वजन्मातें कैसे सुर सकळ धिक्कार करिती ?
जरी दीर्घायुष्यें धरिति, अति संपत्ति वरिती ।
अम्हां नाहीं कैसें जनन घडलें या कलियुगीं
महीपृष्ठीं ? व्यर्थ प्रळय अनुभोगूं प्रतियुगीं ॥ २८ ॥

असोनी आम्हांतें वदनकमळीं लंबरसना,
प्रसादाचा यीणें तरि निरखिला काय रस ना ? ।
सुधा पीतों आह्मीं तदपि हरिनैवेद्यगरिमा
नये यीतें; आह्मां कधिं करिल हे मुक्त तरि मा ? ॥ २९ ॥

असोनी हें नेत्रें शिखिवरसिखंडाक्षसम तें
न होती आम्हांतें म्हणति कधिंही सौख्यसम ते ।
नसे कीं पुष्पांगीसहित हरि डोळां निरखिला,
सुरेज्याच्या वारीं वरि सुमनवर्षें वरखिला ॥ ३० ॥

अम्ही स्वर्गीं भोगूं सुख, असुख, संपत्ति दिस तें
वृथा गेले कैसे ? विषयरसिकां फार दिमते, ।
जवादी, कस्तूरी, घसृणरस, संयुक्त स्नपना
न देखों कीं आम्ही, वर म्हणवितों काय अपणा ? ॥ ३१ ॥

अम्ही नाहीं झालों तृणलघु तरी, काद्रवनगीं
वृथा वाहूं वोझें मणिखचित जांबूनदनगीं ।
सदा सद्भक्तांच्या पदकमळकिंजल्करजसा
न वाहोनी नेला त्रिदिवपदिंचा जन्म रजसा ॥ ३२ ॥

अम्हीं नाहीं प्यालों, सुख असुनि, पादामृतरसा
कसे सोसूं आतां भवरुज महाघोरतरसा ! ।
'हरी, गोविंदा,' हें वदुनि करताळी न पिटिली
जिणों नेणों कैशी जनिमृति अविद्याभ्रपटलीं ? ॥ ३३ ॥

अशा पश्चात्तापें तळमळिति, देवा, अमर ते
बरे कीं त्याहोनी तव निकटिचे दीन नर ते ।
तुझ्या सन्मूर्तीतें निरखिति सदां दृष्टि भरुनी
सुरांतें स्वर्गींच्या जिणिति विभवें हास्य करुनी ॥ ३४ ॥

धरा माथांची ते त्यजुनि, वरि आला फणिपती
वराहातें शंका प्रबळ गमली तैं, सुरपती ।
पुन्हा गेली पृथ्वी अधर जरि पाताळभुवनीं,
महा लागे तेव्हां श्रम मजचि, हे भूमिअवनीं ॥ ३५ ॥

तदां ये श्रीशैलीं; धरणि धरिली अंकफल कीं
तुझ्या या सेजारीं बसुनि जग केलें सफळ कीं ।
तुझ्या तीर्थीं न्हाती, निरखिति तया लोक नयनीं,
तम्हां ऐसें तेही पहुडति सुखें शेषशयनीं ॥ ३६ ॥

तुला पाहू आला मदन अहिशैलीं, प्रभुवरा;
स्वरूपाच्या दर्पें बहुत चढला त्यासि तिवरा।
तुझ्या रूपा लाजे त्यजुनि निजदेहा, सुरपती,
अनंगत्वें हिंडे अझुणिवरि लोकीं रतिपती ॥ ३७ ॥

तुझ्या सौंदर्याची त्रिभुवनिं तुला एक न दिसे
महालक्ष्मी झाली पदकमळभृंगी मज दिसे।
नखीं चंद्रज्योत्स्ना अमित निरखी भ्रांतमनसें
महानन्दें लोधे; किमपि तिज देहीं स्मरु नसे ॥ ३८ ॥

पदीं शोभा रातोत्पलदळ तसी कोमलपणें.
दिसे नाना चिन्हें ध्वज, कुलिश रेखादि टिपणें।
प्रवाळाभाटांचा, प्रपद लसती कूर्मसम ते;
नये लोकीं कांहीं अणिक दुसरें यासि समते ॥ ३९ ॥

बरें घोटें नीलोत्पलसदृश तेही विलसती,
स्मराचे तूणाभें अति मृदुल जंघा निवसती, ।
रणन्मंजीरश्री मुनिजनहृदब्जा विकसवी;
जणों सद्बोधें तें मन नियत ठायींच बसवी ॥ ४० ॥

उरू केळी दंडोपम; वर नितंबें युत कटी.
महामोलाचा हा पट तदुपरी पीत तकटी।
क्वणत्कांचीदामा अमल मणियुक्ता मिरविसी
तयाची ते शोभा दिसत अमितोदार रविसी ॥ ४१ ॥

वटाच्या पत्रांची उदर समता, मार्दव, धरी
सुनिम्नत्वें नाभीन्हद अमृतकूपासि अधरी।
सुरोमाळी काळी दिसत बरवी भृंगपटली
विकासें कंजाच्या मज गमत आतांचि सुटली ॥ ४२ ॥

त्रिरेखा त्या रम्या, त्रिजग–उदरीं सीमसरिता
तसी वाटे मातें, त्रिभुवनपती; ध्यान करितां।
विशालत्वें वक्षस्थळ अवगणी फार गगना
धरी ताराकारें अति धवल त्या मौक्तिकगणा ॥ ४३ ॥

भुजा चाऱ्ही शाखा विलसति जशा कल्पतरुच्या
  स्वदीप्तीनें केल्या मरकतमणीच्या हतरुच्या ।
सनाळें तैसी तें विलसति बरीं पाणिकमळें,
  स्वभक्तांतें देती अभयवरदानें सुविमळें ॥ ४४ ॥

करें एकें संज्ञा क्षितितळचि वैकुंठ, म्हणुनी
  दुजा दावी भक्तां कटिसम भवाब्धीस करुनी ।
पुन्हां दों हस्तांनीं धरि अमल दोनी अरिदरी
  त्रिलोकाचीं दुःखें परिहरुनि, घे दीन पदरीं ॥ ४५ ॥

अनर्घ्यां रत्नांची जडित दशमुद्रांगदकडीं,
  कृता नाना शोभा स्वतनुवरि भागें वरकडीं ।
पहा, श्रीवत्साचें परम धरिलें भूषण कसें,
  जसें फुल्लांभोजीं आणिक दूसरें पद्म विकसे ॥ ४६ ॥

हृदंभोजीं पादांबुज द्विजवराचें विलसलें,
  म्हणोनी लक्ष्मीतें पद अचळ तेथें गिंवसलें ।
वसे जेथें नित्योत्सवयुत सती प्रेमभरिता
  त्यजी चांचल्यातें निधिस मिळतां जेंवि सरिता ॥ ४७ ॥

त्रिरेखा ते कंठीं जलजवर शोभा वरितसे
  स्वदोर्दंडें लक्ष्मी सदृढ परिरंभें धरितसे ।
तसा या बंधूच्या सतत निकटीं कौस्तुभ वसे
  सुधाब्धीच्या बाळा वसतिस दुजा ठाव न दिसे ॥ ४८ ॥

मुखाची तों शोभा मदनशत वोंवाळुनि बरी
  सहस्रार्ची दीपें नियत कुरवंडीस विवरी ।
म्हणों ये तैं कैसा सम तरि शशी पूर्णवदना,
  समस्ता शोभेच्या विमलसुखसंपत्तिसदना ? ॥ ४९ ॥

मुखीं शोभे मंदस्मित; नयन कारुण्यविभवें
  कळा चंद्रीं ऐशा नसति म्हणुनी तो अभिभवे ।
कलंकी तत्रापी करिल समता आस्यकमळा
  घडेना, कंजाक्षा सुचति नुपमा आणिक मला ॥ ५० ॥

सुवृत्ताकारें तें परम मुखपंकेरुह दिसे
  जगीं शोभा कोणी चुबुकवर या साम्य न दिसे ।
नये त्याही बिंबा तव अधरबिंबासि समता
  रदीं कुंद ज्योत्स्ना, धरि उपमितां ते असमता ॥ ५१ ॥

दधि, क्षीरा, मुक्ता, मणि, शशि, सुधा, शंख, धवला,
  जिणे तूझी मंदस्मितरुचि न कीजेचि नवला ।
तिळांच्या पुष्पांची जड असम नासासि उपमा;
  कळी चांप्याचीही अघड शुकतुंडा अनुपमा ॥ ५२ ॥

पुराणीं वाखाणी मुनिनयनपद्मासि समता
  मला मानेना तें, कमल–उपमा ते असमता ।
तुझ्या नेत्रा भासावरुनि, जड पंकेरुह कसें ?
  जगीं रूढे इंदीवर म्हणुनि तोषेंचि विकसे ॥ ५३ ॥

कटाक्षस्नेहें जे अमितजनसंताप निवटी,
  दिठी, देवा, तूझी सुजनहृदयीं ज्ञानदिवटी
प्रकाशी ऐशी हे अमित महिमा यीसि समता
  घडेना पद्माची, ह्मणुनि न वदें मी अभिमता ॥ ५४ ॥

तुझीं हीं भ्रूयुग्में स्मरधनु असें जे उपमिती
  कवींतें मी मानी जडमति; नसे त्यां अनुमिती ।
स्मराच्या मातेतें तुज निरखितां मोह पडिला
  मनीं सौंदर्याचा मद अमित होता, विघडला, ॥ ५५ ॥

विशाळा या भाळीं मृगमदटिळा भूषित दिसे
  यया लोकीं यातें अणिक उपमा साच न दिसे ।
मुखेंदू हा तुझा अमल असतां, श्रीप्रियकरा,
  कळंकत्वें शोभे तिलक जनिता तोषनिकरा ॥ ५६ ॥

बरे माथांचे हे कुरळ अळिमाळा कृति, पहा
  मुखाब्जीं हे तूझ्या विलसति, रमा मानअपहा
श्रुतीं सद्रत्नांचीं मकरनिभ तें कुंडलयुगें;
  प्रभा गल्लद्वंद्वीं प्रकट करिती तें अनुयुगें ॥ ५७ ॥

किरीटज्योत्स्ना ते अमित शशिसूर्यासम गमे
विचित्रां रत्नांनीं जडित रचिलें काय निगमें ।
समस्तां वेदांतीं अति अमल जें तत्व विलसे,
मिसें या माथांचे मुकुट घडुनी फारचि लसे ॥ ५८ ॥

प्रभा देहीं नीळी गगनजलदाभें प्रकटली,
तमाळाची इंद्रोपलकसुदभा जेंवि नटली; ।
तथापी जे साजे मणिपदकदीप्ती सुललिता,
घनीं जैशी शोभे परम चपला ते प्रचलिता ॥ ५९ ॥

समस्तां सौंदर्या, विभु, तव वपू आस्पद असे
विलोकूं प्रत्यक्षें कथिति सुरवागीश्वर असें ।
तुझ्या नाना क्रीडा करिति जगसंमोहन, परी
अरूपी तूं रूपा धरिसि नट तैसा बहुपरी ॥ ६० ॥

तुझ्या कोणा कांहीं कळल, न घडे, अंत सुरसा;
पहावें तों मायारहित दिससी रम्य अरसा ।
तुझ्या ठायीं बिंबें सकळ प्रतिबिंबें त्रिजग हें;
महादर्शी जैसें नगर अथ रज्जू भुजग हें ॥ ६१ ॥

असें, देवा, तूझें स्वरुप अपरिछिन्न विलसे
तयातें नेणोनी जन अनुभवी दुःखवळसे ।
तसा मीही देवा भ्रमुनि तव मायागुणवशें,
अनंता जन्मांचे श्रम फळचि घेवोनि, जि, वसें ॥ ६२ ॥

तुझ्या दासाचा मी न करुनि कसा संग फसलों;
तुझ्या अज्ञानें मीं जनिमरण भोगीत बसलों ।
अविद्याक्लेशांतें अनुभवितसें नित्य नवसे
यथां कष्टें मातें किमपि तरिही सौख्य न वसे ॥ ६३ ॥

पुढें आतां, देवा, किति दिवस ऐसेंचि असिजे ?
प्रमोहाच्या तापें तनु निरयकुंडीं बहु सिजे ।
कृपा तूझी व्हावी तरिच सुटका होइल मला,
न लिंपे अज्ञानोद्भव असुखलेशा कलिमला ॥ ६४ ॥

दयाळू दीनांचा ह्मणुनि स्वपदीं ब्रीद धरिसी;
प्रतिज्ञा हे केव्हां तरि प्रभुवरा साच करिसी ?।
महापापी आहें. मजहुनि जगीं कोण दुसरा,
जयाच्या अर्थीं तूं करिसि निजवात्सल्यपसरा ? ॥ ६५ ॥

महास्वामी पूर्वीं मजहुनि महापापनिपुणा,
मिसें स्वल्पें त्यातें पर पद दिल्हें तुल्य आपणा ।
प्रभूजी, माझा कां विसर न कळे आजि पडला ?
न कां मद्भाग्याचा अझुणिवरि ठेवा उघडला ? ॥ ६६ ॥

स्वभक्तांसाठीं तूं कळकळिसि, त्यां कष्ट पडतां;
स्वकर्माच्या भोगें अतितर तयां दुःख घडतां ।
त्यजोनी वैकुंठा पळसि लवलाहे क्षितितळा
खगेंद्राच्या खांदीं बसुनि अथवा जासि सुतळा ॥ ६७ ॥

गजेंद्रासाठीं तूं झडकरुनि आलासि, वरदा
स्वचक्रें नक्राच्या विदळण करोनी सुखरदा, ।
विमानीं वाहोनी निजपुरिस नेला, प्रभु, तरी
भवाब्धीच्या लोटीं घडसि सुजना तूं सुखतरी ॥ ६८ ॥

ध्रुवा बाळासाठीं परम पद निर्माण करुनि,
तया दिल्हें, देवा, अचळ अति वात्सल्य धरुनि ।
पदा नेली दुष्टा स्तनविषरसा पीउनि बकी
पवित्रा ते केली परम असतां पापझुबकी ॥ ६९ ॥

हरी, तां पांचाळी निरखुनि सभेमाजि उघडी
न लागे तों येसी सजुनि वसनें तें पळघडी ।
असी तूझी दासीं असुनि, सुरनाथा, अतिदया
उपेक्षावें दीना मज उचित कीं, दिव्यउदया ? ॥ ७० ॥

लयोदीं भक्तार्थीं धरुनि झषरूपें, नरहरी,
हयास्याचा केला वध विहित, जो कां श्रुति हरी ।
महाबोधें सत्यव्रत नृपति तारोनि, सुखदा,
उपेक्षावें मातें ? जगिं घडल हांसें खदखदां ॥ ७१ ॥

समुद्रीं देवांहीं मथन करितां मंदरगिरी
स्वपृष्ठीं वाहोनि बससि फिरतां तो गिरिगिरी; ।
अशा कूर्मा तूला नमन, अमृता पाजुनि सुरां
दिल्ही दैत्येशांतें, कपटयुवती होउनि सुरा ॥ ७२ ॥

धरा नेली दैत्यें बळ करूनि पाताळविवरीं,
महाकष्टें ध्यानीं धरुनि विधि तूझें पद वरी ।
तदा तूं, कंजाक्षा, धरुनि महती सूकरतनू
वधोनी दुष्टातें क्षिति वसविली तूंचि अतनू ॥ ७३ ॥

सुभक्ता प्रल्हादास्तव प्रकट खांबांत घडसी
नृसिंहाकारें तूं कडकडुनि दाढा रगडिसी ।
हिरण्याच्या पोटा चिरुनि निजजानूवरि खळा
बरें केलें देवा, रडति दिनरात्रीं खळखळां ॥ ७४ ॥

बळीच्या द्वारीं तूं सजुनि बटुवेषें सुरहिता
स्वयें भिक्षा घ्यावी विहित तुज; आशाविरहिता ।
तयाची पाताळीं स्थिति करुनि तद्वार धरिसी
स्वभक्ताचें ऐसें प्रकट यश लोकांत करिसी ॥ ७५ ॥

पुरा क्षत्री झाले धरणिवरि उन्मत्त विभवें
नव्हे त्यांचें दर्पक्षयकरण शक्रें विधिभवें ।
तदा धर्मात्मा तूं परशुधर होतां भृगुपती ।
क्षया नेले राजे, बुधविबुधचित्तांत खुपती ॥ ७६ ॥

पित्याच्या आज्ञेनें सहज फिरतां दंडकवनीं
मिसें या सीतेच्या वधुनि दशतुंडासि, अवनीं; ।
तदा केली भाराविरहित; असी कीर्ति पडली
वसे, रामा, लोकीं त्रिभुवनाशिरीं हीं प्रकटली ॥ ७७ ॥

सुरांच्या त्रातारा, क्षितिवरि महाराज्य करितां
प्रजा साऱ्या तुझ्या विहरति सदानंदभरितां ।
समस्तांतें लोभें भरण करुनी, मोक्षपदवी
दिली सर्वा लोकां. श्रुति स्मृति मुखें हेंचि वदवी ॥ ७८ ॥

महादैत्येंद्रांहीं वसुमतिस राजेश्वरकळीं
स्वसामर्थ्यें होतां, धरणि अति भारें कळकळीं ।
विधी प्रार्थी तूतें तप करुनि गोब्राह्मणहिता
म्हणे, 'धर्मा रक्षीं, वधुनि तमरूपासि अहितां' ॥ ७९ ॥

तदा पृथ्वीपृष्ठीं अवतरुनि तूं, यादवपती
सुरांचीं सत्कार्यें करुनि रिझवीला सुरपती ।
स्वकीर्तिच्या नावा रचुनि दिधल्या फार सुजना
न जावें त्यां लागे भवनिधि तरायासि विजना ॥ ८० ॥

तुझी बाळक्रीडा त्रिभुवनजना मोहित करी
वसोनी नंदाच्या सदनिं करिसी जे हितकरी ।
यशोदा आनंदांबुधिं तुज निरीक्षोनि सतता
निमग्ना ते झाली, चरितरसकल्लोलविततां ॥ ८१ ॥

प्रभू, तूं गोपाळांसह विचरतां गोधनगणीं
तदा केला दैत्यक्षय अमित; त्या कोण विगणी ? ।
महेंद्राच्या दर्पा हरुनि धरिला पर्वत करीं.
व्रजाचा कैवारी म्हणविसि महोत्पातनिकरीं ॥ ८२ ॥

फणी काळा होता दिनकरसुतानिम्नसलिलीं
असेव्या ते झाली अतितरविषोद्गारकलिलीं ।
तयातें दंडोनी अमृतमय केली सुसरिता
अशा लोकीं लीला तुजविण जगीं कोण करिता ? ॥ ८३ ॥

दवाग्नी भक्षावा, कवण असलें हें बळ धरी ?
नसे लोकीं कोणी तुजसह विरोधें छळ धरी ।
महाराजे कंसादिक अमित तूझ्या करतळीं
विनाशा पावोनी, रणिं पहुडले या क्षितितळीं ॥ ८४ ॥

कुरुक्षेत्रीं केलें कुरुमथन तां पांडवमिसें
न दे धर्मा जो कां खळ गिळुनि सद्राज्य आमिसें ।
सुगीता पार्थातें परम उपदेशासि करुनी
महापीयूषाची जगिं विरचिली वृष्टि भरुनी ॥ ८५ ॥

क्षितींद्रांच्या कन्या हरुनि निजतेजें भुजबळें
समस्तेंही केलीं हतमद महाक्षत्रियबळें ।
प्रियेच्या संतोषा सुरतरुसि या मृत्युभुवनीं
प्रतिष्ठी केली, तां जिणुनि सुरवर्गा गृहवनीं ॥ ८६ ॥

उदारा त्वद्गाथा श्रवण करितां सज्जनवरीं
बसावें वैकुंठीं, म्हणति मन आश्चर्य न वरी ।
जडें, मूढें, तेही अमित तरती पामर तरी
पहा, झाली दीना कलिमलजलीं पावन तरी ॥ ८७ ॥

अहिंसाधर्मातें कलियुगजनां बोध करुनी
महापाखंडातें मिरविसि परा बुद्धि वरुनी ।
तदां तूझ्या बुद्धाकृतिस भजती लोक समुदें
न जाणों ये त्यांतें नियत तव मायाच भ्रमु दे ॥ ८८ ॥

महापापें झाला, कलिमल जगीं रूढ, सदया;
नसे तेव्हां लोकीं सुजनसुपथाचार, सुदया; ।
तदा म्लेंच्छप्रायें नर वसति, त्यां पापनिरतां
स्वयें कल्कीरूपें वधिसिल पुढें काळ सरतां ॥ ८९ ॥

जधीं होतो धर्मक्षय, पथ विधीचा बिघडतो,
हरी ! तेव्हां तेव्हां धरिसि अवतारा उघड तो ।
पुन्हां स्थापी धर्मा नियतचि, अधर्मक्षय करी
असी लीला तूझी त्रिजगकलुषा पावन करी ॥ ९० ॥

अनंता योगांच्या असति महिमाऽनंतपरिच्या
अनंतत्वें मूर्ती प्रकटति तुझ्या दिव्य हरिच्या ।
तयांचीं चारित्रें श्रुतिस वदवेनात तितुकीं
गुणाढ्या जें झालीं कवण कवगासीं मग तुकी ? ॥ ९१ ॥

असा तूं या लोकीं अति महिम, देवा, विलसितां
जगीं ख्याती तूझ्या हरि करितसे रक्षण सता ।
पुन्हां कां हे चिंता अमित मज ? जाता, परिहरी
त्वरें आतां, देवा, विमल सुख देई नरहरी ॥ ९२ ॥

सुरांच्या संताना, सुरभि निज दीना तरण कां
दरिद्रांतें चिंतामणि असुनि, नोहे हरण कां ? ।
विपत्तीअज्ञानोद्भव परिहरीं पंच कलुषें
महाकष्टें, दुष्टें, जड, निवटि विज्ञानकुलिशें ॥ ९३ ॥

तुझी माया आतां करुनि उपसंहार, मजला
प्रभू, दे सद्भिक्षा; परम पुरुषा, याचित तुला ।
सुवैराग्यें चित्तें तवपदजनीं संगति घडो
तुझ्या भक्तिप्रेमें निजजननसंताप विघडो ॥ ९४ ॥

तुझ्या रूपीं अंतःकरण रत हो काम घसरो
भवभ्रांतीचा हा परम वळसा सर्वाहि सरो ।
मुरो पायीं माझें मन नमन तूंतें सुरपती
पतीतोद्धारा तूं गरुडगिरिवासा यदुपती ॥ ९५ ॥

समस्ता सृष्टीचा नियत करिता, तूंचि धरिता
प्रभू, नाना माया स्रजिसि अति आश्चर्यभरिता ।
परार्द्धांतीं सारें करुनि निजरूपांत विलया
चिदानंदा, एका, उरसि जगदानंद लिलया ॥ ९६ ॥

महाभूतीं, भूतीं, प्रकृतिपुरुषीं, तत्वनिवहीं
तुझ्या ठायीं सर्वीं प्रकटुनि असावेंचि प्रवहीं ।
समस्तां जीवांच्या हृदयिं वससी तूं, चितिमया
तुझीं स्तोत्रें आम्हां करवति किती, जी, श्रुतिमया ?॥ ९७ ॥

क्षमा कीजे मी जें तुज अमित वाचाळ वदलों
तुझ्या निंदाव्याजें जरि असन चित्तांत मुदलों,
प्रसन्नादृष्टीनें परमकरुणेनें निरखिजे
जसा देखे मातें मनिंच अपल्या पामर खिजे ॥ ९८ ॥

क्षमापूर्णा, तूर्णा करुनि करुणा तूं करि धरीं
मदीया दैन्यातें परिहरुनि धन्या करिं धरीं ।
कृपाळा, गोपाळा, दशरथसुता, नंदकुमरा
असीं नामें वाचे वदविं अति दुर्लभ्य अमरां ॥ ९९ ॥

मुकुंदा, गोविंदा, प्रतिपद असी नामलतिका
मुखीं राहो; गावो तव चरितगाथा महतिका ।
गुणाढ्या, सर्वाढ्या, परम पद सौवर्ण मुखरी
तटीं झालें मातें विदित कथितां वेदमुखरीं ॥ १०० ॥

असो याची आतां, विभु, मजवरी पूर्ण ममता
विचित्रा या भूतीं मज घडविजे सर्वसमता ।
महाशांतीचा तूं वर वरद होई निज जना
कृपेनें तूं लावीं निजचरणकल्हार-भजना ॥ १०१ ॥

शतश्लोकीं माळा विरचुनि पदें मुक्त समते
पदीं पुण्यश्लोकार्पण करितसें सद्गुरुमतें ।
प्रसादत्वें यीचें ग्रहण करितां सज्जनवरीं
हरीच्या आज्ञेनें वरिल पुरुषा मुक्तिनवरी ॥ १०२ ॥

मनीं ज्याला आहे त्रिविध पुरुषार्थीं अभिरुची
अनायासें पावा, न करुनि महाकष्ट कुरुची ।
सुवाग्रत्नज्योत्स्ना लखलखित जिव्हाग्रपरळीं
स्वसंतोषें नीराजन करुनि भावें अविरळीं ॥ १०३ ॥

अहो वाक्पुष्पाळी भरुनि रसनेच्या करतळीं
समर्पा हे पुष्पांजुळि हरिपदाब्जीं क्षितितळीं ।
घडावें धन्यत्वें सकळ सुजनामाजि विभवें
तदां तुम्हां बाधा कधिसाहि नव्हे या कलिभवें ॥ १०४ ॥

हरीच्या भक्तांतें कधिं अशुभवार्तांचि न घडे
सदा ऐको कानीं श्रुतिगदित हे बोल उघडे ।
यशा आयुष्याची धनकनकअन्नें विपुलता;
असो कन्यापुत्रांसहित विततां संततिलता ॥ १०५ ॥

रणीं लाभे त्यातें जय. भय न बाधी नृपकुळीं
असावें तद्दर्शे सकुळ; घडती साच अकुळीं ।
रिपूंच्या नाशार्थीं पठण करितां, षड्रिपुंसही
जिणे, ऐशी याची अतुळ महिमा हे श्रुतिसही ॥ १०६ ॥

अहो या स्तोत्राची वद्‌वल किती दिव्य करणी ?
समस्तां श्लोकीं हे अतिमुखर शोभे शिखरिणी ।
गुणज्ञांनीं घ्यावी तरिच गिंवसे सद्रुचि यिची
अभक्तां, मूढांतें, असुखफल देणार रुयिची ॥ १०७ ॥

हा श्रीवेंकटराजसुस्तव असे, सद्भक्ततोषा करी,
दे सज्ञान, विरक्ति, भक्ति, सुजना आनंदरत्नाकरीं ।
ठेवी, नित्य महोत्सवें म्हणुनियां देवाचिये सन्निधी
सायंप्रात पढोनि नित्य मिळवा त्या अष्टसिद्धी निधी ॥१०८॥

योगी,-निरंजन, रमापति, वेंकटेशा
स्तोत्रें स्तवोनि भवबंधकरी विनाशा ।
प्रार्थी समस्त सुजनां मम दोष, देवा,
टाकोनि सन्निध करा विभु वासुदेवा ॥ १०९ ॥

॥ इति श्रीमन्निरंजनमाधवयोगीविरचितं श्रीमद्वेंकटेशस्तोत्रम् ॥

---

## २० श्रीज्ञानेश्वराष्टक.

### मात्रासमक.

केली टीका भगवद्गीताशास्त्राची
नेली मायाभ्रांति विनाशा सुजनाची ।
पाहा नेत्रीं उघडा मोक्षाचा दाता
चित्तीं चिंता ज्ञानेश्वर सद्गुरुनाथा ॥ १ ॥

ज्याच्या द्वारीं पिंपळ शोभे सोन्याचा
ज्याच्या गांवीं डंका वाजे पुण्याचा ।
जातो प्राणी वैकुंठा ज्यातें गातां
चित्तीं चिंता ज्ञानेश्वर सद्गुरुनाथा ॥ २ ॥

इंद्राणी हे जेथें वाहे शुभगंगा
स्नानें पानें कर्ती पातकगिरिभंगा ।

तारी पाहा ! केवळ जे दीन अनाथा
चित्तीं चिंता ज्ञानेश्वर सद्गुरुनाथा ॥ ३ ॥

कामारी हा श्रीसिद्धेश्वर तैं नांदे
जेथें तोषे मोक्ष लुटावा स्वच्छंदें।
पुण्या जोडी दर्शन घे वाटे जातां
चित्तीं चिंता ज्ञानेश्वर सद्गुरुनाथा ॥ ४ ॥

वृक्ष अजाना देखुनि वंदी जरि भावें
तेणें कांहीं नलगे सुकृतासि करावें ।
स्वर्गीं जावे सर्वां लोकांच्या माथां
चित्तीं चिंता ज्ञानेश्वर सद्गुरुनाथा ॥ ५ ॥

ज्याची टीका वाचुनि ज्ञानी बहु झाले
वैकुंठीं ते श्रीधररूपें स्थिर केले ।
ऐशीं दावी अद्भुत लोकां निजसत्ता
चित्तीं चिंता ज्ञानेश्वर सद्गुरुनाथा ॥ ६ ॥

कामक्रोधा मोहतमातें तैं थारा
नाहीं नाहीं वाचा गीता सुखसारा ।
बोधानंदीं डोलुनि लागा सुखपंथा
चित्तीं चिंता ज्ञानेश्वर सद्गुरुनाथा ॥ ७ ॥

नाथ निवृत्ती ज्ञान कथी ज्याला सोपें
तेणें जेणें हरिलीं लोकांचीं पापें ।
चित्तीं माझ्या प्रेम भरे ज्याला ध्यातां
चित्तीं चिंता ज्ञानेश्वर सद्गुरुनाथा ॥ ८ ॥

ऐशी शोभे ज्ञानाष्टक सुंदर वाणी
मात्रासमकें रम्य दिसे सत्कविवाणी ।
सायंप्रातीं नित्य पढा चित्सुख सेवा
ज्ञानानंदें सौम्य निरंजनपद पावा ॥ ९ ॥

---

# २१ पद–संग्रह.

## पद १.

संसार कैंचा ज्ञानवंताला ? ॥ ध्रु० ॥

ज्ञानवंत भगवंतचि होउनि । फिरति जगीं जगदोद्धारणाला ॥ १ ॥
भेद निरासुनि बोधरूप अनुभूति । सौख्यपर भोगिति त्याला ॥ २ ॥
भक्तिविरक्ति समाधिस साधुनि । निश्चळ राहति आत्मरताला ॥ ३ ॥
शाम विभाउनि उन्मनि लाहुनि । निःसंशयपद भोगिति त्याला ॥ ४ ॥
**माधवनंदन** बापदेवगुरु-। पदभजनें सच्चिन्मय झाला ॥ ५ ॥

## पद २.

अरे हरिरूप जगत्त्रय हें ॥ ध्रु० ॥

कांचन सर्वहि भूषण झालें । तद्वत चिन्मय हें ॥ १ ॥
नामरूप निरसूनि पाहतां । अस्तिभाति प्रिय हें ॥ २ ॥
**माधवनंदन** आत्मस्वरूपीं । व्यक्त करी लय हें ॥ ३ ॥

## पद ३

मनुजवरा विषयकाम वाढवूं नको रे ॥ ध्रु० ॥
क्षणिकचि संसार सुखीं सार म्हणुनि गुंतलासि ।
भजन तंतु मना करुनि तोडवूं नको ॥ १ ॥
कामलोभमोहबद्ध जाहलासि काय तरी ।
भावभक्तिधर्मकर्म बुडवूं नको ॥ २ ॥
सद्गुरूसि शरण रिघुनि मरणजनन दूर करी ।
**निरंजनीं** लाग भेद रूढवूं नको ॥ ३ ॥

## पद ४.

तुला कशाला रे । हळहळ ॥ ध्रु० ॥

सृष्टिस्थितिसंहारकार तो । असे निराळा रे ॥ १ ॥
जो करितो निज खेळ तयाची । चिंता तयाला रे ॥ २ ॥

एकनिष्ठ भगवंतपदीं तूं । लावि मनाला रे ॥ ३ ॥
प्रारब्धाच्या करीं समर्पी । यया देहाला रे ॥ ४ ॥
विषय टाकि तूं ध्याननिष्ठ भज । निरंजनाला रे ॥ ५ ॥

### पद ५

मजवरि कां अजुनि दया नये दयाघना ॥ ध्रु० ॥

पापि अजामीळ तारियला तां । गणिका ते वारांगना ॥ १ ॥
पशु गजराज तयाप्रति धांवसी । काय तयाहुनि मी उणा ॥ २ ॥
खग मृग अबला बाळा रक्षिसि । मज विसरसि कां चिद्घना ॥ ३ ॥
शरणपरायण किंकर तुझा । जाणुनि करि संरक्षणा ॥ ४ ॥
दीनदयाळ हे बिरुद जतन करि । तारीं माधवनंदना ॥ ५ ॥

### पद ६

श्रीसुंदरं देवकीनंदनं भजे ॥ ध्रु० ॥

कालीयशासनं । कालमृत्यनाशनम् ॥ १ ॥
त्रैलोक्यनायकं । भुक्तिमुक्तिदायकम् ॥ २ ॥
गोपवृंदपोषणं । पापकंदशोषणम् ॥ ३ ॥
रासकेलिकौतुकं । वासुदेवनामकम् ॥ ४ ॥
नंदगोपबालकं । माधवेयपालकम् ॥ ५ ॥

॥ इति ज्ञानदेवाष्टकं संपूणम् ॥

# सांप्रदायपरिमळ

## ऊर्फ

# निरंजनमाधवाचें आत्मचरित्र



श्रीसुंदरकृष्णाय सुंदरीप्रियाय नमः ॥ श्रीशैलनिलाय ( निलयाय?) श्रीनिवासाय नमः ॥ ॐनमो भगवते वासुदेवाय ॥
ॐ श्रीमन्महागणाधिपाय नमः ॥ ॐ श्रीशारदायै नमः ॥
ॐ श्रीमल्लक्ष्मीधरकालिदासगुरुभ्यो नमः ॥
श्रीमहामौळिगुरुभ्यो नमः ॥ ॐ ॥

### उद्गार पहिला.

आधीं श्रीइष्टदैवत श्रीकृष्णनाथ । सुंदर सुंदरीप्राणनाथ ।
तोचि माझा सद्गुरुनाथ । शारदागणनाथ तो नमिला ॥ १ ॥
एकचि अनेक नामें धरी । एकत्वीं न फुटोनि बहुत्व वरी ।
बहुत्वीं बहुत क्रीडा करी । तरीं एकत्वा नुपेक्षी ॥ २ ॥
असोनि एक दावी बहुत । स्वयोगमाया विस्तारित ।
नामरूपत्वें मिरवत । अस्तिभातिप्रियत्व आच्छादोनि ॥ ३ ॥
पटें आच्छादिलें सूत । अलंकारें कनकवत ।
तरीं पाहतां शाश्वत । सूत्रकनकत्व यथास्थित ॥ ४ ॥
वस्त्रालंकार दोनी । नसोनि भासती आहेपणीं ।
तैशीच योगमायेची करणी । नसोनि भासवी आपणा ॥ ५ ॥
ऐशी जयाची योगमाया । नमन करुनि तया सद्गुरुदेवराया ।
जयाचे कृपें तरावी माया । तयासि प्रार्थिलें अतिविनयें ॥ ६ ॥
स्वामीशिष्यकुळें बहुतें । देखों येती आकुलचित्तें ।
सद्गुरुसांप्रदाय कळावयातें । आर्त्त धरिती म्हणौनि ॥ ७ ॥

तयांसि सांप्रदाय करावा प्रकट । तेणें तयांचें अविद्याकपाट ।
उघडतां बोधदीप चोखट । प्रकाश करील हृदयसद्मीं ॥ ८ ॥

चकोर चंद्रकिरणाविना । न करिती अन्यरसप्राशना ।
तैसें या सच्छिष्यां गुरुचरितकथना- । वांचोनि तृप्ति न मानें ॥९॥

वनीं असतां पुष्पघोंस । भ्रमर तयें रसीं उदास ।
ज्याती- पुष्पांचा विकास । इछिती माधुर्य-रसवेत्ते ॥ १० ॥

तैशा अनंत लोककथा । लोकीं असतां न मानिती चित्ता ।
सद्गुरुवंशचरितगाथा । अखंड आवडे जयातें ॥ ११ ॥

गुरुवंशसूर्योदय होतां । घडेल सुजनहृत्कमळा विकासता ।
ब्रह्मरसमकरंद आयिता । बोधरूप स्रवेल ॥ १२ ॥

तयाचा सेवोनि परिमळ । तृप्त होतील शिष्यअळिकुळ ।
तयासि बोधरसें केवळ । देर्याल पुष्टि स्वभावें ॥ १३ ॥

म्हणौनि कृपावचनीं मातें । आज्ञा करावी महामहंतें ।
‘ सांप्रदायपरिमळ ’ ग्रंथातें । रचावया करुणाब्धी ॥ १४ ॥

एवं विनंवितां सद्गुरुचरणीं । मान्य करोनि मांझी दीनवाणी ।
म्हणती अवश्य शिष्यमणी । कीर्तिपरिमळ प्रकटवीं ॥ १५ ॥

सदां परोपकारकरणीं । तुझी इछा विलसे मनीं ।
चंद्र निववी जनालागुनि । सहजस्वभावें तद्वत ॥ १६ ॥

पर्जन्य तोहीं उपकारार्थ । काळीं काळीं वृष्टि करित ।
मंद वाहे मलय मारुत । निववावया बहु जना ॥ १७ ॥

ऐसाचि सज्जनाचा स्वभाव । तैसाचि तुझाहीं सद्भाव ।
प्रकट करीं अवश्यमेव । सांप्रदायपरिमळ ग्रंथराज ॥ १८ ॥

जेथें साधकषट्पदां विश्राति । सज्जनहंस जेथें निवसती ।
सर्व जनाच्या मानस-गती । आकर्षती ज्याविषयीं ॥ १९ ॥

आमुचा कृपावरदहस्त । तुझे मस्तकीं सदोदित ॥
छत्रप्रायें असतां उचित । जगतारण तां करावें ॥ २० ॥

म्हणवोनि आज्ञापितां स्वामि । साष्टांग दंडवत करोनि भूमि ।
शिष्य गर्जत सद्गुरुनामीं । प्रेमाल्हादें नाचत ॥ २१ ॥

अष्टभावपुरःसर । पुनः पुन्हा चरणकल्हार ।
नमोनि स्तवोनि अत्यादर-। युक्त परिमळ प्रकाशवी ॥ २२ ॥

निरंजन योगी समाधिविरामीं । स्वानुभवसुखानंदपरमीं ।
रमोनि असतां चिद्घनधामीं । गंगा नमी पादपद्मा ॥ २३ ॥

म्हणे "कृपासुधाकरा । तूंचि जीवन शिष्यचकोरा ।
निजजनमनोरथमंदारा । चिंतामणी चिंतकां ॥ २४ ॥

तूंचि विज्ञानधाराधर । संतप्त जगदानंदकर ।
माझें मानसकासार । पूर्णकर्ता तूं एक ॥ २५ ॥

त्रिविधतापग्रीष्मतरणी । तापवी सदा देहधरणी ।
क्षणक्षणीं चित्तपाणी । आटे तेणें गुरुवर्या ॥ २६ ॥

देहबुद्धीचा कर्दम । एवढाच राहिला निःशीम ।
शिष्यजलौकसां अत्यंत श्रम । झाला आतां परिसावा ॥ २७ ॥

नव्हे बुद्धिकंजविकास । न थिरे विचारराजहंस ।
यमादिसाधनपक्षिकुळांस । वस्ती तेथें घडेना ॥ २८ ॥

मनमीनासि उद्विग्नता । आशामकरी धांवती सर्वता ।
वासनाषट्पदाची काय वार्ता । पुष्पितलता धुंडितां ॥ २९ ॥

विषयकुटजें प्रफुल्लित । तद्रसीं होय आसक्त ।
इछा चातकाचा आर्त्त । पुरविता कोण स्वामीविना ॥ ३० ॥

आतां करोनि करुणावृष्टि । मेघधारा कृपादृष्टी ।
वर्षतां बोधामृतपुष्टि । घडों सकेल सर्वांतें ॥ ३१ ॥

बुद्धिकंजाचा विकास । क्रीडा करील विवेकहंस ।
मकरंद साधक षट्पदास । प्राप्त होयील सदोदित ॥ ३२ ॥

संसारपांथिकांचा हरेल श्रम । लसलसीत वाढेल बोधद्रुम ।
मुक्तिफळें अतिललाम । अर्पील सर्वां ॥ ३३ ॥

वृद्धि पावेल कवितालता । विज्ञानामोदमंडिता ।
सर्वेहीं एक तुझी सत्ता । विश्रामदाता तूं एक ॥ ३४ ॥
ऐसें भावें विनवितां । प्रेम उचंबळे योगीनाथा ।
बद्धपाणि पतिव्रता । अनुव्रतापुढें लक्षोनि ॥ ३५ ॥
पुसे आवडि तुझे मनीं । काय असे वो भामिनी ! ।
पुसतां कथीन संशयमार्जनी । कथा विचित्र जे असे ॥ ३६ ॥
पाहोनि नाथाची प्रसन्नता । पुन्हा चरणीं ठेविला माथा ।
म्हणे स्वामी कृपावंता । गुरुसांप्रदायकथा कथावी ॥ ३७ ॥
आपण रचिलीं ग्रंथरत्नें । तें म्यां केलीं हृदयाभरणें ।
आतां स्वसांप्रदायकथन । शिरोभूषण मज द्यावें ॥ ३८ ॥
जमीं एकाच गुरूचे शिष्य । प्रकट दिसती अनंत लक्ष ।
सांप्रदाय तयांचे प्रत्यक्ष । आम्हीं पाहों या लोकीं ॥ ३९ ॥
आपण गुरुद्वयाचें स्मरण । सदैव करितां काय कारण ।
अद्वैतभावने एकपण । मानोनि गुरुपद अद्वय ॥ ४० ॥
तथापि माझा संशयछेद । येवढा देवें कीजे विशद ।
माझी प्रज्ञा आहे मंद । म्हणोनि छंद पुसायाचा ॥ ४१ ॥
दोंपणीं वस्तु एक । हेंही स्थळस्थळीं सम्यक ।
ग्रंथीं दाविला विवेक । तरीं संशयीं हें मन ॥ ४२ ॥
हा उघडा दावोनि अर्थ । मनासि बोधितां परमार्थ ।
अढळपदीं विश्रांत । पावोनि राहेल अचंचळ" ॥ ४३ ॥
ऐशी निजप्रिया मधुरवाणी । भक्तिनम्र ऐकतां श्रवणी ।
जितेंद्रिय महामुनी । अनासक्तपणी जो वर्ते ॥ ४४ ॥
दीनवत्सळ म्हणोन केवळ । असत. कांतासती प्रेमळ ।
गंगावती सद्गुणशील । गुरुबोध विमळ दे तीतें ॥ ४५ ॥
म्हणे "धन्य धन्य हो भामिनी । गुरुसांप्रदाय पुससी झणी ।
गुरुवंशतरणी तुझे कारणीं । उदय करील प्रबोधकरें ॥ ४६ ॥

चक्रवाकीच्या आर्तीकारणें । उदय पावे सहस्रकिरण ।
त्रैलोक्याचें तमहरण । तया व्याजें होतसे ॥ ४७ ॥

एका चातकाचे आर्ती । महामेघ वर्षे जगती ।
तेणें सर्व जीवां जीवनप्राप्ति । सहज घडे तद्वत हें ॥ ४८ ॥

तुझे कारणीं कथितां । विश्राम होईल जना बहुतां ।
हाहीं उपकार तुझा तत्वता । झाला दिसे या लोकीं ॥ ४९ ॥

आम्हासि सद्गुरुचरिताचें स्मरण । तुवां करविलें परमपावन ।
हा उपकार आम्हीं मानिला पूर्ण । त्याचें उत्तीर्ण न घडेचि ॥५०॥

गुरुसांप्रदायबोध । तुज मी करीन विशद ।
तेणें कांहीं घडेल सिद्ध । उत्तीर्णता सत्य या ललने ॥ ५१ ॥

पाहतां आमचा पंथ अगोचर । कोणासि न केला गोचर ।
रत्नें आपुलीं सागर । सांटवोनि असे तद्वत ॥ ५२ ॥

तुझ्याच अर्थीं जाण । म्यां पूर्वीं ग्रंथ रचिले पावन ।
आतां सांप्रदायप्रकाशन । करणें वल्लभे तुजसाठीं ॥ ५३ ॥

आतां होऊन सावधान । सांप्रत कथा करी श्रवण ।
आधीं निजवंशप्रकाशन । पूर्वजचरित दावोनि ॥ ५४ ॥

श्रीगोदावरीदक्षिणतीरीं । रामडोह नाम ग्रामांतरीं ।
श्रीसामराज क्षेत्रीं । जेथें संगम शिवनदाचा ॥ ५५ ॥

प्रतिष्ठानासि पश्चिमेसी । योजनद्वयीं विशेषीं ।
सिद्धेश्वराचे पूर्वेसी । सार्द्ध योजनी ॥ ५६ ॥

वरखेडाची शींव । रामडोह प्रसिद्ध नांव ।
ते मातृभूमि निःशीम । ग्रामलेखक ते स्थळीं ॥ ५७ ॥

हे वृत्ति असतां वडिलीं । व्यापारमुळें सोडिली ।
विज्यापुरीं वस्ती केली । कीर्ति मेळविली अपाडें ॥ ५८ ॥

तेथील पृथ्वीपतीचें सेवन । तेणें प्रतिष्ठा वाढली पूर्ण ।
परोपकारी धुरीण । सदाचारी अतिशयें ॥ ५९ ॥

माहदो बनाजी नाम प्रख्यात । वैष्णवामाजि धुरीण वर्त्तत ।
पूर्वी कथिले प्रल्हादादि भागवत । त्यांमाजि गणना जयांची ॥ ६० ॥

चौघे पुत्र केले उत्पन्न । तेहीं साधू परमनिपुण ।
दीनवत्सल सज्जन मान्य । कुशल पंडित सकळकळीं ॥ ६१ ॥

तयांसि वोपुनि अधिकार । आपण झाले तीर्थचर ॥
यात्रा करोनि दक्षिणोत्तर । वैराग्यपूर्वक परमशीळ ॥ ६२ ॥

शूर्पार क्षेत्र कृष्णातीरीं । जेथें अश्वत्थरूपें वसे नरहरी ।
सेवोनि हरिभक्तिसुधामाधुरी । अंतीं निजधाम पावले ॥ ६३ ॥

त्यांचें करितां महत्व वर्णन । ग्रंथ अगाध वाढेल जाण ।
तत्रापि विष्णुभक्ताचे गुण । वर्णनीं कोण समर्थ ॥ ६४ ॥

जैसे नारायणाचे अगाध गुण । वर्णनी निगमहीं नव्हे निपुण ।
तैसें सद्भक्तांचें चरित्रवर्णन । नव्हे कोणासि निश्चयें ॥ ६५ ॥

चौघां पुत्रांमाजि मध्यम । तिमाजी पंडित हें जया नाम ।
तयांचेंहीं ऐसें कर्म । दुष्कर सर्वथा कलियुगीं ॥ ६६ ॥

विष्णुभक्त महोदार । परमगुणी परमचतुर ।
सव्यापसव्यवियाप्रचुर । गायन गंधर्वसमान ॥ ६७ ॥

सकळकळारत्नाकर । वसती विज्यापुर नगर ।
तें टाकिलें अवांतर । होतां दिल्लीपतीचे ॥ ६८ ॥

श्रीशेषाचला जाउन । केलें कुळदैवत दर्शन ।
महत्व होतें केलें अर्पण । ज्या स्थळिचें त्या स्थळीं ॥ ६९ ॥

चौघे पुत्र एकी कन्या । गोदावरी ते अंगना धन्या ।
पतिव्रतांमाजि मान्या । अरुंधतीसमान ॥ ७० ॥

रूपौदार्य भूतदया । स्वपरविषयीं समान माया ।
इतुकें कुटुंबसहित पायां । शरण गेले वेंकोबाच्या ॥ ७१ ॥
करोनि स्वामि पुष्करणीस्नान । संपादिलें श्रीचरणदर्शन ।
त्रिरात्रि क्रमितां स्वप्न । झालें यांसि ॥ ७२ ॥

ज्येष्ठ पुत्र भीमराय । चतुर्दश वर्षें त्याचें वय ।
तत्कनिष्ठ वेंकटेश माधवराय । त्याहोनि अवर ॥ ७३ ॥

त्याचे पाठी हनुमंतराव । कन्या भगवती शुद्धस्वंभाव ।
पांच अपत्यें महानुभाव । देवगर्भवत कर्तृत्वें ॥ ७४ ॥

ज्येष्ठ पुत्रातें अधिकार । त्या देशीं कथोनि वेंकटेश्वरें ।
कर्नाटकीं केले स्थिर । स्वप्नीं दृष्टांत होवोनि ॥ ७५ ॥

न करितां मनुजांचें सेवन । तिमाजीपंतीं आमरण ।
भगवद्भजन पुस्तकलेखन । करोनि काळ दवडिला ॥ ७६ ॥

सर्वोपनिषदें भारत । गीताभागवतादि ग्रंथाच्या प्रति बहुत ।
लेखन करोनि ब्राह्मणांतें । समर्पिल्या असंख्य ॥ ७७ ॥

त्यांचे पुत्र भीमराव । अधिकार करितां महानुभाव ।
स्थापिलें तेथतेथें भूमिदेव । विष्णुभक्त सदाचारी ॥ ७८ ॥

त्यांसि वृत्ति दिधल्या कल्पुन । ते अद्यापि भोगिती ब्राह्मण ।
जयासि आचंद्रार्क निधन । घडेचिना ॥ ७९ ॥

लोकां वाटे स्वल्प देणें । म्हणोनि चालविती अधिकारी जन ।
तेणें संतुष्ट ब्राह्मण । अन्नाच्छादन निश्चिंत ॥ ८० ॥

असो; तेहीं केली कीर्त्ति । काशी रामेश्वर मध्यवर्ती ।
त्या समयींचे पुरुष नेणती । ऐसें नाहीं वर्त्तलें ॥ ८१ ॥

त्यामाजि आमुचे जनक । धातुमाजि जैसें कनक ।
तद्वत हरिभक्त गुणविवेक । लेखनकर्मीं अप्रतिम ॥ ८२ ॥

साधु संपन्न सकळगुणी । बंधुवात्सल्य अगाध करणी ।
सर्व वसती अभेदपणी । येकाकार अमत्सरें ॥ ८३ ॥

आमुची माता भागीरथी । पतिव्रता सद्गुणकीर्त्ति ।
देवभक्ता प्रसन्नमती । कुळदेवता भगवती प्रसन्न ॥ ८४ ॥

प्रत्यक्ष स्वप्नदर्शन । प्रत्यक्ष करावें भाषण ।
ऐसें महिमान गहन । असतां पावन तिचे कुसीं ॥ ८५ ॥

आमुचा जन्म तेथें होतां । कर्नाट देशीं असतां ।
कंचीप्रांतीं पुण्यसरिता । वेगवती अतिधन्या ॥ ८६ ॥

पाक्षितीर्थसमीप भूमि । तेच आमची जन्मभूमी ।
तेथेंच पितरां वैकुंठधामीं । गमन करणें तें घडलें ॥ ८७ ॥

काळकर्मरणानुबंधें । तो देश सूटला सात्सिद्ध ।
आम्हा येणें घडलें शुद्ध । महाराष्ट्रदेशांतरीं ॥ ८८ ॥

शाहू भूपतीचा प्रधान । बाजीराव बल्लाळ पृथ्वीरत्न ।
परमयशस्वी पावन गुण । भूपाळमंडणशिरोमणी ॥ ८९ ॥

गुणरत्नाचा परीक्षक । स्वयें सद्गुणपूर्ण अशेख ।
तेणें संग्रह केला सम्यक । ज्येष्ट बंधूसह आमुचा ॥ ९० ॥

त्यामुळें वसतां सप्तऋषी । शाहूनगर वायीं देशीं ।
राजधानी पुण्यविशेषीं । घडो आली प्रसिद्ध ॥ ९१ ॥

तेथें वसतां आमुची स्थिति । अल्पवयसा वियार्थी ।
संस्कृतवियाग्रहणार्थी । आवडि जीवीं निःशमि ॥ ९२ ॥

आस्थापूर्वक सांगणार । न मिळती कोणी विप्रवर ।
सर्वहीं अर्थकामातुर । भरणें उदर मुख्य स्वार्थ ॥ ९३ ॥

तेणें न घडतां समाधान । पंडितशोध करितां मनें ।
नाम ऐकिलें परम पावन । लक्ष्मीधर स्वामि सद्गुरूचें ॥ ९४ ॥

प्रातःकाळीं पुण्यवेळा । दर्शनार्थ जातां सदनाला ।
अमृतसिद्धियोग फावला । अकल्पित काकतालें ॥ ९५ ॥

असतां समाधिविरामीं । पद्मासनीं एकांतसद्मीं ।
साष्टांग नमन पादपद्मीं । केलें नामगोत्र कथोनि ॥ ९६ ॥

कथिला साकल्य वृत्तांत । वियाभ्यासमनोगत ।
धन्य दिवस कीं समर्थ । लाभ घडला चरणाचा ॥ ९७ ॥

ऐकोनि आर्थिक विनवणी । मंदस्मितपूर्वक वाणी ।
बोलती गंभीर मेघध्वनि । मनमयूरा आनंदकर ॥ ९८ ॥

हातीं महारुद्र वीणा । स्वरें ज्ञानेश्वरीपारायणा ।
करित असतां आनंद मना । झाला ज्यांच्या श्लोकार्थें ॥ ९९ ॥

' अनन्याश्चिंतयंतो मां ' हा श्लोक । जेथें व्याख्यान सम्यक ।
त्याच समयीं मज दीनाचा उल्लेख । ऐकतां हरिख वाटला ॥१००॥

म्हणती अवश्य यावें नित्य । व्याकरण पढत जा पढवीन सत्य ।
हेंचि आमुचें आहे कृत्य । विद्या दीजे विद्यार्थियां ॥ १०१ ॥

पूगीफळ अर्पिलें हातीं । निरोप दीधला गृहाप्रती ।
प्रारंभ कीजे सन्मुहूर्तीं । ह्मणोनि काळ नेमिला ॥ १०२ ॥

पुण्य दिवस सुमुहूर्तकाळीं । सिद्धांतकौमुदी आरंभिली ।
नित्य सहवासीं कळों आली । बुद्धि अर्थग्रहणाची ॥ १०३ ॥

कुलशीळ आचार चातुरी । लीनता वचनमाधुरी ।
एकनिष्ठताही बरी । जाणों आली मानसा ॥ १०४ ॥

कित्येक ब्राह्मण विद्यार्थी जन । नाना शास्त्रें करिती पठण ।
तयांत मज दीनावरि मन । विशेष बैसलें सप्रेमें ॥ १०५ ॥

पूर्वजन्मकर्मयोगें । या देहीं कृपा घडली चांग ।
अंतरंग अथवा बहिरंग । सांगणें निःसंग मज दीना ॥ १०६ ॥

येकांतीं लोकांतीं असतां स्थिति । तेथेंही निःशंक माझी गति ।
कांकीं पाचारोनि प्रीति । बैसविती मज सान्निध ॥ १०७ ॥

सहवासें सर्वार्थविशद । कळों आला परिशुद्ध ।
परस्परें मनाचा अद्वंद । प्रेमा वाढला चंद्रचकोरवत ॥ १०८ ॥

षण्मासपर्यंत संघट्टणीं । कृपा उपजली अत्यंत मनीं ।
माझीही निष्ठा जडली चरणीं । महिमा देखोनि निःशीम ॥१०९॥

सकळविद्या सकळकळा । तेहीं येथोंचि आश्रय केला ।
सारांश मुख्य ज्ञानकळा । व्यासवशिष्टवाल्मीकतुल्य ॥ ११० ॥

मंत्रशास्त्रीं दक्षिणामूर्त्ति । व्याख्यानकथनीं बृहस्पती ।
स्वरूप पाहतां मदनमूर्त्ति । त्रैलोक्यप्रमदामोहक ॥ १११ ॥

आचार महाऋषीप्रमाणें । नारद तैसें वीणावादन ।
आलाप गंधर्वासमान । कविता प्रत्यक्ष काळिदास ॥ ११२ ॥

ज्यांची कविता ऐकतां श्रवणीं । ब्रह्मानंदस्वामि सद्गुरुनीं ।
लक्ष्मीधर काळिदास या अभिधानीं । गौरविलें सत्कृपें ॥ ११३ ॥

ज्यांचे ग्रंथ गीतप्रबंध । सर्व गाताति गायक सुविद ।
जैसे पूर्वी रामानंद । वरदराज तत्तुल्य ॥ ११४ ॥

भूतदया निःसंगता । संसारविषयीं अलोलुपता ।
लक्ष्मी आनंदी उभयता । महासती असतां कळत्र ॥ ११५ ॥

त्यांहीं परस्परें अभेदपणीं । प्रीतीनें वर्तती जैशा बहिणी ।
एकास एक न देखतां क्षणीं । हानि वाटे परस्परें ॥ ११६ ॥

श्रीमंत, कीर्त्तिमंत, प्रतापवंत । विद्या कुळशीळ आचारवंत ।
सर्व येवोनि संत महंत । नित्य दर्शन सेविती ॥ ११७ ॥

जितुके कळाधर पृथ्वीवरी । जे जे आले शाहूनगरीं ।
तेही प्रथम येवोनिया मंदिरीं । कृपा पावोनि उद्धरावें ॥ ११८ ॥

ऐशी अनंत गुणाची ख्याति । किती मी वर्णीन मूढमती ।
बरवे उपनाम कोंकणप्रांतीं । उत्पन्न चित्तपावन सत्कुळीं ॥ ११९ ॥

ज्ञानेश्वरीचा करोनि शोध । लोकीं केली प्रसिद्ध ।
ते गोविंदभट्ट बरवे सात्सिद्ध । तीर्थस्वरूप या स्वामीचे ॥ १२० ॥

प्रसिद्ध नाम बापुभट्ट । ऐसें आळविती श्रेष्ठ श्रेष्ठ ।
सकळ राजप्रधान इष्ट । दैवततुल्य मानिती ॥ १२१ ॥

शाहु राजयाची परम प्रीति । ग्रामभूमि देउन स्थिति ।
चाळविती जैशी निश्चिंती । घडे यांच्या तपाची ॥ १२२ ॥

कोण्याविषयीं अपूर्णता । तेथें न वाटली चिंता ।
मी रंक काय ते गुणगाता । होईन समर्थ एकमुखें ॥ १२३ ॥

ऐसें वर्त्ततां शुभदिनीं । माझी उघडली भाग्यखाणी ।
तेव्हां आदरें बाहोनिं । कथिला दृष्टांत स्वप्नींचा ॥ १२४ ॥

तुजवरि श्रीची कृपा पूर्ण । कळों आलें आम्हां निदर्शन ।
म्हणोनि केलें हस्तग्रहण । सानंदपूर्वक आलंगिलें ॥ १२५ ॥

तेचि रात्रि उषःकाळीं । मजही स्वप्नप्रतीति झाली ।
साक्षात् चित्कळा आनंदवल्ली । दृष्टी देखिली प्रसन्न ॥ १२६ ॥

मंदस्मितपूर्वक बोलोनि । मंत्र दीधला माझे पाणी ।
तात्काळ जागृति झाली झणी । अद्यापि ते मूर्त्ति मनीं आहेचि ॥

काय वर्णु ते कळा । काय वर्णु ते बाळा ।
काय वर्णु ते लीळा । अद्यापि डोळां दिसतसे ॥ १२८ ॥

ऐशी चित्कळासुंदरी । प्रत्यक्ष होतां स्वप्नांतरीं ।
तया आनंदाच्या लहरी । मानसी उठतां निःशीम ॥ १२९ ॥

त्या आनंदाची होती मिठी । त्यांतचि पडली ऐशी गांठि ।
महा गुरूच्या मुखें गोष्टि । ऐकिली देवताप्रसादाची ॥ १३० ॥

म्याहीं पाहोनि प्रसन्नता । स्वप्नार्थ निवेदिला सद्गुरुनाथा ।
प्रिये । त्या समयींची आनंदउद्बोधता । झाली गुरुचित्ता काय वर्णु॥

तेच क्षणीं कृपा करून । महानंदपुरःसर मनें ।
महाविद्या प्रदान । पंचाम्नाय तत्क्षणीं ॥ १३२ ॥

सद्गुरुसांप्रदायपूर्वक । वासुदेवविद्यांत अशेख ।
गुरुपादुका महावाक्य । चतुष्टयसह सम्यक उपदेशिलें ॥ १३३ ॥

सर्व समुद्रजीवन । उदरीं सांठवोनि महाघन ।
एका चातकार्थ संपूर्ण । वृष्टी करी तद्वत ॥ १३४ ॥

मीं दीन रंक पतित । अपात्र असतांहीं सद्गुरुनाथ ।
महामेघ वर्षत । खदिरनिंबचंपक हें न ह्मणतां ॥ १३५ ॥

जो समद्रष्टा महाराज । त्याचें वर्षण एकचि काज ।
खदिरचंपक भेद नुपजे । कदापि त्यासि ॥ १३६ ॥

जाति कुळ वयसा । हेही नाठवे तया पुरुषा ।
प्रसन्न काळीं जगदीशा । विष्णूसि तद्वत येथेंहीं ॥ १३७ ॥

ध्रुव बाळक गजेंद्र पशु । अजामीळ पापाचा कळसु ।
गणिका पिंगळा तीचा दोषु । न पाहतां ते उद्धरिली ॥ १३८ ॥

अनंतानंत जीव कोटी । उद्धरोनि वसविले वैकुंठीं ।
तैशीच हेंहीं घडली गोष्टि । लक्ष्मीधरें माझा उद्धार केला ।१३९।

मी सहज असतां भेदमती । अल्पवयसा हीन मती ॥
नसतां साधनचतुष्टय संपत्ति । मुमुक्षुता ते स्वप्नींहीं ॥ १४० ॥

नेणों काय घडली कृपा । दीनबंधु या नांवाची त्रपा ॥
धरोनि अपल्या रक्षोनि पडपा । मीं रंक पापा उद्धरिलें ॥१४१॥

सहज घडतां कृपादृष्टि । जळोनि जन्मांतरपातककोटी ॥
अधिकार घडला उठाउठी । महाविद्येची भेटी मज पामरा ॥१४२॥

हा करुणाकटाक्षाचा प्रसर । वांचोनि मत्साधनाचा नोहे प्रकार ॥
म्यां कोणता संपादिला संस्कार । कीं मज महाविद्या ते द्यावी ॥१४३॥

कमळ पाहतां पंकजात । तत्रापि कंटकें वेष्टित ॥
तेथें सूर्यानुग्रहें घडत । इंदिरावास तद्वत ॥ १४४ ॥

मलय पर्वतीं उत्पन्न । कंटकी वृक्ष अति दुर्गुण ।
तेहीं घडती चंदन । वायुप्रसादें ते स्थळीं ॥ १४५ ॥

तैसा मीहीं रंक । नसतां योग्यतेचा अंश येक ।
कृपारसघनोदक । वृष्टि होतां उद्धरलों ॥ १४६ ॥

लोह परिसाची भेटी । घडतां सहज सुवर्ण खोटी ।
तैशीच हेहीं महिमा मोठी । काळिमा निरसोनि सुवर्ण करी ॥१४७॥

असो सद्गुरुमहिमा थोर । वर्णू नेणती ब्रह्महरिहर ।
तेथें मीं काय किंकर । वर्णुं सकेन अल्पबुद्धि ॥ १४८ ॥

आतां सद्गुरुपरंपरा । तुज वर्णितों महोदारा ।
जे श्रवण करितां पापसागरा । शोषण घडे तात्काळ ॥ १४९ ॥

म्हणोनि सुंदरी ! एकभावें । श्रवणी सादर असावें ।
जें श्रवण करितां स्वभावें । भुक्ति मुक्ति सत्सिद्ध ॥ १५० ॥

ऐसें गंगावतीप्रति । योगी निरंजन स्वकथा कथी ।
दास विनवी संतांप्रती । महिमा पुढती परिसावी ॥ १५१ ॥

इतिश्रीमत्सद्गुरुसंततिसंतानलतिकायाः प्रबोधमंगळमंजर्याः ॥ प्रसाद-परिमळवर्णनं नाम प्रथमोद्गारः ॥ श्रीसुंदरकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीरस्तु ॥ शुभमस्तु ॥ वोव्या १५१ ॥

---

## उद्गार दुसरा.

॥ श्रीमत्तुळजापुर–निलयायै नमः ॥

निरंजन म्हणती प्रेमवती । श्रवण करावी कथा पुढती ।
सद्गुरुपरंपरा निगुती । जे महामहंती मानिली ॥ १ ॥

ज्यांचें करितां स्मरण । अखंड चुके जन्ममरण ।
भुक्ति मुक्ति घडे पावन । योगशासन बाणे आंगीं ॥ २ ॥

सकळ दुष्कृताच्या रासी । तूलाचलवत क्षणमात्रेंशीं ।
जळोनि जाति निश्चयेशीं । प्रतापप्रदीपस्पर्शमात्रें ॥ ३ ॥

जो आदिगुरु नारायण । क्षीराब्धिवास शेषशयन ।
जो धराइंदिरेचा रमण । अखंड पूर्ण अद्वय जो ॥ ४ ॥

जो सच्चिदानंदपदवाचक । जो सकळ निष्कळ स्वरूपक ।
जो जगल्लीलानाटक । मायानायक तद्भिन्न ॥ ५ ॥

जयाचे भ्रूभंगलीलामात्रें । माया सृष्टि रची विचित्रें ।
अनुग्रहें पाळोनि सर्वत्रें । उपेक्षितां विनाशी ॥ ६ ॥

ऐसा जो इंदिरारमण । योगनिद्राविलासी आपण ।
असतां करी जगत्कलन । व्यापकत्वें सर्वसाक्षी ॥ ७ ॥

तोचि स्वस्वरूपबोधनार्थ । हंसदत्तशिवादि स्वरूपें घेत ।
ब्रह्मकुमरादिकां बोधित । ब्रह्मतत्व तें अकलंक ॥ ८ ॥

जयांचा बोध होतां जीवा । मायाबंध तुरोनि पावती अनुभवा ।
ऐक्य घडोनि जीवाशिवां । निर्वाणपदा पावती ॥ ९ ॥

तें निर्वाणपद निरामय । अगाध अच्युत अव्यय ।
सच्चिदानंद बोधमय । माया तत्कार्यशून्य तें ॥ १० ॥

अखंड प्रकाश अखंड रस । मुक्तिधाम तें अविनाश ।
जेथें पावतां प्रवृत्ति नसे । निवृत्ति न भासे भिन्नत्वें ॥ ११ ॥

ऐसें जें पद अनंत । तेचि पावती सदोदित ।
तद्बोधनार्थ स्वयें घेत । गुरुरूपें अमित प्रतियुगीं ॥ १२ ॥

यामाजि मुख्य दत्तमुनि । जो संभवला अनसूयागर्भरत्नीं ।
अत्रीतपाचें फळ भर्वसेनी । जगतारक तो आदिविष्णु ॥ १३ ॥

अवधूतवेषें विराजत । वातरशन तो परमशांत ।
भस्मांगराग जया शोभत । व्याघ्रचर्म परिधान ॥ १४ ॥

अक्षमाला कमंडलु । उभयहस्तीं शोभे विमलु ।
हें निदर्शन कीं मज्जप निर्मळ । करितां फळ त्यां अमृत मीं दातां ॥ १५ ॥

माथां विलासे जटाजूट । अत्यंत विमल हेम पिंगट ।
मंदस्मितें वोष्टपुट । शोभती नेत्र कारुण्यें ॥ १६ ॥

वाराणसीपुरीस वसणें । कोल्हापुर ते जपस्थान ।
मातापुरीं भिक्षाटन । सह्याद्रिशयन सदोदित ॥ १७ ॥

व्यापक असोनि सर्वस्थानीं । ऐशी क्रीडा दाखवी जनीं ।
तो आदिगुरु दत्त महामुनी । सांप्रदाय कल्पतरूमूळ ॥ १८ ॥

जो स्वानंदबोधमकरंदतुंदिल । जयाचें परिशुद्ध हृदयकमळ ।
विलासपराग सोज्वळ । महिमा परिमळ जगद्भरित ॥ १९ ॥

ऐसा जो दत्त आदिगुरु । तच्चरणपंकजीं साष्टांग नमस्कारु ।
जो अनादि विद्या बोधी सादरु । विमलानंदमुनीतें ॥ २० ॥

तया विमलानंद मुनीस नमस्कार । जो विलसे चिद्गगनाकार ।
ज्ञानविज्ञानपरपार । स्वप्रकाशपर परंज्योति ॥ २१ ॥

जना सच्चिदानंद बोधाकारणें । शिवावतार प्रत्यक्ष पूर्ण ।
म्हणोनि विमलानंद अभिधान । शोभे महा गुरुवर्या ॥ २२ ॥

अमृतानंद योगीराज । तेथोनि प्रकटले बीजाद्वीज ।
तैसें स्वरूप अनुभवोनि निज । अनुभव देत निजशिष्यां ॥ २३ ॥

दीपापासोनि दीपज्योति । प्रकाश विलसे एकस्थिती ।
पराविद्या स्वयंज्योति प्रकाश करिती । ब्रह्मानंद मुनीस नमन माझें॥

ते ब्रह्मानंद महामुनी । ब्रह्मावबोधमकरंदपानी ।
सदां डोलती निजस्थानी । महा उन्मनी भोगवंत ॥ २५ ॥

आत्मानुभूति सुंदरी । विलासे क्रीडती हृदयँमंदिरीं ।
व्यापक असोनि सर्वांतरीं । जगदोद्धारार्थ संचार लोकीं ॥ २६ ॥

जयाच्या अंगवातस्पर्शें । सकळजनमनमळां घडे नाश ।
तयांचे सेवनीं निःशेष । त्रैलोक्यसाम्राज्यपद प्राप्त ॥ २७ ॥

घडतां त्यांचा अनुग्रह । तोचि घडे आनंदविग्रह ।
तदां माया भवग्रह । कैंचा उरे बाधक ॥ २८ ॥

येहीं विचारोनि स्वमताभिज्ञ । मुमुक्षुसाधकांमाजि परम सुज्ञ ।
जयातें पाहतां अज्ञ । तेहीं घडती मुमुक्षु ॥ २९ ॥

पुन्हां विमलानंद नामक । तेहीं शिष्य करितां सम्यक ।
त्यांपासोनि प्राप्त विवेक । सच्चिदानंद मुनिराज ॥ ३० ॥

जो सच्चिदानंद निष्कळ । तोचि हावतार सकळ ।
जेणें चराचर अखिल । सच्चिदानंदमय दाविलें ॥ ३१ ॥

योगियांमाजि शिरोमणी । परमदक्ष षट्चक्रभेदनी ।
पराप्रासादचिंतनी । शांभवी मुद्रा अनुकूळें ॥ ३२ ॥

सहस्रदळीं अखंड ज्योती । भोगितां न पावे परावृत्ति ।
त्रैलोक्यसाम्राज्यविभवस्थिति । निजानुभूति भोगित ॥ ३३ ॥

षण्मास वर्ष वर्ष गणीं । अखंडसमाधि एकासनी ।
ऊर्ध्वाम्नायचिंतनीं । काळ गणी तें कोण ॥ ३४ ॥

जया समाधीच्या पोटीं । हारपती ब्रह्मांडाच्या कोटी ।
दशा भोगिती जीच्या देंठीं । हरिहर ब्रह्मादि ईश्वरत्वें ॥ ३५ ॥
यीचा करितां विस्तार । ग्रंथ वाढेल फार ।
ज्ञानसुधेमाजि प्रकार । आहे पूर्वीं वदला हा ॥ ३६ ॥
गोकर्णमहाबळ समीप प्रांतीं । समीप पश्चिम आपांपती ।
शुभोदा तटिनी विलसे अति । पुण्यजळा पावन ॥ ३७ ॥
तीच्या तटीं महावनीं । तप आचरतां महामुनी ।
माध्यान्हकाळीं समाधिउत्थानी । श्रीनारद मुनी पातले ॥ ३८ ॥
देखोनि मुनीचा आश्रम । हरला नारदाचा भ्रमणश्रम ।
क्षणभरि येथें करावा विश्राम । ऐसें समर्था आवडलें ॥ ३९ ॥
प्रवेषता आश्रमांत । देवऋषी झाले हर्षित ।
स्थळ सोज्वळ अत[illegible] संमार्जनोपलेपनी ॥ ४० ॥
स्थळस्थळीं सरोवरें । मंडित कुमुदकल्हारें ।
सर्वरुतु फळभारें । तरुवरशाखा अतिनम्र ॥ ४१ ॥
आश्रमा आकल्पित नारद मुनी । पातले समर्थ जाणोनि ।
पूजनार्थ फळें घेवोनि । नम्र पुढें तें वितिष्ठती ॥ ४२ ॥
कासारीं कमळविकास । देखोनि वाटे नारदास ।
अतिथि मीं पाहोनि उल्हासें । हास्य करी वनराज ॥ ४३ ॥
कोकिलादिकांचें कूजन । ऐकोनि मानिलें नारदमनें ।
यावें ह्मणोनि आकारण । करिती मातें सद्विज ॥ ४४ ॥
लता गाळित सुमनें । होतां मानी मुनीचें मन ।
पुरसुंदरीवत लाजावर्षण । करिती ऋषिराज मीं प्रवेषतां ॥ ४५ ॥
मंदवातें कदळींआंदोलन । तेंचि वाटलें परभव्यजन ।
कोविदार तरु चामर समर्पण । करितां वाटे निजगुच्छें ॥ ४६ ॥
कीचक सुषिरी* वायु संचार । तेथें उठती वेणुस्वर ।
तो वाद्यवादनप्रकार । घडे आगमनीं श्रेष्ठांच्या ॥ ४७ ॥

---

* समासांत " रंध्रीं " असें आहे.

ऐसे नानाविध उपचार । वनराज अर्पी भक्तिपुरःसर ।
सच्चिदानंदयोगीश्वर । सहवासें सद्बुद्धि जडातें ॥ ४८ ॥

नारद मुनी दिव्यदर्शन । उटज प्रवेषतां पावन ।
सच्चिदानंदीं लोचन । उघडितां पुढें अकस्मात ॥ ४९ ॥

गगनीहुनि अमृतफळ । अकल्पित पडे तात्काळ ।
तोंवि तें नारददर्शन केवळ । प्राप्त झालें मुनिवर्या ॥ ५० ॥

मस्तकीं जटाजूट पावन । तप्तजांबूनदसमवर्ण ।
आंगीं भस्मोद्धूलन । शुभ्रवर्ण अति विलसे ॥ ५१ ॥

ब्रह्मचर्यवेषें मंडित । सहजसमाधिस्थ अखंडित ।
ब्रह्मवीणा स्कंधीं शोभत । सामगान नामपूर्वक ॥ ५२ ॥

मुकुंद हरी नारायण । वासुदेव संकर्षण ।
प्रद्युम्न अनिरुद्ध वामन । दशरथनंदन रघुपती ॥ ५३ ॥

गोपीरमण मदनमूर्ति । कृष्ण विष्णु परंज्योति ।
नृसिंह भार्गव वराहमूर्ति । हयग्रीव दत्त शिव नामें ॥ ५४ ॥

सप्तस्वरीं हा उच्चार । सदां चालिला मंद्र स्वर ।
ऐसा योगियांमाजि शेखर । भक्ताग्रेसर ज्ञानमणी ॥ ५५ ॥

मुनिजनांचें शिरोभूषण । तापसांचें परम निदान ।
कर्मठांचें बुद्धिभेदन । करोनि दाखवी निजपंथ ॥ ५६ ॥

ऐसा अनंतगुणरत्नाकर । देखतां प्रत्यक्ष ऋषिवर ।
सच्चिदानंद मुनि सादर । साष्टांग करी नमनातें ॥ ५७ ॥

ऐकोनि गंगा विस्मित । प्राणनाथ प्रश्न करित ।
म्हणे स्वामी मनुष्यांसि प्राप्त । देवदर्शन दुर्लभ ॥ ५८ ॥

या चर्मचक्षूसि देवतादर्शन । नव्हे ऐसें प्रत्यक्षप्रमाण ।
कधीं नसे केलें श्रवण । कैसें हें संघट्टण वदावें ॥ ५९ ॥

तत्रापि नारद देवऋषी । तयाचें दर्शन मानवासि ।
अतिदुर्लभ जो हृषीकेशी । कलावतार वर्णिला ॥ ६० ॥

जो व्यासवाल्मीकां गुरु । जयाचा त्रिलोकांत संचारु ।
ऐसा नारद रुषेश्वरु । प्रत्यक्ष केविं मुनिवर्या ॥ ६१ ॥

ऐकोनि सतीचा प्रश्न । निरंजन मुदितमनें ।
उत्तर देती प्रसन्न । अंतःकरण जयांचें ॥ ६२ ॥

कमळमुखी ! तुझा आक्षेप । ऐकतां निवे त्रिविधताप ।
आतां न धरोनि विक्षेप । मानस करीं सावध ॥ ६३ ॥

योगियां देवतादर्शन । घडे प्रत्यक्षप्रमाण ।
पतंजली वदले आपण । तेहीं परिसें प्रिये तूं ॥ ६४ ॥

सिद्धासन शांभवी मुद्रा । लक्ष लागतां योगींद्रा ।
पक्षमास स्थिर होतां निद्रा । हारपोन अनिमिषत्व प्राप्त घडे ॥६५॥

तेव्हां देवतादर्शन । योगिया घडे जाण ।
ऐसें असे शासन । योगपंथीं ॥ ६६ ॥

जो अखंड समाधिस्थ चिदानंदमुनि । समाधि तुर्यदशेचा धणी ।
तयासि नारदें कृपा करोनि । दर्शन दीधलें यथार्थ ॥ ६७ ॥

याविषयीं नवल । तां न मानिजे केवळ ।
योगी तोचि देव निखळ । त्यासि देवतादर्शन दुर्लभ नसे ॥ ६८ ॥

असो सकळ योगियांचा राजा । नारद त्रिलोकीं याच काजा ।
फिरोनि भगवद्भक्ति वोजा । प्रकट करी सज्जना ॥ ६९ ॥

तो आदिगुरु नारद । पाहतां मुनीभाव शुद्ध ।
सर्वोपचारीं पुजोनि साविध । बद्धपाणी विनवित ॥ ७० ॥

स्वामी त्रैलोक्यप्रकाशका । दर्शन देवोनि मज रंका ।
उद्धार केला भवपंका । शोषणकर्ता तूं दिनमणी ॥ ७१ ॥

गंगा लोटली अळासियावरि । तेचि येथें झाली परि ।
मीं पामर तूं कृपालहरी । अमृतनिधीची प्रत्यक्ष ॥ ७२ ॥

अनंतकोटिजन्माचा लाभ । आजि मज झाला सुलभ ।
जो तूं त्रैलोक्यदुर्लभ । प्राप्त झालासि मद्भाग्यें ॥ ७३ ॥

सुरासुरनमस्कृत । देवरुषी तुं ब्रह्मसुत ।
तुझा महिमा अनंत । अनंत तोहीं तुज वश्य ॥ ७ ॥

तुझें स्वरूप अच्युत । अच्युतानंद भगवंत ।
तुंचि सनातन सदोदित । मायानिरस्त तूं एक ॥ ७५ ॥

आतां माझा उद्धार । करावया प्रत्यक्षतर ।
तूंचि पातलासि चक्रधर । वीणाधर होवोनि ॥ ७६ ॥

जैसा सूर्यनारायण । लोकोपकारार्थ करी भ्रमण ।
स्वामी तुझेंही संचरण । दीनोद्धारण कराया ॥ ७७ ॥

आतां माझा उद्धार । होय तो कथावा प्रकार ।
स्वामि समर्थ सर्वेश्वर । भक्त परम सर्वेश्वराचे ॥ ७८ ॥

ऐकोनि सच्चिदानंद मुनिवचन । देखोनि योगी परम पावन ॥
सर्वज्ञ ऋषी अंतःकरणें । निर्मळ जाणोनि सर्वांतरत्वें ॥ ७९ ॥

म्हणती तूं योग्य मुनी । योगीं निपुण परमज्ञानी ।
परंतु भगवद्भजनीं । निष्ठा कांहीं धरावी ॥ ८० ॥

या कलयुगीं परमसार । तारक भगवद्भक्ति निर्धार ।
भक्तीवांचोनि अन्य प्रकार । लोकोद्धारक असेना ॥ ८१ ॥

कलियुगीं उत्पन्न जना । भक्तीवांचोनि अन्यसाधना ।
अधिकार सर्वथा असेना । कांजे तेहीं तूं परिसीं ॥ ८२ ॥

अल्प आयुष्यबळपौरुष । बुद्धिसाधन अशेष ।
पापवासना विशेष । इंद्रियलोलुपता परद्रोह ॥ ८३ ॥

जिव्होपस्थ रसविषय । सर्वांसि अभिमत हाच होय ।
सर्व तत्साधनीं उपाय–। करणीं प्रवर्तती स्वच्छंद ॥ ८४ ॥

टाकोनि वेदशास्त्रांचे मार्ग । प्रजा वर्तती उन्मार्ग ।
वर्णसंकरप्रसंग । शूद्रप्रायशा धर्मवक्ते ॥ ८५ ॥

स्त्रिया व्यभिचाररत । पातिव्रत्यादि धर्मदूषित ।
होवोनि वर्ततील तयांचा प्रांत । नरकवास यां सर्वां ॥ ८६ ॥

ब्राह्मणादि त्रिवर्ण । तें तों घडतील धर्महीन ।
शूद्र विलोभ नीचजन । आचार्य धर्मोपदेशक ॥ ८७ ॥

शूद्रांचें शिष्यत्व ब्राह्मण । अंगीकरोनि होतील धन्य ।
मंत्र देऊन अकुलीन । ब्राह्मणसेवन इच्छिती ॥ ८८ ॥

ऐसे अनंत दोष । कळी प्रसवेळ सावकाश ।
तेणें घडेल प्रजांचा नाश । पापाधिक्यें मुनिवर्या ॥ ८९ ॥

पूर्वयुगाप्रमाणें । योग यज्ञ धर्मदान ।
श्राद्धव्रत तीर्थ पावन । करूं न सकेति याजना ॥ ९० ॥

या युगीं मुख्य सार । भगवद्भक्ति पावन निर्धार ।
कैशीही आचरतां नर । पावे परपार भवाब्धीचा ॥ ९१ ॥

ह्मणोनि मुख्य भगवद्भक्ति । आचरोनि प्रकटिजे लोकांप्रती ।
हेंचि तारी निश्चितीं । नाव होवोनि कलिजना ॥ ९२ ॥

येथें नसे क्रमहानि । प्रत्यवाय न घडे कैशानी ।
स्वल्पही धर्म महाभयापासुनि । रक्षण करील निर्धारें ॥ ९३ ॥

योगी आपण एकटा एक । पावे परमात्मध्यानसुख ।
भोगी समाधि सम्यक । ब्रह्मबोध निष्टंक पावोनि ॥ ९४ ॥

तयांसि परांचा उद्धार । करणें न घडे साचार ।
ब्रह्मबोधग्राहक चतुर । असती कलियुगीं दुर्लभ ॥ ९५ ॥

कठिण योगीं कोणाची मति । रीघ करूं न सके पुरती ।
ह्मणोनि बहुतेक भ्रष्टती । योगप्राप्ति दुर्लभ ॥ ९६ ॥

कलियुगीं भगवद्भजन । हेंच मुख्य सार जाण ।
ऐक पूर्विकाचें वचन । भक्तिमार्गसाधक ॥ ९७ ॥

ज्ञानयोगसहस्राद्धि भक्तियोगो विशिष्यते ।
इति संचिंत्य संचिंत्य भक्तिरग्रे कृता बुधैः ॥ छ ॥

याच कारणें योगसिद्ध । तुज पाहोनि परम शुद्ध ।
मीं पातलों प्रसिद्ध । कलियुगीं भजन प्रवर्ताविजे ॥ ९८ ॥

तूं आहेसि अधिकारवंत । अध्यात्मनिष्ठ योगपारंगत ।
सकळसद्गुणमंडित । महापंडित धर्मज्ञ ॥ ९९ ॥

आतां वासुदेवद्वादशाक्षर । मोक्षविद्या परमसार ।
जपति सात्वतवृंद थोर । भीष्मोद्धवादि हरिजन ॥ १०० ॥

विधिसनकादि प्रजापती । अस्मदादि देवर्षी इंद्रादि दिग्पती ।
सप्तऋषीहीं श्रेष्ठ अति । तेहीं जपती हे विद्या ॥ १०१ ॥

वागीश्वरादि सुरगुरु । ज्योतिश्चक्रचाळक ध्रुरु ।
ज्यांच उपदेशिला उत्तानपादकुमारु । जो विष्णुपद पावला ॥१०२॥

ऐसे ऐसे महानुभाव । सात्वत महाऋषी देव ।
लोकीं जयांचा प्रभाव । अद्भुत वर्णिती पुराणें ॥ १०३ ॥

ऐशी संपादोनि सिद्धी । लोकीं पावले प्रसिद्धी ।
शेखीं शोभतां विष्णुपदीं । सारूप्यसायुज्यपदलाभें ॥ १०४ ॥

जे किंचिद्भेदें भजले । ते सारूप्यपद पावले ।
अभेदभजनें विराजले । सायुज्यमुक्ति हरिरूप ॥ १०५ ॥

वासुदेवः सर्वमिति । अद्वैतबोध जयाप्रति ।
तयांसि सायुज्यमुक्तिप्राप्ति । भगवद्वचन प्रत्यक्ष ॥ १०६ ॥

ह्मणौनि सर्व प्रकारें । वासुदेवभजन करोनि नरें ।
मुक्ति पाविजे अविचारें । हेंच सांगतों तुज मुनि ॥ १०७ ॥

व्यासवाल्मीकांसि पूर्वीं ऐसा । ज्यांच उपदेश केला द्विजेशा ।
वेदविभागसामर्थ्य व्यासा । आलें पुराणाचार्यत्व ॥ १०८ ॥

वाल्मीकें मूळरामायण । गायत्रीअर्थप्रतिपादन ।
करोनि तारिलें विश्व तेणें । वाशिष्ठरामायणहीं करोनि ॥ १०९ ॥

बत्तीस सहस्र ग्रंथ सिद्ध । अध्यात्मबोध प्रसिद्ध ।
राजयोगपदवी अगाध । उपदेश तयांत परोपरी ॥ ११० ॥

सारांश हेंच सांगणें । वासुदेवविद्या परमगहन ।
ते तु करीं ग्रहण । मुक्ति पावन करतळीं ॥ १११ ॥

ऐकोनि नारदाचें आदेशवचन । सच्चिदानंद करिती विज्ञापन ।
देवा आजि करुणाघन । बोळलासि मज दीनावरि ॥ ११२ ॥

स्वामी माझा संशयनिरास । करोनि द्यावा उपदेश ।
तुझिया भाषणें अत्यंत कलुषा । बुद्धि माझी पावली ॥ ११३ ॥

स्वामी दत्तादि गुरुपरंपरा । महाविद्या षोडशाक्षरा ।
उर्ध्वाम्नाय उपासना धुरा । पंचाम्नायपूर्वक ॥ ११४ ॥

अनुत्तरादि पूर्वाम्नाय । जे जे आले सांप्रदायें ।
तयांचा जप यथान्यायें । करोनि वसें परम सुखी ॥ ११५ ॥

तत्प्रभावें षड्चक्रभेदन । सामर्थ्य पावलों अतिगहन ।
आतां तव पादपद्मदर्शन । तत्प्रभावें मज घडलें ॥ ११६ ॥

परमशिवविद्या हे श्रेष्ठ । हेंचि मुक्तीचें मूळपीठ ।
नाहीं यासम वरिष्ठ । सर्वेष्टसुखसार हें ॥ ११७ ॥

भुक्तिमुक्तिदायक पावन । जें पावतां सर्वज्ञपण ।
प्राप्त होय निःसंशय जाण । महिमा वर्णन करी कोण याचा॥११८॥

शिवब्रह्मजीवैक्यभावन । येणें मन घडलें उन्मन ।
महासुखपदवी पूर्ण । भोगीतसें जी गुरुकृपें ॥ ११९ ॥

देवऋषी हें परमसार । जेणें पद पावलों अगाधतर ।
तयासि सांडोनि द्वादशाक्षर । ग्रहण करणें केंवि घडे ॥ १२० ॥

परम शिवमय झालें मन । परशिवमय झालें ज्ञान ।
परशिवमय ध्यान । सर्वेशिवमय हें जग ॥ १२१ ॥

सर्वशिवभावन । अखंडाद्वयबोध गहन ।
प्राप्त असतां गुरुकृपेनें । तत्त्याग करणें केंवि घडे ॥ १२२ ॥

गुरुत्याग उपासनात्याग । पूर्वील त्यागोनि अनेग ।
संपादिजे नूतन प्रसंग । हाहिं कैसा ऋषिराया ॥ १२३ ॥

मंत्रत्यागें अधोगती । गुरुत्यागें रौरवप्राप्ति ।
अंधतमीं ते नर पडती । अपुनरावृत्ति जेथुनि ॥ १२४ ॥

असूर्यनामक ते लोक । अंधतमें दाटले देख ।
ते पावती निःशंक । गुरुसांप्रदायत्यागकर्ते ॥ १२५ ॥

असूर्यानाम ते लोका अंधेन तमसावृता ऐशी श्रुती ।
जे लोक सांगे तत्प्राप्ति ।
घडतां ह्मणिजे अधोगती । श्रुतिस्मृतिप्रमाण ॥ १२६ ॥

गुरुमंत्रद्रोही नर । तें स्थळ पावती निर्धार ।
करतळीं मुक्ति प्राप्त असतां इतर । उपासना ते किं समर्थ ॥१२७॥

आरोहण करोनि शिखरीं । अधःपतन तयापरीं ।
हाहीं भाव निर्धारीं । वाटे मजला सर्वज्ञा ॥ १२८ ॥

या दोषा नातळतां । मंत्रविरोध न होतां
योगचर्या न पावतां । पराभव समर्था ॥ १२९ ॥

अविरुद्ध मंत्र द्वादशाक्षर । प्राप्त होतां अंगीकार ।
विरुद्धें तया नमस्कार । अप्राप्त मातें ह्मणौनि ॥ १३० ॥

शिवविष्णुभेदप्रातिपत्ति । उपासना भिन्न यथास्थिति ।
असतां ऐक्य घडे कैंवि निगुती । कृपा करोनि वदावें ॥ १३१ ॥

ऐकोनि सच्चिदानंद वचन । नारद अत्यंत प्रहृष्टमन ।
परमरहस्यउपदेश गहन । करिते झाले कंजाक्षी ! ॥ १३२ ॥

शिवविष्णुऐक्यप्रतीति । बोध केला यथास्थिति ।
तोचि प्रसंग तुजप्रति । कथितों सती ! श्रवण करीं ॥ १३३ ॥

नारद ह्मणती चिदानंदा । निगमागमविशारदा ।
सत्यवादी योगसिद्धा । शुद्धबुद्धा तूं ऐकें ॥ १३४ ॥

परा प्रासाद चिंतन । परम शिवस्वरूप गहन ।
तेथें वेधलें तुझें मन । समरस भान ( भनि ? ) जीवशिवा ॥ १३५ ॥

झाली परमानंदप्राप्ति । विवेकबळें निश्चित्ती ।
योगमार्ग हीं षड्चक्रपंथीं । भेद करोनि सहस्रारीं ॥ १३६ ॥

शिवज्योतिशीं संयोग । जीवशक्ति कुंडलिनी अव्यंग ।
ऐक्य पावोनि अभंग । झालासि जिंतोनि कळिकाळा ॥ १३७ ॥

जन्ममृत्युजरादि व्यवहार । हाहीं झाला परिहार ।
परि राहिला किंचित पदर । भेदबुद्धीचा ॥ १३८ ॥

शिवविष्णु भिन्नमती । हे तुज राहिली निश्चिती ।
याची व्हावया शांति । उपदेश सुमती करितसें ॥ १३९ ॥

भेदभावना काळकूट । तया परिहारोनि सुभट ।
अमृतपान शुद्धवट । करवीन अद्वैतश्रवण करीं ॥ १४० ॥

शिव विष्णू वांचोनि कांहीं । चराचरीं अन्य नाहीं ।
हें जग उभयात्मक निश्चयीं । विवेकें त्रिलोकी सादरें ॥ १४१ ॥

पराप्रासादविद्या गहन । शक्तिस्वरूप निर्वाण ।
तोचि विष्णु आदिकारण । शक्तिरूपें प्रकाशत ॥ १४२ ॥

पुरुषरूप जो साक्षी । तोचि कूटस्थ शिव अनुलक्षीं ।
चंद्रचंद्रिकाभेदपक्षीं । प्रमाण मानिजे कैसेनि ॥ १४३ ॥

दीपज्योति सूर्यप्रभा । गगनगगनीचा गाभा ।
द्विधा केवि मानिजे शुभा । भेद नसतां तद्वत ॥ १४४ ॥

निष्कळ ब्रह्म परिपूर्ण । धरितां सृष्टिकरण स्फुरण ।
शिवशक्तिस्वरूपचिंतन । करोनि होणें द्विविधत्वें ॥ १४५ ॥

आपणचि पतिपत्नी घडान । कीले विश्वरूप धरोनि पूर्ण ।
पत्नी शक्ति ते विष्णु जाण । पुरुष आपण परमात्मा ॥ १४६ ॥

शिवशक्त्यात्मक जग रची । उभयस्वरूपें आपुणाचि ।
विलसती चराचरीं हेचि । प्रत्यक्ष चिन्ह अवलोकीं ॥ १४७ ॥

योनिलिंगावांचोनि कांहीं । चराचरीं अन्य नाहीं ।
यदर्थीं श्रुति प्रमाण तेहीं । परिसीं ताता ॥ १४८ ॥

विष्णुर्योनिं कल्पयतु । ऐसा श्रुतीचा सिद्धांतु ।
स्मृतिवाक्यार्थेंही व्यक्तु । परिसें आतां ॥ १४९ ॥

योनिरूपो भवेद्विष्णुर्लिंगरूपी सदाशिव इति ।
ऐसींप्रमाणें असंख्याती ।
उभयचिन्हप्रतीति । लोकीं दिसे आवीटां ( ? ) ॥ १५० ॥

यां उभयांवांचोनि कांहीं । चराचरीं *अन्य नाहीं ।
ब्रह्मांडांतर्बाह्य पाहीं । अन्य नसे याविना ॥ १५१ ॥

प्रकृति पुरुष दोनी । नाम मात्र भवसेनी ।
प्रकृतिपुरुषां विष्णुशिवपणीं । अभिन्न वर्तणें उभयतां ॥ १५२ ॥

जें आठरूपें प्रकृतीचीं । तेंचि आठरूपें शिवाचीं ।
अष्टमूर्ती हे भवाची । परिसें बापा ॥ १५३ ॥

भूमि आप अनळानिळ । आकाश चंद्र सूर्याग्नि केवळ ।
शिवाष्टमूर्ती निवळ । वर्णिती शास्त्रें ॥ १५४ ॥

भूमिरापोनलो वायुः । खंमनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे । भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ १५५ ॥

गीतासंमति ऐसी । अष्टधा भिन्नत्व प्रकृतीसि ।
ते माझी ह्मणोनि हृषीकेशी । कथिली पार्थो ॥ १५६ ॥

तूं म्हणसी मनबुद्धि अहंकार । तेथें भिन्न व्यवहार ।
सूर्याग्नि चंद्रासि ऐक्यत्व कवण्या प्रकारें । साधेल ऐसें ॥१५७॥

मन तोचि निशाकर । बुद्धि ते दिवाकर ।
जाठर तो अहंकार । जाणिजे सिद्ध ॥ १५८ ॥

एवं अष्टधापणी । तोचि विराजे पिनाकपाणी ।
तोचि शक्तिरूप चक्रपाणी । भेद कवणी मानिजे ॥ १५९ ॥

ऐशी अनंतानंत प्रमाणें । शिवविष्णुऐक्यविषयीं जाण ।
उभयभेदभावन । तेंचि पतन सर्वथा ॥ १६० ॥

तोचि हानि तोचि क्षय । तोचि मृत्यु तोचि भय ।
उभयऐक्य मोक्ष अभय । येथें संशय न धरीं तुं ॥ १६१ ॥

---

* मूळांत " ब्रह्मांडगर्भी " असें प्रथम होतें.

न करितां पूर्वगुरुत्याग । न करितां परता राजयोग ।
उपासना अन्यंग । असतां भजें विष्णूतें ॥ १६२ ॥

याचें हेंचि कारण । तुज निवेदितों जाण ।
मोक्षदाता नारायण । नेम केला ॥ १६३ ॥

बंधशक्तीनें बंधन । करोनि जीवा संसृतिभ्रमण ।
करवौनि मोक्ष शक्तिगुणें । मुक्ति देणें विष्णूचें ॥ १६४ ॥

॥ श्लोक० ॥ बंधको भवपाशेन भवपाशाच्च मोचकः ।
कैवल्यदः परंब्रह्म विष्णुर्देव सनातनः ॥

उभयशक्तिस्वरूपें । बंधमुक्तिघटणरूपें ।
जीवांसि चेष्टवी अरूपें । असतांहीं ॥ १६५ ॥

अळंकार असतां पूर्ण । धरिजे विशेषें शिरोभूषण ।
तैशी सर्वोपासना मुकुटमंडण । महाविद्या हे मुनी ॥ १६६ ॥

ऐकोनि नारदादेशवाणी । परमानंदनिर्भर सच्चिदानंद मुनी ।
साष्टांग लोटला नारदचरणी । धन्य मानोनि आपणातें ॥ १६७ ॥

म्हणे स्वामी करुणासिंधु । तुम्ही यथार्थ दीनबंधु ।
तुमच्या दर्शनें संसारसिंधु । वत्सपाद मानावा ॥ १६८ ॥

सहज तुमचें आगमन । जया सदनी काकताळप्रमाणें ।
तया नरा सकळ कल्याण । साधन सर्वां सिद्धिचें ॥ १६९ ॥

मोक्ष तुमचा अज्ञाधार । कृपा होतां स्वल्पतर ।
त्या नरा सेवी सत्वर । ऐशी उदार हे पदमहिमा ॥ १७० ॥

शिवविष्णुसामरस्य । प्रत्यक्ष बोधिलें रहस्य ।
अद्वयबोधप्रकाश । सर्वथा घडला ॥ १७१ ॥

चिद्ग्रंथि भेदोनि स्वल्पतर । उरला होता पदर ।
तोहीं झाला परिहार । रहस्यबोधें आपुलिया ॥ १७२ ॥

पूर्व उपासनेहुनि । विशेष लाभ मजलागुनि ।
आजि घडतां उपेक्षिजे काय म्हणोनि । दीनोद्धरणीं रक्षितां ॥ १७३ ॥

असतां सकळ संपत्तीं । निधी जोडिला अकल्पितीं ।
तया उपेक्षी ऐसा मूढमति । कोणी न दिसे त्रिभुवनीं ॥ १७४ ॥

म्हणोनि शरणागतवत्सला । द्वादशाक्षरी उपदेशिजे मला ।
मस्तक चरणीं ठेविला । का न वोडविला सन्मुख ॥ १७५ ॥

नारदें मस्तक स्पर्शोनि पाणी । सादर अवलोकोनि कृपे करुनि ।
द्वादशाक्षरी विद्यामणी । हृदयपेटिके ठेविला ॥ १७६ ॥

प्राप्त होतां महामनु । उद्बोध दाटला अतिगहनु ।
अष्टभावें भरला पूर्णु । सागरपर्वीं उचंबळत ॥ १७७ ॥

तैसा उद्बोध वाढला । तो स्वस्वरूपीं सांठविला ।
अनूर्मि सिंधुवत राहिला । गंभिराशय निजबोधें ॥ १७८ ॥

पुन्हा नारदाप्रति विज्ञप्ति । मुनी करी बद्धहस्तीं ।
दीनबंधु ब्रह्ममूर्ति । वचन माझें परिसिजे ॥ १७९ ॥

आजिपर्यंत शिवध्यान । हृदयीं ठसावलें गहन ।
आतां चिंतिजे नारायण । श्रीनिरंजन वासुदेव ॥ १८० ॥

विना कांहीं अवलंबन । न घडे वाटे सकळ ध्यान ।
यास्तव ध्येयमूर्ति पावन । द्यावी मजलागोनि योगींद्रा ॥ १८१ ॥

सकळ ध्यानावांचोन । निष्कळ सर्वथा नोहे पूर्ण ।
म्हणोन मूर्तीवांचोन । नव्हे मनन ध्यानरूप ॥ १८२ ॥

ऐसें ऐकतां श्रवणीं । मस्तक तुकोनि नारदमुनि ।
बद्ध भ्रुकुटी चिंतनीं । त्रिभुवनभुवनी तो पाहे ॥ १८३ ॥

एक मुहूर्त संपूर्ण । नारद ध्यातां अविकंपन ।
तत्समयीं स्मरलें जाण । प्रियतमे ! तया सर्वज्ञा ॥ १८४ ॥

तेव्हां प्रफुल्लित वदन । मुनिमुखा करोनि अवलोकन ।
म्हणे तुझें भाग्य गहन । सूचलें निधान अकस्मात ॥ १८५ ॥

तुवां इच्छिली मूर्ति । ते अद्भुत आहे यथास्थिति ।
जे पूजी मुचकुंद नृपती । विंध्यपर्वतीं अभिनव ॥ १८६ ॥

तें मी तुज करवीन प्राप्त । मजसवें चालावें निश्चित ।
ऐसें वदतां विस्मित सस्मित । मुनी पुसत देवऋषीतें ॥ १८७ ॥

स्वामी मुचकुंद तो कवण । कोणा नृपाचा नंदन ।
तो करी अर्चन । ते मूर्ति कवण वदावी ॥ १८८ ॥

तो कां देयील मजप्रति । निजाराधित भगवन्मूर्ति ।
तेयासि जाहली तत्प्राप्ति । ते कथा निगुतीं वदावी ॥ १८९ ॥

तेणेंकरुनि हें मन । विशेष पावेल समाधान ।
श्रीकृष्णमहिमा गहन । वाढेल पूर्ण या लोकीं ॥ १९० ॥

मज दीनाचा उद्धार । दर्शनमात्रें घडला साचार ।
उरला नाहीं स्वल्पतर । संदेह किमपि उदारा ॥ १९१ ॥

ऐकोनि मुनीची आदरवाणी । म्हणे कथा परिसें श्रवणीं ।
जे ऐकतां पापधूणी । घडे सहस्रां जन्माची ॥ १९२ ॥

हे कथा पावन । तात्काळ सोडी भवबंधन ।
तुझें देखोनि प्रेम गहन । वाटे कथन करावें ॥ १९३ ॥

ऐसें बोलोनि सादर वचन । सन्मुख मुनीस घेउन ।
नारद कथा कथी पूर्ण । ते मी वदेन पुढिल्या प्रसंगीं ॥ १९४ ॥

कांते । तूंहीं सादर मनें । कथा परिसें अतिपावन ।
मुमुक्षुजना जीवन । भवजीवनतारणनौका हे ॥ १९५ ॥

हे कृष्णकथा परमसार । साधककुळां मंदार ।
हे मुक्तिफळदातार । महावल्ली अमृतमय ॥ १९६ ॥

ऐसी निजसुंदरीप्रति । निरंजनयोगी कथा कथी ।
दास विनवी संतांप्रति । श्रवणीं प्रीति असावी ॥ १९७ ॥

इति श्रीसद्गुरुसंततिसंतानलतिकायाः प्रबोधमंगळमंजर्याः अनुग्रहपरिमळप्रकाशनं नाम द्वितीयोद्गारः ॥ श्रीसुंदरकृष्णार्पणमस्तु ॥

---

# उद्धार तिसरा.

श्रीशार्ङ्गधरायैनमः । श्रीगुरुभ्यो नमः ॥

आतां तृतीय उद्धार । परिसिजे कथा अतिमधुर ।
निरंजन प्रेमपुरःसर । कथी सतीस प्रमोदें ॥ १ ॥

म्हणे पूर्णसशांकमुखी ! । नारद देवऋषी हरिखीं ।
कथा वदले बोधसुखीं । असतां स्मरोनि श्रीकृष्णा ॥२॥

म्हणे मुनी सच्चिदानंदा । मांधातराजपुत्र मुचकुंदा ।
देवीं पाचारोनि नेला स्वपदा । रक्षणार्थ सुरलोका ॥३॥

दैत्याक्रांत स्वर्गलोक । पाहोनि भूपती स्वरक्षक ।
ठेविला इंद्रें अनेक । वर्षें मानें देवांच्या ॥४॥

लोटलीं युगाचीं युगगणें । मुचुकुंदें रक्षिले देवगण ।
युद्धीं जिंतिले दारुण । दानवनायक भूपाळें ॥५॥

दैत्य पळोनि पाताळलोका । जाते झाले मुनितिलका ।
देव पावले अशोका । स्वर्गसुखा निश्चिंत ॥६॥

झालें कंटक-निरशन । देव झाले प्रसन्न ।
गौरवोनि दिव्यभूषणें । वर माग म्हणती नृपातें ॥७॥

मुचुकुंद म्हणे देवेंद्रासि । मी मनुष्य असतां स्वर्गवासीं ।
निद्रा त्यजोनि अहर्निशी । रक्षक झालों युगगणना ॥८॥

मजला निद्रा पीडा करी । मनुजत्व आहे शरीरीं ।
धैर्यावलंबोनि राहिलों परि । निद्रा परिहारीं असमर्थ ॥ ९ ॥

कृपा करोनि मजप्रति । भूमिस्थळ योजिजे निश्चिती
तेथें पावतां सुषुप्त । भंग न घडे तो जैसा ॥ १० ॥

माझी निद्रा करील भंग । त्याचाच घडावा शरीरभंग
ऐसा वर सांग । याचा मातें सुरांहीं ॥ ११ ॥

ऐकोनि भूपाळवचन । अवश्य ह्मणे पाकशासन ।
तुझी निद्रा करील भग्न । तो तात्काळ दहन होईल ॥ १२ ॥

तुझिया नेत्राग्नीचेनि तेजें । शरीर दग्ध घडेल सहजें ।
जावोनि भूपती सुखीं निजे । सह्यपर्वतीं गुहेसी ॥ १३ ॥

ऐसें देवोनि वरदान । दाविली गुहा अतिगहन ।
जैसें विस्तीर्ण गगन । तैशी तेहीं अनंत ॥१४ ॥

देखोनि ते महादरी । मुचुकुंद सानंद निद्रा करी ।
वर्षे लोटलीं असंख्य तरीं । नये उजगरी भूपाळा ॥ १५ ॥

श्रीकृष्णराम द्वापारांतीं । भूभारभूपाळनाशनार्थीं ।
अवतार यादवकुळांतीं । वसुदेवगृहीं प्रसिद्ध ॥ १६ ॥

बहुत मारिले दैत्य प्रबळ । कंसकेशीचाणूरमल्ल ।
गोकुळीं प्रलंबकधेनुकादि अतुळ । मारिले दैत्य विरोधी ॥ १७ ॥

अठरा वेळ जरासंध । करुं पातला द्वंद्वयुद्ध ।
तयासि न मारितां गोविंद । जीवमात्रें सोडिला ॥ १८ ॥

काळयवन दुर्मद । लोकीं फिरे द्वंद्वयुद्ध ।
अपेक्षुनि ह्मणे मीं प्रसिद्ध । योद्धा पाहेन समान ॥ १९ ॥

स्वर्ग मृत्यु पाताळ । त्रिलोक धांडोळी अतिप्रबळ ।
परंतु आपणांसमान बळ । न देखतां विव्हळ मनीं घडे ॥ २० ॥

माझी दोर्दंडकंडूति । शमनकर्ता वीर आति ।
म्यां न देखिला त्रिलोकवर्ती । व्यर्थ जीवन हें माझें ॥ २१ ॥

ऐसें धिकारोनि आपणा । उन्मत्त फिरे धुंडित त्रिभुवना ।
अकस्मात माझी घटणा । मार्गीं झाली दैवयोगें ॥ २२ ॥

नमोनि मातें यवनपती । वीर पुसे त्रिलोकवर्ती ।
स्वामी देवर्षी सर्वज्ञ मूर्ति । आर्ति माझी पुरवावी ॥ २३ ॥

मजसमान वीर धरणी । अथवा असेल पाताळभुवनीं ।
स्वर्गीं सुरामाजि कोणी । असेल तरि तो कथावा ॥ २४ ॥

तयासीं करोनि द्वंद्वसमर । भुजदंड–कंडूचा परिहार
घडे ऐसा रणचतुर । महावीर तो दावीं ॥ २५ ॥

ऐकोनि तयाची भारती । दुर्धर गर्वें न लेखी सुरपति ।
तयासि मीं वदलों गा यवनपती । अति बळवीर क्षिती असे एक॥२६॥

जो वसुदेवाचा नंदन । जेणें मर्दिले असुर दारुण ।
तो एक मथुरेमाजि श्रीकृष्ण । कंडू हरण तो करील ॥ २७ ॥

तयासमान बळी । न देखे कोणी वसुधातळीं ।
स्वर्ग पाताळ देवदानवकुळीं । म्हणोनि बळी अर्पिती भयें तया ॥२८॥

तयासीं करिसी द्वंद्वयुद्ध । तेव्हां जिरेल तुझा मद ।
ऐसें ऐकोनि परम मोद । पावता झाला काळयवन ॥ २९ ॥

काळ काळें ग्रासिला । काळ तयासि समीप आला ।
तात्काळ सुकाळ वाटला । काळ पाहोनि समराचा ॥ ३० ॥

त्रिकोटियवनाधीश्वर । परम उग्र जे रणशूर ।
तयांशीं वेढिलें मथुरापुर । युद्धाभिलाषें मदमत्त ॥ ३१ ॥

देखोनि यवन महाबळी । द्वारका समुद्रीं वसविली ।
आपण निरायुध प्रातःकाळीं । निघाला बळी श्रीकृष्ण ॥ ३२ ॥

द्वारदेशींहुनि एकला । निघतां वीर तेणें देखिला ।
सर्वलक्षणी घनसांवळा । श्रीवत्स गळां कौस्तुभ ॥ ३३ ॥

अतिविशाळ वक्षस्थळ । नेत्रारुण कमळदळ ।
माथां शोभती अलिकुंतळ । किरीट सोज्वळ मस्तकीं ॥ ३४ ॥

भुजचतुष्टय लंबायमान । दिग्गिभशुंडादंडसमान ।
पीतांबर परिधान । वैजयंती वनमाला ॥ ३५ ॥

कस्तूरीतिलक भाळ । अधरारुणबिंबफळ ।
चरणयुगुल रातोत्पळ । नखचंद्र किरळ फांकती ॥ ३६ ॥

ऐसा सर्वलक्षणगुणी । परि निरायुध चालिला चरणीं ।
सकळ देवांचा मुकुटमणी । देखे लोचनीं यवनेश ॥ ३७ ॥

नारदें कथिला तो वीर । श्रीकृष्ण हाचि निर्धार ।
आयुध वाहन नसतां पादचार । फिरे निमित्त नेणवे ॥ ३८ ॥

असो मींहीं तयाप्रती । निरायुध भिडेन मुष्टिघातीं ।
पादचारी न बैसतां रथीं । धरीन यातें धावोनि ॥ ३९ ॥

ऐसा करोनि संकल्प । पाठीं लागला यवनभूप ।
जयासि योगी निष्कंप । मानसें ध्यातां नातुडे जो ॥ ४० ॥

तयासि धरीन ह्मणोन । पाठलाग करी यवन ।
जयासि दुर्मदाभिमान । वारिधी वाढला गर्वाचा ॥ ४१ ॥

ह्मणे यदुकुळप्रसूतवीरा । न पळतां राहें सामोरा ।
द्वंद्वयुद्धार्थ मीं आलों धुरा । धिरा धिरा बळवंता ॥ ४२ ॥

नारदें कथिली तुझी खूण । तोचि तुं श्रीकृष्ण प्रमाण ।
युद्ध न देतां पलायमान । होणें न धर्म क्षात्रियां ॥ ४३ ॥

कांहीं करी स्तवन । कांहीं करी निर्भर्छन ।
कांहीं करी धावन । हातीं धरीन ह्मणोनि ॥ ४४ ॥

कृष्ण न बोलतां कांहीं । पुढें चाले लवलाहीं ।
धरिला धरिलासि पळसील कायि । ह्मणोनि लागे पाठीसीं ॥४५॥

विष्णुमायामोहित । मागें फिरुं न सके चित्त ।
काळें आयुष्य हरिलें भ्रांत । मृगलुब्धका लोधे तेंवि ॥ ४६ ॥

ऐसें चाळवीत चाळवीत । नेला मुचकुंद गुहेआंत
तेथें पुरुष निद्रित । देखोनि पीतांबर पांघुरविला ॥ ४७ ॥

स्वयें पावला अंतर्धान । तों पाठोपाठीं आला यवन ।
ह्मणे निजेला येथ येवोन । कांहीं नेणे तैसा हा ॥ ४८ ॥

पाहोनि वरिचा पीतांबर । कृष्ण समजोनि लत्ताप्रहर ।
करितां जागृत नृपवर । क्रोधें पाहतां तो यवन ॥ ४९ ॥

भस्म झाला तात्काळ । कर्पूरासि झगटतां अनळ ।
तेंचि परि जाहली भंबाळ । सर्व शरीरा ते क्षणीं ॥ ५० ॥

आश्चर्य मानी मुचकुंद । हा कोण पापी झाला दग्ध ।
वर्तमान न कळतां संदिग्ध । स्तब्धपणें राहिला ॥ ५१ ॥

तंव गुहा देखिली प्रकाशित । साश्चर्य पाहे लोकनाथ ।
तंव घनशाम अकस्मात । मदनसुंदर देखिला ॥ ५२ ॥

सकळलक्षणीं लक्षित । जो कां साक्षात लक्ष्मीकांत ।
श्रीवत्सकौस्तुभें मंडित । पीतांबर परिधान ॥ ५३ ॥

पदक कुंडलें विराजमान । मकराकृति सूर्येंदुसमान ।
कपोलयुग मुकुरायमान । तेजें सघन शोभती ॥ ५४ ॥

जाणोनि साक्षात परमपुरुष । मुचकुंदास झाला हर्ष ।
साष्टांग नमन करोनि संतोष । प्रश्न करी कृष्णातें ॥ ५५ ॥

ह्मणे स्वामी आपण कवण । सूर्यकोटिप्रकाशपूर्ण ।
स्वरूपीं जयाचे अमित मदन । वोवाळणी सांडिजे ॥ ५६ ॥

हा कोण दग्ध झाला पापी । स्वकृत पापें अपापी ।
तूं गा कोण दिव्यरूपी । कथन देवा करावें ॥ ५७ ॥

म्हणोनि पुन्हा नमितां चरणीं । मंदस्मितें चक्रपाणी ।
भक्ति नम्र नृपमणी । तयासि कथनी तो कथी ॥ ५८ ॥

सांप्रत जन्मकर्म–नामरूपा । अंत नसे माझिया नृपा ।
भूमिरजातें मोजिता सोपा । परि माझ्या पडपा न गणवे ॥ ५९ ॥

यादव वसुदेवसुत । देवकीगर्भसंभूत ।
भूभार करावया शांत । अवतरलों मीं आदिविष्णु ॥ ६० ॥

मारिले कंसादि असुर । जरासंध–सेना–परिवार ।
हा काळयवन दुर्धर । दग्ध झाला नव नेत्रानळें ॥ ६१ ॥

मारीन पृथ्वीचे नृपकुमार । जे गर्वी अत्यंत शूर ।
आतां पांडवपक्ष करोनि इतर । नाश करीन बहुतां मिसें ॥ ६२ ॥

करोनि कौरव निमित्तधारी । अठरा अक्षौहिणी भारी ।
सेना मारवीन अठरा वासरीं । पार्थाकरीं मीं चाळक ॥ ६३ ॥
बाण भौमादि असुर । तयांचा करीन संहार ।
मारीन शिशुपाळ दंतवक्र । क्रूर शाल्वशृगालादिक ॥ ६४ ॥
अनेकलीला मुरारी । करोनि परिणीन सोळा सहस्रनारी ।
लग्न लावीन एका वासरीं । सर्वांघरीं मीं मुहूर्तें एका ॥ ६५ ॥
अंतीं यादवकुळाचा नाश । करीन विप्रशापमिसें ।
उद्धव पार्था उपदेश । करीन आत्मज्ञानाचा ॥ ६६ ॥
कलिजनासि कीर्ति नौका । भवतारिणी करोनि लोकां ।
तारीन भाविकां अनेकां । कलिदोषपंका नातळतां ॥ ६७ ॥
अनिरुद्ध प्रद्युम्न संकर्षण । वासुदेव मीच नारायण ।
चतुर्व्यूह उपासन । प्रकट करीन सात्वतां ॥ ६८ ॥
जया नरां जेथें आवडी । अधिकारपरत्वें बुद्धि गाढी ।
होतां संसार संकटबेडी । तुटे धडफुडी तात्काळ ॥ ६९ ॥
आतां येथें यावया कारण । पुण्यश्लोक तूं मद्भक्त पूर्ण ।
तुज यावया दर्शन । करणें तुझा उद्धार ॥ ७० ॥
अलभ्य माझें दर्शन । अलभ्य माझें भजन ।
अलभ्य माझें कीर्तन । पावन करील मद्भक्ता ॥ ७१ ॥
अनंत जन्माच्या कोटी । सरतां तयाच्या सेवटीं ।
अकस्मात माझी होतां भेटी । घडे तुटी संसारा ॥ ७२ ॥
माझें होतां दर्शन । तात्काळ घडे पापदहन ।
भक्ती घडे शुद्ध ज्ञान । तेणें जन्ममरण विनाशे ॥ ७३ ॥
जन्ममरण विनाशतां । मुक्ति चतुर्धा होती प्राप्ता ।
भेद भजका सालोक्य सामीप्य सरूपता ।
अभेदीं सायुज्यता निवाड ॥ ७४ ॥
सर्वेंहीं माझें भजन एक । घडे मुक्तिसंपादक ।
मींच एक मुक्तिदायक । हाचि विवेक आदरी तुं ॥ ७५ ॥

असो आतां नरेंद्रा । पुरली तुझी महानिद्रा ।
माझिया ध्यानें गुणसमुद्रा । सायुज्य माझें पावसी ॥ ७६ ॥
आतां तुज उपासन । कृष्णमंत्र घे पावन ।
तेणें तुझें पाप गहन । दग्ध होईल जपमात्रें ॥ ७७ ॥
ध्यान जपें तुतें मुक्ति । ऐशी कथिली युक्ति ।
दीधली करतळीं जीवन्मुक्ति । प्रापक विद्या प्रत्यक्ष ॥ ७८ ॥
जो मंत्र कृष्ण षडक्षर । मुंचकुंदासि उपदेशी जगदीश्वर ।
ह्मणे सेवीं विंध्य गिरिवर । तेथें आचार अनुष्ठान ॥ ७९ ॥
या मंत्रमूर्तीचें उपासन । हाचि जप हेंचि ध्यान ।
करितां घडेल कलुषहरण । होसि पावन नृपवर्या ॥ ८० ॥
माझें करितां भजन । होईल अपरोक्ष्य परमज्ञान ।
जेणें मज सनातन । देखसी सर्वत्र जनीं वनीं ॥ ८१ ॥
ऐसा करितां उपदेश । मुचकुंद मानी परम हर्ष ।
ह्मणे हाचि महापुरुष । जगदीश आदिनारायण ॥ ८२ ॥
याचें करावया स्तोत्र । उद्युक्त झाला यौवनाश्वपुत्र ।
मुचकुंदराव पवित्र । गर्ग वचना स्मरोनि ॥ ८३ ॥

## मुचकुंदस्तुतिः—

विमोहितो यजनं ईशमायया । त्वदीयया त्वां न भजत्यनर्थदृक् ।
सुखाय दुःखप्रभवेषु सज्जते । गृहेषु योषित्पुरुषेषु वंचितः॥ १ ॥
भगवंता ईश्वरा नारायणा । पुराणपुरुषा करुणाघना ।
पावन केलें पुरातना । मज दर्शना देवोनि ॥ ८४ ॥
तुझिया माये मोहित जन । न करितां तुझें भजन ।
अनर्थ दृष्टिते अर्थ जाणून । दुःखप्रभवीं सज्ज होती ॥ ८५ ॥
गृहीं होती आसक्त । सुखातें इछोनि अनुरक्त ।
स्त्रियानी वंचिले असक्त । पाशीं गुंतले ममतेच्या ॥ ८६ ॥
लब्ध्वा जनो दुर्लभमंत्रमानुषं । कथंचिदव्यंगमयत्नतोऽनघ ।
पदारविंदं न भजत्यसन्मति–। गृहांधकूपे पतितो यथा पशुः ॥ २ ॥

यालोकीं पावोन जनन । सर्व सुखाचें आयतन ।
मनुष्यत्व द्विजत्वहीं असोन । तूंतें नभजो नवंचले ॥ ८७ ॥

परम यत्नें नव्हे प्राप्ती । ते सहजें पावोनि रमापती ।
तुझे पादारविंदाप्रती । न भजोनि गृहांधकूपीं ते पडले ॥ ८८ ॥

असोनि मनुष्यत्व काय तया । पशूच जाणावे देवराया ।
भारवाही विषय लोभियां । निर्गति घडे तेथोनि ॥ ८९ ॥

ममैष कालो जितनिष्फलो गतो । राज्यश्रियोन्नद्धमदस्य भूपतेः
मर्त्यात्मबुद्धेः सुतदारकोशभूष्वासज्जमानस्य दुरंतचिंतया ॥ ३ ॥

हे अजिता माझा काळ । आजिवरि सर्व गेला विफळ ।
राज्यश्रियें उन्मत्त केवळ । इच्छोनि सुतदारद्रव्यकोश ॥ ९० ॥

भूमिराज्य आसक्त बुद्धि । अमित चित्तीं वाहोनि आधी ।
सज्ज जाहलों प्रमादीं । अर्थकामुक अभिमानी ॥ ९१ ॥

कलेवरेऽस्मिन्घटकुड्यसंन्निभे । निरूढमानो नरदेव इत्यहं ।
वृतोरथेभाश्वपदात्यनीकपैर्गां पर्यटन् त्वामगणय्य दुर्मदः ॥ ४ ॥

हें कळेवर मृत्तिकामय । भित्ती सदृश रूपकार्य ।
येथें रूढला अभिमान कार्य । नरनाथ मी देव ह्मणोनि ॥ ९२ ॥

रथकुंजर अश्व पदाती । चतुरंग सेना सभोंवती ।
पृथ्वी भ्रमोनि मंडळवर्ती । राजे सर्वहीं जिंतिले ॥ ९३ ॥

तेणें वाढला दुर्मद । तूंतें विसरलों आतमद ।
न गणोनि तुजला स्वच्छंद । विषय विषें भूललों ॥ ९४ ॥

प्रमत्तमुच्चैरितिकृत्य चिंतया । प्रवृद्धलोभं विषयेषु लालसं ।
त्वमप्रमत्तः सहसाभिपद्यसे । क्षुल्लेलिहानोहिरिवाखुमंतकः ॥ ५ ॥

भान न धरोनि शरीरीं । इतिकर्तव्य चिंता अंतरीं ।
प्रवृद्ध लोभें निरंतरीं । विषयांधकारीं गुंतलों ॥ ९५ ॥

अत्यंत गोड विषयसुख । मानितों असतां महादुःख ।
अतावध असतां अंतक । तुझा प्रेरित पातला ॥ ९६ ॥

महाकाळ तो जिभा । चाटित पुढें झाला उभा ।
क्रूर भुजंग जैसा क्षोभा । पावोनि मूषका कंवटाळी ॥ ९७ ॥

पुरारथैहमपरिष्कृतैश्चरन् । मतंगजैर्वानरदेवसंज्ञितः ।
स एव कालेन दुरत्ययेन ते । कलेवरो विड्कृमि भस्म संज्ञितः ॥६॥

पूर्वी कनक मणि निर्मित रथीं । मातंग तुरगीं वेष्टित अती ।
पादाक्रांत शत्रू भूपती । करीत फिरे मी नरनाथ ॥ ९८ ॥

अस्मिन्न वसरीं तुझा प्रेरित । काळ येवोनि अकास्मित ।
तेणें योजिला अनर्थ । तो तुं परिसे भगवंता ॥ ९९ ॥

विष्टा कृमी भस्म भावत्रय । देहासि पावविलें निश्चयें ।
कोठं नेली साम्राज्यमय । नरदेव पदवी कळेना ॥ १०० ॥

निर्जित्य दिक्चक्रमभूत विग्रहो । वरासनस्थः समराजवंदितः ।
गृहेषु मैथुन्यसुखेषु योषितां । क्रीडामृगो पूरुष ईश नीयते ॥ ७ ॥

नूतन नूतन निर्मोनि कलह । अष्ट दिशेचे भूप समूह ।
जिणोनि सिंहासनीं निःसंदेह । समराज वंदना लाविले ॥ १०१ ॥

बाह्यप्रताप उत्कर्ष । मनी न माय महाहर्ष ।
गृहांतरीं मैथुन सुखाभिलाष । धरोनि प्रमदांस वश झालों ॥१०२॥

तेहीं नेत्रकटाक्ष पाशीं । बांधोनि मातें अनयासीं ।
मर्कटप्राय करोनि देहासि । नाचविती त्या विनोदें ॥ १०३ ॥

करोति कर्माणि तपःसुनिष्ठितो । निवृत्तभोगस्तदपेक्षया ददत् ।
पुनश्च भूयेहमहं स्वराडिति । प्रबुद्धते न स्वसुखाय कल्पते ॥ ८ ॥

निष्ठा धरोनि करी तप । पंचाग्नि दहा उपवास अमुप ।
कर्मे करी साक्षेपें । यज्ञ याग ते कष्टसाध्य ॥ १०४ ॥

भोग टाकोनि करी व्रत । परि अंतरीं महाभोग स्वार्थ ।
इंद्र होऊं इच्छित । स्वर्ग भोग सुख कामी ॥ १०५ ॥

अथवा सार्वभौम पृथ्वीवरी । वरावयाचा हेत धरी ।
प्रवृद्ध तृष्णा अंतरीं । तयासि सौख्यतें घडेना ॥ १०६ ॥

भवापवर्गो भ्रमतो यदा भवे-। ज्जनस्य तर्ह्यच्युत सत्समागमः।
सत्संगमो यर्हि तदैव सद्गतौ । परावरेशे त्वयि जायते मतिः ॥ ९ ॥

ऐसा भ्रमतां संसारगव्हरीं । अच्युता तुझी कृपा होय जरी ।
मोक्षसिद्धि तयासि वरी । त्वज्जन संगमा पावतां ॥ १०७ ॥

त्वज्जनसंगाची महिमा ऐशी । तात्काळ फिरवोनि दुर्बुद्धीसि ।
तुझिया चरणारविंदीं मतीसी । षट्पद करोनि जे बसवी ॥ १०८॥

मोक्षदाता तुं जगदीश्वर । त्याचा निवारिसी संसार ।
महादुःखाचा पार । निदर्शक तुं परमात्मा ॥ १०९ ॥

मन्ये ममानुग्रह ईशते कृतो राज्यानुबंधापगमो यदृच्छया ।
यः प्रार्थ्यते साधुभिरेकचर्यया वनं विविक्षुद्भिरखंडभूमिपैः ॥१० ॥

मीं मानितों ईशा मजवरी । अनुग्रह केला सर्वेपरीं ।
यदृच्छेचि झाला दुरी । राज्यानुबंध तो परमात्मा ॥ ११० ॥

साधु राजर्षी सत्वसंपन्न । सेऊं इछिती महावन ।
संपत्ती बंधापासून मोचन । तूज प्रार्थिती परेशा ॥ १११ ॥

तें मज घडलें अनायासें । तुझिया करुणा कटाक्ष लेशें ।
अखंड सुख तें सावकाशें । भोगुं सके मीं आतां ॥ ११२ ॥

न कामयेन्यं तव पादसेवनादकिंचन प्रार्थ्य तमाद्वरं विभो ।
आराध्यकस्त्वांह्यपवर्गदंहरे वृणीत आर्यो परमात्म बंधन ॥ ११ ॥

तुझिया पादसेवनावांचोनि । अन्य वासना न धरीं मनीं ।
उत्कृष्ट नसे यावांचोनि । आणीक दुसरें सुखनाम ॥ ११३ ॥

तुं निस्पृहाराध्य वरिष्ट । आराधोनि सकळेष्ट ।
पुन्हां इछील निकृष्ट । ऐसा अनार्य तो कोण ॥ ११४ ॥

जेथें पुन्हा पुन्हा बंधन । जेथें पुनःपुन्हा पतन ।
तूज भजो न इछील कोण । साधू संपन्न शुद्धसत्व ॥ ११५ ॥

तस्माद्विसृज्याशिष ईशमक्षरं । रजस्तमः सत्वगुणानुबंधनाः ।
निरंजनं निर्गुण मद्वयं परं । त्वां ज्ञप्तिमात्रं पुरुषं व्रजाम्यहे ॥ १२ ॥

आतां सकळ टाकोनि आशा । त्रिगुण बंध विनाशा ।
तूज आधाधितों जगदीशा । मोहपाशा संहारी ॥ ११६ ॥

तुं निरंजन निर्गुण अद्वय । चिन्मात्र पुरुष ज्योतिर्मय ।
तुंचि परात्पर निश्चय । अनंतपार परपार ॥ ११७ ॥

तव पदाची प्राप्ति इच्छोनि । आजि निघालों भर्वसेनी ।
जेथें पावलिया प्राणी । पुनरागमनीं घडतीना ॥ ११८ ॥

चिरमिह वृजिनार्यस्तप्यमानो नुतापै रवितृषषडमित्रो
लब्धशांतिं कथंचित् ।
शरणदसमुपेतस्त्वत्पदाब्जं परात्मन्न भयमृतमशोकं
पाहिमपन्नमीश ॥ १३ ॥

मीं चिरकाळ दुःखसागरीं । त्रिविधतापवडवाग्निदाहाभीतरी ।
पडोनि अखंड नरहरी । व्यथा अत्यंत पावलों ॥ ११९ ॥

षड्वैरी ते नक्रगण । अतिक्षुधित दारुण ।
पीडाकर ते कठिण । सांप्रत शांतीतें पावले ॥ १२० ॥

तुझिया पादांबुजा शरण । मीं पातलों परमदीन ।
तुं अशोक अमृत सत्यसंपन्न । पाहि पाहि मज जगदीश ॥ १२१ ॥
ऐसा मुचकुंदें स्तविला हरी । परम तोषोनि कृपा करी ।
म्हणे राया तरोनि संसारीं । माझिया पदा पावसी ॥ १२२ ॥

ऐसें कथोनि नारायण । तात्काळ घडला अंतर्धान ।
मुचकुंद नृपाळ प्रेमसंपन्न । जाता जाला तेथोनि ॥ १२३ ॥
नृपाळ बोलिला पुढारीं । विंध्याचळीं वस्ती करी ।
ध्यानद्रव्यें पूजी हरी । हृदयकल्हारीं चिंतोन ॥ १२४ ॥

परि ध्याननिष्ठा बहुत धरी । मानसीं न प्रकटे श्रीहरी ।
तदा पुन्हा क्लेशसागरीं । मज्जन पावे तो नृप ॥ १२५ ॥

ऐशिया समयीं अकस्मात । माझें दर्शन झालें प्राप्त ।
बहुतां दिवसां विंध्यपर्वत । पाहावया पातलों ॥ १२६ ॥

अकल्पित मुचकुंद । आश्रम देखीला विशुद्ध ।
जयासि प्रसन्न गोविंद । तयासि भेटणें मज इष्ट ॥ १२७ ॥

पाहतां मातें हर्षित । पूजोनि बैसवी यथास्थित ।
कथोनि सर्व वृत्तांत । ध्यान साधन पुसे मातें ॥ १२८ ॥

म्हणे देवर्षी तपोधन । मीं संकटसागरीं पावतां मज्जन ।
अकस्मात करुणाघन । तारक आलासि धावोनि ॥ १२९ ॥

म्हणोनि देवा गुणनिधाना । मूर्ति आकळे जैशी ध्याना ।
तैसा उपाय विज्ञानघना । कथन कीजे दयाळे ॥ १३० ॥

ऐकोनि नृपाचें भाषण । म्यांच उपाय कथिला पूर्ण ।
आधीं मूर्ति करोनि स्थापन । सन्मुख ध्यान धरी तूं ॥ १३१ ॥

तेणें तुज न घडतां श्रम । ध्यानसिद्धि घडेल परम ।
अभ्यासितां निःशीम । मूर्ति हृदयीं प्रकटेल ॥ १३२ ॥

पुन्हा पुसे भूपती । मज मूर्ति कैशी घडेल प्राप्ती ।
तेहीं वंदिजे कृपामूर्ति । दीनवत्सल तूं एक ॥ १३३ ॥

ऐकोनि तयाचें वचन । मूर्ति कथिली परम पावन ।
ब्रह्मा विधाता चतुरानन । सृष्टिकर्ता जो विश्वाद्य ॥ १३४ ॥

तयाचिये हृदयकमळीं । जे मूर्ति सदोदित सांवळीं ।
जे ध्यानद्रव्यें पूजिली । मानसपूजाउपचारें ॥ १३५ ॥

करोनि ब्रह्मयाचें आराधान । ते मूर्ति पावसी संपन्न ।
तेव्हां तुझें बैसेल ध्यान । अन्यसाधन असेना ॥ १३६ ॥

ऐसा करोनि तयास उपदेश । गमनपंथें नामघोष ।
करित चालिलों अत्यंत हर्ष । वडला साधूंचिया दर्शनें ॥ १३७ ॥

तदा मुचकंद राजर्षी । तपें ब्रह्मयासि उपासी ।
एक हर्ष निराहारेंशीं । वायुभोजनमात्रें तो ॥ १३८ ॥

होतां ब्रह्मा प्रसन्न । राया यावया वरदान ।
मजसहित विंध्याचला लागुन । येता झाला विधाता ॥ १३९ ॥

राजा करोनि दंडवत । प्रणाम भूमंडळीं पतित ।
पूजा करी यथास्थित । भक्तिरसें जो अतिआर्द्र ॥ १४० ॥

देखोनि तयाची शुद्धमती । अनुग्रह करी सत्यलोकपती ।
पाचारोनि विश्वकर्म्याप्रति । मूर्ति निश्चिती करविली ॥ १४१ ॥

अखंड हृदयीं जीचें स्थान । अखंड हृदयीं जीचें ध्यान ।
ते मूर्ति परम पावन । कृष्णरूपिणी सुंदर ॥ १४२ ॥

बाळभाव जीच्या शरीरीं । काळीयमर्दन कंडुक करीं ।
सर्वाभरण भूषित वरी । मूर्ति घडी विश्वकर्मा ॥ १४३ ॥

बाळभावाचा अर्थ । हाचि कीं परिणाम नसे जेथें ।
तारुण्यजरादि गणना तेथें । नसे सर्वथा हें दावी ॥ १४४ ॥

काळ तोचि काळीय सर्प । सर्व जगीं ज्याचा दर्प ।
स्वभक्तांचिये अनुकंपें । मर्दिला तो काळया ॥ १४५ ॥

स्वभक्ता बाध न घडो त्याचा । ह्मणोनि पादतळीं पीडिला साचा ।
यास्तव भजका काळाचा । बाध न घडे त्रिकाळीं ॥ १४६ ॥

हातीं विराजे कंडुक । याचा अर्थ अनेक ।
कंडुकप्राय ब्रह्मांडगोळक । होय तया करतळीं ॥ १४७ ॥

अथवा कंदुकक्रीडन । भक्तांशीं करी नारायण ।
भक्त तयांसीं अभिन्न । गडी पूर्ण तयाचे ॥ १४८ ॥

बाळभावीं नित्यानंदता । नित्यानंदीं क्रीडापूर्णता ।
हें जाणोनि विश्वकर्ता । मूर्ति करी निर्माण ॥ १४९ ॥

घडली अभिनवमूर्ति । त्रिभुवनीं ऐशी झाली ख्याति ।
पाहूं पातले दिक्पती । सिद्ध साध्य गंधर्व ॥ १५० ॥

चारण विद्याधर अप्सरागण । मनु मानव पितृगण ।
तेथें पावला पंचबाण । रतीसहित सानंदें ॥ १५२ ॥

पाहोनि मूर्तीचें दिव्यरूप । हरपला कंदर्पाचा दर्प ।
मोह पावला तद्रूप । ठसावलें त्याहृदयीं ॥ १५२ ॥

म्हणोनि मदनमोहन । देवीं केलें नामाभिधान ।
सुंदर रूप देखोन । सुंदर कृष्ण हे दुसरें ॥ १५३ ॥

काळीयदमन तृतीय । वासुदेव चतुर्थ नाम होय ।
मुचकुंद वारद पांचवें होय । नाम पावन देवाचें ॥ १५४ ॥

काळयवन निपात केला । म्हणोनि काळयवनांतक नाम पावला ।
गोपिकांसीं करी लीला । गोपीवल्लभ श्रीकृष्ण ॥ १५५ ॥

नंद गोपकुमार । हें अष्टम नाम निर्धार ।
विश्वकर्मनिर्मित सादर । नवम नाम ॥ १५६ ॥

पार्थसारथी दशम । उद्धववरदा एकादशम ।
भक्तेष्टदायक द्वादशम । नामसुंदर जयाचें ॥ १५७ ॥

जो अनंत नामीं आळाविला । तोचि द्वादश नामें पावला ।
पाहतां नांवांनिराळा । ठाव रूपाला कैंचा तेथें ॥ १५८ ॥

जेथें नामरूपा ठाव नाहीं । तेथेंचि सर्व दिसे पाहीं ।
सकळ निष्फळपणें दोहीं । वसणें जगत्कारणत्वें ॥ १५९ ॥

सारांश हाचि आत्मा हरी । सच्चिदानंद अनेक परीं ।
लीलाविलासी क्रीडा करी । मायाधारी प्रेमक ॥ १६० ॥

ऐशी मूर्ति जे घडली । तया नृपास दीधली ।
तेणें ते बहुतकाल अर्चिली । ध्यानसिद्धि घडली तयातें ॥ १६१ ॥

सगुण साधोनि निर्गुण । ध्यान पावला मांधान नंदन ।
कार्यसिद्धि घडली पूर्ण । झाला मुक्त संसारीं ॥ १६२ ॥

तो अपेक्षी परलोकगमन । म्हणे मूर्ति द्यावी कवण ।
हेंचि चिंती गुणनिधान । चल जाऊं ते स्थळीं ॥ १६३ ॥

तुजलागि ते दिव्यमूर्ति । जाण अर्पील भूपति ।
ऐसें कथोनि चिंदानंदाप्रति । नेलें विंध्यपर्वतीं नारदें ॥ १६४ ॥

जेथें राजर्षीचें स्थळ । तपोवन पवित्र केवळ ।
तेथें पातले योगशील । उभयतां हे योगिराज ॥ १६५ ॥

मुचकुंदें देखोनि नारद । विष्णुभक्तिविशारद ।
वंदिला पूजिला भावशुध्द । सच्चिदानंदसमवेत ॥ १६६ ॥

नारदमुखें सकळार्थ । कळतां तुष्टला नरनाथ ।
म्हणे पात्र झालें प्राप्त । दैवयोगें सुरमुनि ॥ १६७ ॥

मूर्ति बोलिली मुनीहातीं । योगाग्निदग्ध देह निगुती ।
जाळोनि केली विभूती । गेला ब्रह्मभुवनासि ॥ १६८ ॥

नारदगुरूसि करोनि वंदन । दिव्यदेही नृपनंदन ।
स्वर्गा गेला विमानें । बाळसूर्यासन्निभें ॥ १६९ ॥

नारदस्वामीही आपण । पाहूं इच्छोनि ब्रह्मभुवन ।
जात। सच्चिदानंदवंदन । करुनि पातले स्वस्थळीं ॥ १७० ॥

त्यानंतर ते परममूर्ति । पूजिति सच्चिदानंद अतिभक्ती ।
झाली सर्वलोकीं ख्याति । सर्व देखती अभिनव ॥ १७१ ॥

तयांच्या प्रसादें कलिजना । भक्ति लाधली सद्गुणा ।
तरले जे भजले अनन्या । भक्तियोगें पावनें ॥ १७२ ॥

तयांनीं शिष्य ब्रह्मानंद । परम सत्वगुण विशुद्ध ।
अनुग्रह करोनि योगसिद्ध । मूर्ति तया अर्पिली ॥ १७३ ॥

तेही बहुत काळवरी । मूर्ति पूजोनि द्वादशाक्षरी ।
विद्याजपें वैकुंठपुरी । प्राप्त केली निजभक्ती ॥ १७४ ॥

तयांपासोनि लक्ष्मीधर । पावले महाविद्या द्वादशाक्षर ।
येही बहुत शिष्य उदार । केला श्रीविद्याप्रदानें ॥ १७५ ॥

तयां शतांमाजि एकु । मीही उद्धरलों रंक ।
श्रीविद्या प्राप्त झाली सम्यक । द्वादशाक्षर समवेत ॥ १७६ ॥

ब्रह्मानंद पुत्र साक्षात । शिवानंद ते परम भक्त ।
ते स्वमठीं असतां पूजित । बैलूर ग्रामीं यथोचित ॥ १७७ ॥

तेही शिष्य न करितां । सांप्रदाय विस्तार न पावतां ।
देहावसान प्राप्त होतां । जाते झाले शिवपुरा ॥ १७८ ॥

संपूर्ण लक्ष्मीधरावतार । घडतां त्यांगिलें पार्थिव शरीर ।
परंतु मूर्ति सुस्थिर । मठीं असतां बेलूरीं ॥ १७९ ॥

मात्र राहिला प्रमदाजन । पूजाधिकार अन्यासि नसोन ।
घडलें कपाट दृढबंधन । नुघडे कवणा बळवंतां ॥ १८० ॥

बहुत करिती यत्न । परि न घडे कपाट उद्धाटण ।
जाइलें निशिकाळीं स्वप्न । तत्रत्य जनालागुनि ॥ १८१ ॥

येतां पूजाधिकारी । कपाट उघडेल निर्धारीं ।
आतां पूजन करा द्वारीं । भक्तिमंतीं साक्षेपें ॥ १८२ ॥

तदा सर्वही लोक । द्वारपूजा करिती सम्यक ।
ऐशीं वर्षें कितेक । क्रमलीं तेथें ॥ १८३ ॥

सती अत्यंत माझिया मना । उच्चाट वाटे जाइजे श्रीपाददर्शना ।
दाक्षिणयात्रा भ्रमणा । जाऊं गोकर्णा सुतीर्था ॥ १८४ ॥

पाहूं वेलूर मूळस्थान । जेथें विराजे सुंदर कृष्ण ।
सर्वजनमनमोहन । मदनमोहन जो होय ॥ १८५ ॥

परंतु बाजी भूपाळनंदन । नानाप्रभू अति प्रवीण ।
तत्सेवनीं रात्रिदिन । अवकाश न घडे सुटाया ॥ १८६ ॥

सर्व संस्थानीं मजप्रति । पाठवितां राजकार्यार्थीं ।
दाक्षिणात्य सर्व नृपति । करिती प्रीति गुणाग्राही ॥ १८७ ॥

बहुत कार्यभागभार । सुटावया नसे अवसर ।
चित्तीं ध्यास लागला फार । तीर्थयात्रा घडावी ॥ १८८ ॥

अस्मिन्नवसरीं पिशुनजनीं । असत्य भाषणें कथोनि ।
अप्रीति उत्पन्न केली मनीं । बाळाजी पंडित प्रधानवर्या ॥ १८९ ॥

हेही देवमाया घडली । संदेह नसतां चित्तवृत्ति फिरली ।
पर्ववत न देखतां ममता झाली । बुद्धि उद्विग्न माझीही ॥ १९० ॥

इंगितें भाव कळतां जाण । तेंच निमित्त करोनि पूर्ण ।
केलें दाक्षिणदेशाटण । तीर्थाटण मुख्यत्वें ॥ १९१ ॥

काशीप्रयागादि त्रिस्थळीं । यात्रा पूर्वींच होती केली ।
दक्षिणयात्रा करणें राहिली । मानसीं होती उत्कंठा ॥ १९२ ॥

श्रीशैल वेंकटेश रामेश्वर । मध्यें तीर्थें अनेक तर ।
कांची काळहस्ती चिदंबर । अरुणाचल वृद्धाचलादि ॥ १९३ ॥

श्रीस्वेत वराह उत्तम । सिंह्याळी वैद्यनाथ परम ।
गौरी मायूर निःसीम । मध्यार्जुन कुंभकोण ॥ १९४ ॥

शार्ङ्गपाणी चक्रपाणी । नागेश कुंभेश आदिकरूनि ।
चोलमंडळीं नाना स्थानीं । पंचनदादि चंदाउरीं ॥ १९५ ॥

मनार कृष्ण दक्षिणद्वारका । राजगोपाळ मोक्षदायका ।
सेतुबंधांत अनेक । कमलालयादि सत्क्षेत्रीं ॥ १९६ ॥

सर्व देवतादर्शनें । महानदीतीर्थस्नानें ।
महाक्षेत्रसेवनें । पाप हरलें जन्माचें ॥ १९७ ॥

श्रीरंगशायी भगवान । जंबुकेश्वर आपलिंगस्थान ।
कपिलासंगम गरळपुरीदर्शन । श्रीरंगपट्टणीं श्रीरंग ॥ १९८ ॥

मेलकोट बेलूरचेनकेशव । मार्कंडेय महाशिव ।
नानास्थळीं नानावैभव । हरिहरमूर्तिदर्शन ॥ १९९ ॥

श्रृंगेरी शंकर शारदांबा । सुब्रह्मण्य अन्नदानशोभा ।
उडपी कृष्ण तो उभा । वैष्णवा मोक्षदायक ॥ २०० ॥

कलूर मूकांबादिशक्ती । त्याहि नमिल्या अत्यंत भक्ती ।
पूजन करोनि यथाशक्ती । गोकर्ण प्रांत पावलों ॥ २०१ ॥

जेथें आदिगुरुस्थान । वैलूरग्राम परम पावन ।
देखतां झालें समाधान । सिद्धस्थान तें रमणीय ॥ २०२ ॥

जेथें श्रीचक्रप्रतिष्ठापन । सच्चिदानंदकृततैदेदीप्यमान ।
तेथील महिमा गहन । वर्णितां मौन वाचेसि पडे ॥ २०३ ॥

केरळ देशिचे मंत्रज्ञ । जे सामर्थ्यवंत महाप्राज्ञ ।
ते असतांही अभिज्ञ । मुद्राधारी या मतिचे ॥ २०४ ॥

संशयाचा परिहार । येथें घडे निश्चयतर ।
ह्मणोनि येती महाचतुर । पुसावया संकटीं ॥ २०५ ॥

ऐसें प्रसिध्द गुरुपीठ । तें पाहिलें परम इष्ट ।
श्रीचक्रदर्शन करोनि श्रीकृष्ण । देवालया नमस्कारितां ॥ २०६ ॥

अमाप कपाटबंधन । मुक्त होतां झालें दर्शन ।
तत्रत्य जना निदर्शन । घडतां आल्हाद सर्वांसि ॥ २०७ ॥

बहुनकाळ पूजा विवर्जित । असतां ह्मणती तेथील समस्त ।
पूजा तुह्मीं श्रीकृष्णनाथ । यथान्यायें उपचारें ॥ २०८ ॥

अवश्य म्हणोनि शतदिन । तेथें राहिलों लाभ मानोन ।
त्यांची कृपा संपादीन । आनंद पूर्ण मानसीं ॥ २०९ ॥

स्वप्न झालें तेथिल्यांसी । हे मूर्ति अर्पिजे निरंजनासी ।
हे नेवोनि महाराष्ट्रदेशीं । प्रसिद्ध करितील मद्भक्ति ॥ २१० ॥

अवश्य म्हणोनि तत्रत्य जनी । आमुची वृत्ति ही पाहोनी ।
श्रीकृष्ण वरद जाणोनी । श्रीकृष्ण मूर्ति अर्पिली ॥ २११ ॥

सांप्रदाय संकेत । सर्वांसि कळला वृत्तांत ।
लक्ष्मीधरानुग्रहीत । पूर्वपुण्यें असतां कीं ॥ २१२ ॥

शतवार वसतां ते स्थानीं । सर्वांसि अत्यंत प्रीति मनीं ।
उत्पन्न झाली देखोनि । लीनता माझी दीनाची ॥ २१३ ॥

वेदांतग्रंथश्रवणें । अर्थ ऐकतां अति गहन ।
मानिती परम साधन । धन्य ह्मणोनि पूजिती ॥ २१४ ॥

तयांसि होतां निदर्शन । प्रतिमालाभ परम पावन ।
होतां निघालों तेथुन । गोकर्ण स्थान पावलों ॥ २१५ ॥

श्रीमत्पश्चिमरत्नाकर–तीरीं महाबळेश्वर ।
कोटितीर्थ सरोवर । ताम्रगौरी महानदी ॥ २१६ ॥

गोकर्णप्रमाण शिवलिंग । जेथील महिमा अभंग ।
अष्टादशपुराणें सांग । वर्णिती सर्वही आगमें ॥ २१७ ॥

त्रिलोकप्रसिद्ध गोकर्ण । सिद्धिस्थळ परम पावन ।
त्रैलोक्य राज्य संपत्ति रावण । पावला गणत्व तदर्चनें ॥ २१८ ॥

तेथील तीर्थविधि संपादोन । महाबळेश्वर पूजन ।
यथा सामर्थ्यैंकरून । चालतां तेथुन स्वदेशा ॥ २१९ ॥

अकस्मात एका ब्राह्मणें । तेणें अर्पिला लक्ष्मीनारायण ।
तोही महालाभ गहना । महास्थळीं अकल्पित ॥ २२० ॥

ऐशी होतां देवता प्राप्ति । संतोषा कोण मापील किती ।
तेथोनि देशीं आलों निश्चिती । कोल्हापुरासि श्रीक्षेत्रीं ॥ २२१ ॥

करोनि महालक्ष्मी दर्शन । करवीर क्षेत्र पावन ।
पुन्हा पुण्यनगर निवासस्थान । जेथें सुजन आपुले ॥ २२२ ॥

करोनि महा समाराधन । केलें यात्रांग विसर्जन ।
मंदिरीं स्थापोनि श्रीकृष्ण । यथाशक्ति पूजितां ॥ २२३ ॥

बाळाजी पंडित प्रभुवर । मुख्य प्रधान परिराजेश्वर ।
कृपा करोनि महत्तर । स्वाधिकार यथापूर्वक ॥ २२४ ॥

शिबिकादि सकळ संपदा । देवोनि अर्पिलें महत्पदा ।
श्रीरंगपट्टणीं नियोग धंदा । कथिला जेणें ॥ २२५ ॥

महाकार्यभाग घटणा । प्रारब्धप्रवाहें घडली पूर्णा ।
परिमुख्य विश्रांति या मना । अध्यात्म चिंतन हरिभक्ति ॥ २२६ ॥

नित्य ब्राह्मण सहवास । अखंड असतां अभ्यास ।
कविता प्रेरणा मनास । घडविलास शारदेचा ॥ २२७ ॥

आधीं कृष्णानंद सिंधु । रचावया हा प्रबंधु ।
उल्हास घडला सच्चि–। स्वप्न श्लोक स्फुरण होतां ॥ २२८ ॥

पुण्यग्रामीं ग्रंथोत्पत्ति । श्रीरंगपट्टणीं समाप्ति ।
कृष्णानंद सिंधु श्रेष्ठ अति । आनंद दाता सर्वजना ॥ २२९ ॥

समाप्त पावतां हा ग्रंथ । चिद्बोध रामायण उद्बोध घडत ।
निरंतर अंतर स्थित । प्रेरणा करी या मना ॥ २३० ॥

अध्यात्म रामायण टीका । चिद्बोध रामायण ग्रंथ निका ।
जो आवडतां रघुनायका । प्रेरिला तेणें या वाचे ॥ २३१ ॥

जडवाणी मतिहीन । नसतां कदापि काव्यस्फुरण ।
महाग्रंथ रामायण । अनायासें विरचिला ॥ २३२ ॥

श्रीरंगपट्टणीं आरंभ ग्रंथ । पुण्य नगरीं समाप्त ।
मान्य बहुतां पंडितांत । होतां तोही पाहिला ॥ २३३ ॥

सुंदर कांड पावतां सिद्धी । रामवरद होउनि सन्निधीं ।
आपणा पंडित विद्यानिधी । रूपें होवोनि प्रत्यक्ष ॥ २३४ ॥

राममंत्र षडाक्षर । तो उपदेशिला महत्तर ।
रामरहस्य समग्र । प्रकट दाविलें महंतें ॥ २३५ ॥

वर्षद्वय समागम चांग । घडोनि आला प्रारब्धयोगें ।
निरंजन रामायण सांगा । तत्संनिधानी विरचिलें ॥ २३६ ॥

लक्ष्मीधर बाप देव दोन्ही । या रूपें अवतार पावोनि ।
उद्धरावया कृपा करोनि । कळवावया रामतत्त्व ॥ २३७ ॥

आत्माराम संदर्शन । मुद्रा अगोचरी पावन ।
आत्माराम मंत्र गहन । षडक्षर तारक ॥ २३८ ॥

जो शिव काशीपुरीं । उपदेश करोनि जन उद्धरी ।
तो मंत्र आह्मासि असतां घरीं । ब्रह्मरूपें अर्पिला ॥ २३९ ॥

शांतदांत पावन गुण । सर्वज्ञ सर्वकळानिपुण ।
रामचि होवोनि आपणा अभिदान । वेदशास्त्रसंपन्न वेदिक ॥ २४० ॥

रामतत्त्व विचक्षण । अमाय व्यवहार संपूर्ण ।
सर्व जगन्मित्रता पूर्ण । सर्व संपन्न गुणरासी ॥ २४१ ॥

चिद्बोध रामायण । तत्संमतें झालें पूर्ण ।
हें सर्व माहिमान गहन । श्रीकृष्ण प्रेरण घटण करितां ॥ २४२ ॥

तेणें मज दीनासाठीं । केवढी केली अटाटी ।
माझी करुणा तयासि मोठी । वाटली दीन उद्धारावा ॥ २४३ ॥

ह्मणोनि अनेकं गुरुरूपें । ब्रह्मतत्व केलें सोपं ।
सर्व जग आत्माराम रूपें । प्रत्यक्ष देखें अभिज ॥ २४४ ॥

नाना देश संचार करितां । नानास्थळीं फिरतां ।
नानापरिचे सत्पुरुष संता । पाहोनि झालों कृतार्थ ॥ २४५ ॥

भिन्न भिन्न ज्ञान कळाकुसरी । अभिनव बोध चमत्कारी ।
डोलती आनंद निर्भरीं । परिपूर्ण अंतरीं अनुभवें ॥ २४६ ॥

कोणी राजयोगी हठयोगी । कोणी मंत्रयोगी लययोगी ।
कोणी देखिले शिवयोगी । धुरंधर जे शिवमया ॥ २४७ ॥

निस्पृह कोणी निराभिमानी । कोणी ब्रह्मविद्ये साभिमानी ।
कोणी प्रपंचीं असोनि । पद्मपत्र समान ॥ २४८ ॥

कोणी लक्ष साधनी दक्ष । कोणी विहंगम मार्ग ।
कोणी लंबिकायोगी दक्ष । प्राशन करिती सुधेचें ॥ २४९ ॥

मंत्र तंत्र साधनीं । ते तो अनंतानंत देखिले नयनीं ।
तयांतें दुरोनि वंदोनि । सेविले पूर्वील सत्पुरुष ॥ २५० ॥

याचीं एक एक कळा । विशेषात्कारें पडली डोळां ।
त्यांची कृपा संपादोनि निर्मळा । संग्रह केला त्या विद्येचा ॥२५१॥

जे विद्याब्रह्म विद्येसि अनुकूळ । जीच्या साधनीं अनंत फळ ।
दावी प्रत्यक्ष आनंदकल्लोळ । परम सोज्वळ सांप्रदायीं ॥ २५२ ॥

तेचि कळा कळा ह्मणिजे । साजणी इतर नाताळिजे ।
जीणें पूर्णता न भाजिज तरि ते कळाही अवकळा ॥ २५३ ॥

सकळ कळापूर्ण लक्ष्मीधर । महामौळीचे चरणकल्हार ।
त्याचें करितां स्मरण मात्र । परमानंद मज वाढे ॥ २५४ ॥

ह्मणोनि अहर्निशीं जाण । करोनि तत्पादुकाचिंतन ।
अखंडानंद परिपूर्ण । असों उन्मन सदोदित ॥ २५५ ॥

लोक व व्यवहार । बाह्य दावोनि निरंतर ।
अंतरीं निस्पृह जमदाकार । ब्रह्म देखोनि सुख पूर्ण ॥ २५६ ॥

जेणें स्थिती नये शोच्यता । जेणें स्थिती नये उद्विग्नता ।
जेणें स्थिती राहतां । कामक्रोध चित्तां न स्पर्शती ॥ २५७ ॥

जेणें चिंताभिमान । नोहे मोह ममता दारुण ।
आभिलाष वैर मित्रतादि दुर्गुण । जेथें दिसों न सकती ॥ २५८ ॥

ऐशिया स्थितीनें वर्ततां । पाविजे संसारसिंधु पारता ।
याहोनि उपाय कोणता । भवीं तारिता नेणवे ॥ २५९ ॥

त्वां जें पुसिलें रमणी । आह्मी तें घातलें श्रवणीं ।
पुढती आवड असे मनीं । तें तूं पुस प्रियतमे ॥ २६० ॥

ऐसें निरंजन निजसतीतें । कथन करी प्रेमें बहुतें ।
दास विनवी सज्जनातें । पुढें कथा परिसावी ॥ २६१ ॥

---

## उद्गार चवथा.

दास म्हणे संतीं । ऐकावी कथा पावन अति ।
पुसे भावें गंगावती । निरंजना सांप्रदाय ॥ १ ॥

जी निजवल्लभा प्राणेश्वरा । भुक्तिमुक्तीच्या दातारा ।
माझा संदेह परिहारा । विनती गुरुवरा परिसावी ॥ २ ॥

हे दत्तात्रय सांप्रदाय वल्ली । अविच्छिन्न प्रकोटोनि वाढली ।
भूमंडळीं विस्तारली । साधुजन मंटपावलंबें ॥ ३ ॥

जीचें फळ अमृतसार । सेवितां घेड अजरामर ।
ऐसें असतां सिद्धेश्वर । सांप्रदाय स्वीकार किमर्थ ॥ ४ ॥

काय येथें नोहती पूर्णता । कीं अन्योपदेश घेयिजे नाथा ।
मंत्रविद्या महादेवता । वासुदेव दाता मोक्षाचा ॥ ५ ॥

ऐसें असतां आपण । सिद्धेश्वर सांप्रदायी म्हणोन ।
लोकीं रुढवावया काय कारण । हेंही विंदाण वदावें ॥ ६ ॥

न पुसतां समाधान । नोहे न तुटे संशयबंधन ।
यास्तव कृपा उत्तरदानें । अमृतप्राशनें निववावें ॥ ७ ॥

निजसुंदरीची प्रेमझरी । तथापि विज्ञापना कुसरी ।
श्रवण करोनि हर्षितां तरी । प्रत्युतरीं प्रमोदविती ॥ ८ ॥

अवो सुंदरी सरोजवदनी । सरस शुक कलभाषणी ।
मनोहरे मनोहर प्रश्नी । आनंद मातें वाढविला ॥ ९ ॥

ज्ञानसुधेच्या अंतीं । आह्मींच कथिली सांप्रदाय पद्धति ।
तेथें संक्षेपें कथा निगुती । कथन केली त्रितापि ॥ १० ॥

तुवां पुसिली म्हणोन । मज पडलें विस्तारें सांगणें ।
येथें विशेषें सद्गुरुस्मरण । तुझ्या प्रश्नें घडतसे ॥ ११ ॥

अहो आह्मीं असतां सप्तऋषीसि । महाविद्या बाविसां वर्षीं ।
प्राप्त झाली अनायासीं । सद्गुरुकृपाकटाक्षें ॥ १२ ॥

जैसा सागराचा लोट । एक सर लोटला उत्कट ।
तेंवि महाविद्येसकट । वासुदेव मंत्र महावाक्य ॥ १३ ॥

ऐसा उपदेश झाला । उपासनार्थ सिद्धी पावला ।
महावाक्य विचार केला । पाहिजे आतां गुरुमुखें ॥ १४ ॥

अस्मिन्नवसरीं बाजीराव प्रधानें । सेवा सांगोनि परम मानें ।
शिबिकादि संपत्ति प्रदानें । चंदावर संस्थाना पाठविलें ॥ १५ ॥

तेथील कार्यभाग भार । पडला कांहीं संवत्सर ।
येतां जातां सद्गुरुवर । भेटतांहीं तांतडी ॥ १६ ॥

राजकार्य भार भारी । राजगौरवाचे आभारीं ।
अवकाश नसतां पळभरी । विचार तत्त्वाचा कैं घडे ॥ १७ ॥

श्रीविद्येचें महिमान । षण्मासांतींच संपत्तिदर्शन ।
अमृतहस्ताचें माहिमान । लोकीं प्रकट व्हावया ॥ १८ ॥

असतांही स्वामिसेवा भार । जपादि करणी अंतर ।
न पडे कां कीं निरंतर । प्रमाधिक्यें विश्वासें ॥ १९ ॥

ऐशीं लोटतां वासरें तीन । मंत्र विद्येचें महिमान ।
नाना सिद्धिदायकें स्वप्न । योग घटणहीं तदनुसार ॥ २० ॥

साधु पुरुषांचीं संदर्शनें । त्यांचीं रहस्य भाषणें ।
गुह्यालार्ले उत्तेजन । पुनः पुन्हा मनासि ॥ २१ ॥

दृढता घडे संतोषवृद्धि । प्रेम वाढे भगवत्पदीं ।
हेचि मंत्रवियेची सिद्धी । प्रसिद्धी लोकीं साधुवाद ॥ २२ ॥

सर्वत्र स्थळीं मान्यता । सभास्थानीं निर्भयता ।
तात्काळ स्फूर्ति सुभाष्यता । चमत्कारता नृपादिकां ॥ २३ ॥

प्रतिवादि मुखस्तंभन । सर्वमान्य होय भाषण ।
एवमादि अर्थ घडोन । सहजीं सहज तो येतां ॥ २४ ॥

तत्रापि कर्नाटक देशांतरीं । काव्य नाटक कळाकुसरी ।
नानाविनोद राजसभांतरीं । चातुर्य वृद्धीस कारण ॥ २५ ॥

सर्व भाषा परिज्ञान । घडों आलें देशाटणें ।
महाविद्येचें महिमान । कोठेंचि न्यून दिसेना ॥ २६ ॥

देशाटणं पंडितमित्रताच । वारांगना राजसभाप्रवेशः ।
अनेकशास्त्रार्थविलोकनं । चातुर्यमुलानि भवंति पंच ॥ १ ॥

ऐसा श्लोकार्थ प्रसिद्ध । येणें चातुर्य घडे सिद्ध ।
वेश्य नट नकलोकाविद । राजसभास्थानीं चातुर्यवृद्धि ॥ २७ ॥

भरतशास्त्र नटतकळा । ताळस्वर भेद सकळा ।
व्युत्पत्ती घडती रसिकत्व लीला । घडण घडे तात्काळ ॥ २८ ॥

असो सर्व चातुर्य मूळ । एक पंडित संगति केवळ ।
तेथें या पंचवाक्याचें फळ । घडण घडे अनायासें ॥ २९ ॥

ऐसी पंडित संगती । घडे लौकिक व्यवहारापुरती ।
वैद्यकही महानुभाव भेटती । वेदांत शास्त्रधुरीण ॥ ३० ॥

परंतु सद्गुरुवांचोन । महावाक्यार्थ शोधन ।
करावया न प्रवर्ते मन । कां जे दृढचरण विश्वासें ॥ ३१ ॥

ऐसें अनेक कार्यमार्गीं । गुंतोनि भ्रमतां देशांतरीं ।
सेवाबद्ध असतां अस्मिन्नवसरीं । दैवयोगें हें घडलें ॥ ३२ ॥

मृत्युलोकाचें पुरलें मान । स्वर्गींच आलें आकारण ।
प्रारब्धभोग होतां पूर्ण । देहावसान गुरुवर्या ॥ ३३ ॥

एकदां त्यागोनि देह । अपुनरावृत्ति निःसंदेह ।
अजरामत्व विदेह । कैवल्य लाभ परम पदीं ॥ ३४ ॥

निजात्मानुभव संधान । ब्रह्मोपासना सामरस्य भावनें ।
जीवात्म परमात्मैक्य चिंतन । परमार्थ दर्शनें परयोगें ॥ ३५ ॥

परात्परानंद सागर । तेथेंचि प्रवेश येकाकार ।
घटमठाकाशां संचार । महदाकाशीं तद्वत ॥ ३६ ॥

हें ऐकिलें स्वपुरा येतां । पुण्य नगरीं आवसतां ।
घडली सप्तऋषी सोडिवतां । बाजीरायें आदरें ॥ ३७ ॥

न घडतां मनासि पूर्णार्थ । नावलोकितां चरणकमळातें ।
प्रारब्धहीन मी भ्रांत । उदरकार्यार्थ परिभ्रमी ॥ ३८ ॥

बाळक असतां स्तनंधय । मातृवियोगें जैसा होय ।
तैसा हाही पर्याय । घडों आणिला श्रीकांतें ॥ ३९ ॥

माझा मनोरथ न जातां सिद्धी । न पुरतां असोसी निरवधि ।
वियोग घटणा करी विधी । ह्मणोनि बुद्धि स्तब्ध झाली ॥ ४० ॥

दुःखें अशन प्राशन । वर्जलें शरीर सौख्यकारण ।
वृत्तीस न घडतां समाधान । नेत्रीं जीवन आछिन्न ॥ ४१ ॥

माझी ऊर्जित कल्पलता । ते काळकुंजरें भक्षितां ।
अभिमत फळाची आस्था । वृथा केली ते दैवें ॥ ४२ ॥

शरीरीं स्तब्धता मुखीं मंद । अक्षरें निघतां सखेद ।
सुजन संबोखितां विशद । वाढे अनुताप ज्वालावळी ॥ ४३ ॥

स्नेह सिंपिजे अग्नीवरि । तद्वत घडे स्नेहित उत्तरीं ।
विरहाग्नि ज्वाला अधिकोत्तरीं । दाहक चित्त इंधना ॥ ४४ ॥

ऐसा सप्तरात्र प्रसंग होतां । निद्रा लागली अवचिता ।
ब्राह्मीं मुहूर्तीं सत्ता । सद्गुरूची अभिनव ॥ ४५ ॥

ब्राह्मणरूपें दर्शन । देवोनि ह्मणती दुःखकारण ।
नसतां किमर्थे शोक करणें । दर्शनादर्शन साहजिक ॥ ४६ ॥

सप्तम दिवसीं आमुची विभूती । भेटतां होईल मनोरथप्राप्ति ।
विश्वास धरोनि चित्तीं । समाधानें वर्तिजे ॥ ४७ ॥

गुरुस्वरूप सर्वात्मक । येथें न धरी भेद कळंक ।
इतुकें बोलोनि तात्कालिक । अंतर्धान पावले ॥ ४८ ॥

जागृति पावतां स्फुरण । वाटलें प्रत्यक्ष तैसें स्वप्न ।
चमत्कारें वेधलें मन । परि अर्थ गहन ना कळे ॥ ४९ ॥

स्वप्नवाक्याचा विश्वास । न मानिती प्राज्ञपुरुष ।
मी ही तैसाच उदास । असतां कैसें वर्तलें ॥ ५० ॥

बापजी पंडित महाकुशल । नियोगकर्मी अत्यंत प्रबळ ।
घटण करूं जाणती केवळ । सार्वभौमाचें परस्परें ॥ ५१ ॥

व्यापारवृत्तिमाजि कोणी । यांसम नसे पुरुषमणी ।
दक्षत्व जया अघट घटणी । स्नेहित बाजीरायाचे ॥ ५२ ॥

आमुच्या बंधूचा स्नेह बहुत । आलियां वसणें आमुच्या सदनांत ।
पूर्वापर स्नेह अपरमित । परंतु हृद्गत न कळेचि ॥ ५३ ॥

महाकार्यार्थ आगमन । होतां झालें आमुचें घटण ।
उभयतां चालिलों मिळोन । बाजीरायें कार्यार्थ पाठवितां ॥ ५४ ॥

पाहतां नित्य राहटी । परस्परें पडली मिठी ।
ज्ञानकळेची अभिनव गोष्टी । अखंड समाधि जडलीसे ॥ ५५ ॥

करितां सर्व व्यवहार । समाधि जयाची सुस्थिर ।
तुर्येमाजि मानस स्थिर । अमनस्कपणें अखंड ॥ ५६ ॥

जितेंद्रियता शुकवत । कपिला समान योगवंत ।
करतळामळकवत । सांख्य सिद्धांत जयातें ॥ ५७ ॥

शांतीची घडली मूर्ति । सहज निर्विकल्प स्थिति ।
बोधन सामर्थ्ये बृहस्पती । तात्काळ शिष्यांसि प्रबोध ॥ ५८ ॥

बाळबोध महाग्रंथ । अखंड समागमीं वर्तत ।
नित्य शिष्यांस पढवित । अध्यात्म विद्या अतिगहन ॥ ५९ ॥

ते साधन चतुष्टयसंपन्न । मुमुक्षु अति प्रवीण ।
त्यासींच अध्यात्मश्रवण । येरां आणखी साधनें ॥ ६० ॥

हरिभजनादि बहुत रीती । योग्यता जैशी जयांप्रति ।
तैसींच उपदेश पद्धती । मुख्य तेचि महाविद्या ॥ ६१ ॥

वांचोनि अधिकारियांसि पठण । श्रवण मनन कोठुन ।
तयाचें रिकामें भाषण । तेंही दुर्लभ श्रवणासि ॥ ६२ ॥

सकळ सद्गुण संपत्ति । येथें विश्रामली निश्चिती ॥
ऐशीयांची सहज स्थिति । समाधि निश्चिती ते होय ॥ ६३ ॥

असो मजला स्वप्नस्मरण । झालें तयाचें निदर्शन ।
म्यांही मिठी घातली चरण । कमळयुगुळीं मधुपवत ॥ ६४ ॥

बाळबोध कपिल गीता । प्रणवार्थ बोधिला यथार्थता ।
पंचीकरण महावाक्य सर्वथा । बोधिला समर्पक व्यक्तार्थें ॥ ६५ ॥

षण्मुखी खेचरी मुद्रा दोनी । दावोनि लक्ष नादानुसंधानीं ।
मुक्त केलें अर्ध क्षणीं । कोटिजन्मीं जें साधिजे ॥ ६६ ॥

तें एका पळांतरीं । देवोनि कृतार्थ केलें परीं ।
तारक होवोनि संसारीं । तारिलें कृपाकटाक्षें ॥ ६७ ॥

मस्तकीं ठेवोनि हस्त । कल्पतरू शाखावत ।
कुबेर करीन यथार्थ । ज्ञाननिधी देऊनि ॥ ६८ ॥

ऐसें अभय प्रदान । तेंच महावरदान ।
अभय दानाहोनि दान । कोणतें श्रेष्ठ त्रिभुवनीं ॥ ६९ ॥

अभय तो मोक्ष । तेंचि दान दीधलें प्रत्यक्ष ।
दाता सद्गुरुयेवढा दक्ष । कोण असे संसारीं ॥ ७० ॥

येका जन्माचें मरण भय । एकवार सोडविता जो होय ।
तो पित्यासमान निश्चय । स्मृतिप्रमाण यदर्थीं ॥ ७१ ॥

जनिता चोपनीता च यस्तु विद्यां प्रयच्छति ।
अन्नदाता भयत्राता पंचैते पितरः स्मृताः ॥ १ ॥

ऐसें धर्मशास्त्र वचन । हें वाचा पितरसमान ।
यामाजिही श्रेष्ठ जाण । जीवदान दाता तो ॥ ७२ ॥

अनंत जन्माचें मरण भय । जेणें सोडविलें निश्चय ।
तयाचें नांव पूर्ण अभय । दाता गुरुराय उदार एक ॥ ७३ ॥

जो अव्याज करुणाघन । जो दीनोद्धारक भगवान ।
त्याचें करावया वर्णन । माझी वैखरी अपुरी ते ॥ ७४ ॥

माय बाप बंधु सुहृद् । जे जे परोपकारी दाते सिद्ध ।
ते सद्गुरु उपमेस आणितां प्रसिद्ध । गुंज सुवर्ण सम पाडें ॥ ७५ ॥

असो माझी किती भक्ति । माझी सेवा घडे किती ।
सदोदार सद्गुरुमूर्ति । कृपा पूर्ती केली मजवरि ॥ ७६ ॥

सर्व ब्रह्मबोध सम्यक । दावोनि माझें केलें सार्थक ।
त्या बोधें मी अखंड देखें । जन वन एक ब्रह्मरूप ॥ ७७ ॥

भूतानि विष्णुर्भुवनानि विष्णुर्यदस्तिनास्तीति तदेव विष्णुरिति ।
खं वायुमग्निं सलिलं महीं च ज्योतींषि सत्वानि दिशो द्रुमादीन् ॥
सरित्समुद्रांश्च हरेः शरीरं यत्किंचभूतं प्रणमेदनन्यः ॥
यच्च किंचिज्जगत्सर्वं दृश्यतेऽदृश्यतेऽपि वा ।
तद्ब्रह्माहमिति ज्ञात्वा सर्वबंधात्प्रमुच्यते ॥ इति श्रुतेः ॥

ऐशीं प्रमाणें अनंतें । विश्व बोधी निश्चितें ।
बोद्धव्य नसे यापरतें । तें मज नाथें दाविलें ॥ ७८ ॥

जेथें अनंत श्रुतिस्मृति । विश्वब्रह्मीं स्थिरावती ॥
तेथें माझी दृढ मती । केली निश्चिती गुरुराजें ॥ ७९ ॥

विश्वब्रह्मापरतें कांहीं । बोधावकाश दुसरा नाहीं ॥
जैसा कळसावरुता नाहीं । प्राकारस्वर्णें दुसरा ॥ ८० ॥

हाचि सद्गुरूच्या वरदानें । मज प्रत्यक्ष ब्रह्मदर्शन ॥
अंतर्बाह्य दिसे पूर्ण । सत्याचिद्घन् अस्तिभातिप्रिय ॥ ८१ ॥

नाम रूप दोनी । जडत्वें माया जाणोनि ।
तेही ब्रह्मींचा आवर्त गणोनि । मिथ्यापणीं भाविलें ॥ ८२ ॥

आत्मरस अस्तिभातिप्रिय घेउन । नामरूप आंठोळी साळी जाण ।
त्या दोहींचें केलें विसर्जन । तेणें आनंद पुष्टि घडे ॥ ८३ ॥

सिद्धेश मत सांप्रदाय । स्थळस्थळीं कथिलाच आहे ।
भैरव समुद्रोद्भव होय । सुधाकर त्र्यंबकराजगुरु ॥ ८४ ॥

बाळबोधीं सांप्रदाय । स्वजन्मप्रभृति जो होय ॥
तो कथिलाचि असे निश्चय । शिष्यबोधार्थ निजमाहिमा ॥ ८५ ॥

त्यांपासोनि महामौळिपर्यंत । जे सिद्ध झाले महंत ।
ते कथिले आम्ही यथास्थित । ज्ञानसुधा सद्ग्रंथीं ॥ ८६ ॥

परानंद विज्ञानानंद । कमळानंद शिवानंद ।
चिन्मयानंद हे सिद्ध । पांच ही मुक्त ॥ ८७ ॥

यांची माहिमा अद्भुत । वर्णनी कोण समर्थ ।
खला दाविला ज्ञानसुधेंत । अनुभूति तयांच्या बोधाची ॥ ८८ ॥

यास्तव नाहीं ये स्थळीं । महिमा विशेष वर्णिली ।
मुख्य सद्गुरु महामौळी । वर्णितां वर्णिलें सर्व होती ॥ ८९ ॥

रविकुळीं मुख्य रघुनाथ । वर्णितां वर्णिले पूर्वजात ।
रविसमान त्रिंबकराज येथें । रघुनाथ आमुचे महामौळी ॥ ९० ॥

सांप्रदाय प्रकाशक । मूळ माध्यंदिन त्र्यंबक ।
जेणें सप्तशृंगीं देवी एक । वीरा अर्चिली कठिण तपें ॥ ९१ ॥

साक्षाच्छिवावतार म्हणोन । सप्तम दिवसीं झाली प्रसन्न ।
सिद्धेश्वरसहित दर्शन । देऊन हृदयीं प्रवेषली ॥ ९२ ॥

सकळ ज्ञान बोध कळा । हृदयीं प्रेरिते चित्कळा ।
श्रुतिस्मृती दिसती सकळा । करतळामळकप्रमाणें ॥ ९३ ॥

एकादश वर्षांचें मान । तेव्हां मिळालें ज्ञाननिधान ।
तें त्रिंबकरायासि कृपेनें । सप्तशंगी प्रत्यक्ष ॥ ९४ ॥

त्यांचा शोधोनि मथितार्थ । सर्व जनोपकारार्थ ।
बाळबोध महाग्रंथ । रचिला विश्वब्रह्मबोधार्थ ॥ ९५ ॥

त्रिखंड मंडित महाग्रंथ । कथनें पंचताळीस विख्यात ॥
ज्ञानमंदार उगवत । मोक्षफळदायक ॥ ९६ ।

तयांपासोनि सिद्धपंचक । गणेशपर्यंत कथिले पुरुख ।
बोधसंपन्न विवेक । प्रकट करिते निज शिष्यां ॥ ९७ ॥

गणेश सुत बापदेव गुरु । महामौळि नामें प्रसिद्ध योगेश्वरु ।
जेहीं प्रत्यक्ष प्रणवाकारु । दाविला लोकीं आमूढां ॥ ९८ ॥

तेचि मज होवोनि कृपावंत । महामहंत बापजीपंत ।
मी जाणोनि दीन अनाथ । कृपा केली दयाळें ॥ ९९ ॥

परमार्थ विषयीं कोठें कांहीं । अणुमात्र गुंता राहिला नाहीं ।
ब्रह्मबोध घडला पाही । आदर्शीं स्वरुप तद्वत ॥ १०० ॥

दर्पणीं बिंबित नगर । दृश्य आत्मवीं तदाकार ।
भासोनि प्रकाशे प्रतिबिंबाकार । निजांतर्गत स्वानुभवें ॥ १०१ ॥

लक्ष्मीधरें महावाक्य उपदेश केला । बापदेवीं तो अर्थ प्रकट दाविला ।
स्वानुभव आणोनि दीधला । हृदयीं लाविला ज्ञानदीप ॥ १०२ ॥

जेथील तेथेंचि होतें । तेंचि दावोनि दीधलें आयितें ।
दाविलें तें भेदापरतें । बोलापुरतें तें नव्हे ॥ १०३ ॥

चरम गुरु बापदेव । म्हणोनि यांचा सांप्रदाव ।
रूढविला हा भाव । अंतरीं धरी गुणवंते ॥ १०४ ॥

लक्ष्मीधर पर्यंत सांप्रदाय । पूर्वीं आहेचि निश्चय ।
तो या लोकीं यमुना प्राय । सर्व अपाय नाशक ॥ १०५ ॥

सिद्धेश्वर सांप्रदाय भागीरथी । तेही मिळाली यमुनेप्रति ।
पूर्वीं यमुना असतां ख्याति । भागीरथीची यापुढें ॥ १०६ ॥

दोहीं बोधांचा संगम । घडला प्रयाग सांगे निगम ।
सिता असिता सारिता योग उत्तम । जगदोद्धारकारक ॥ १०७ ॥

राममंत्रविद्या पावन । हे गुप्त सरस्वती जाण ।
त्रिवेणी हे प्रमाण । मुक्तिदात्री ॥ १०८ ॥

प्रयागीं शूलटंकेश्वर । तोचि येथें सिद्धेश्वर ।
प्रयाग माधव सुंदर । कृष्ण येथें मुख्यत्वें ॥ १०९ ॥

श्रीरामचंद्र महावट । ह्मणोनि प्रयाग मुख्य पीठ ।
हेंचि प्रत्यक्ष भूवैकुंठ । जीवता मुक्तिदायक ॥ ११० ॥

प्रयागीं करितां देहार्पण । पुन्हा न घडे जन्ममरण ।
विष्णुपद तें निर्वाण । देहत्यागमात्रें प्राणिमात्रां ॥ १११ ॥

येथें देहाभिमान बळी । अर्पोनि हें तीर्थ कवळी ।
तो विष्णुपदाची नवाळी । भोगी त्रिकाळीं यथार्थ ॥ ११२ ॥

येथेंही त्रिमार्गाचें मिळणें । सांप्रदाय प्रयाग भवसेन ।
शुद्ध सिद्धेश्वर गंगाप्रवाह जाण। होवोनि अभिन्न यमुनेसि ॥११३॥

जो जो बोध ये गंगे माझारीं । तो तो गंगा नाम धरी पुढारीं ।
जे जे प्राप्ति घडली अनेक गुरुवरीं । ते सर्व सिद्धेश्वरीं एकवटली॥

आह्मांपासुनि इतःपर । ऐसा संकेत निर्धार ।
मंत्रमार्गी लक्ष्मीधर । गुरु परमगुरु उच्चारिजे ॥ ११५ ॥

ज्ञानमार्गीं बापदेव । त्यांचा कथावा सांप्रदाव ।
हा संकेत दृढाव । धरावा आमुच्या शिष्यकुळीं ॥ ११६ ॥

मंत्रयोगीं लक्ष्मीधर । ज्ञानयोगीं बापदेव गुरुवर ।
दोघेही एकाकार । मंगळाचरणीं वंदिजे ॥ ११७ ॥

नमनी ध्यानी स्मरणी । अखंडाकारता दोंपणीं ।
सत्चित्आनंद त्रिपदा मेळणीं । चैतन्य पदीं एकत्वें ॥ ११८ ॥

भेदाभेद निदर्शक । एक चैतन्य अशेख ।
बोलापुरता भेद देख । चैतन्य एक अद्वय ॥ ११९ ॥

अद्वय पद तें शाश्वत । त्रिविध भेद विवर्जित ।
सजाति विजाति नसे स्वगत । स्मरणातीत निजवस्तु ॥ १२० ॥

ह्मणोनि सर्व प्रकारें । हा मार्ग सेवावा जाणरे ।
जेथें चतुर्योग सिद्धांत प्रत्यक्षाकारें। निरुपण सांप्रदायपूर्वक ॥१२१

कृष्णपूजन कृष्णध्यान । हरिहररूपीं अभेद चिंतन ।
मंत्रविद्या महापावन । गायत्री प्रमुख राम पर्यंत ॥ १२२ ॥

अष्टादश मंत्र संकेत । आम्हुच्या मार्गीं यथास्थित ।
परंतु अधिकारी पाहोनि सीक्षित । मंत्रविद्या प्रकाशिजे ॥ १२३ ॥

लोभ दंभें प्रकाशितां । उभय साधकां नाश सर्वथा ।
गुरुशिष्य जाण उभयता । मग अनर्था पात्र होती ॥ १२४ ॥

यास्तव मंत्र मुद्रा दर्शन । पात्र पाहोनि करा दान ।
सामान्य त्यासि रामकृष्ण । नाम पावन काय न करी ॥ १२५ ॥

देतां लक्ष कोटि धन । राज्यही प्राप्त होतां जाण ।
अथवा करील शिरच्छेदन । तरी महामंत्र प्रदान न कीजे ॥१२६॥

योग्य पाहोनि सर्वपरीं । तयासि दीजे गुरुवरीं ।
जैसी निजकन्या सुंदरी । कुलीना विद्यावंता अर्पिजे ॥ १२७ ॥

जो पडला लोभाचे बंदीं । तेणें हारविल्या सर्व सिद्धी ।
ह्मणोनि लोभपर कधीं । नोहिजे पुरुषें गुरुभक्तें । १२८ ॥

असतां देहीं सौंदर्य गुण । कुष्ट बिंदु होतां उत्पन्न ।
तो स्वरूपाचें करी नाशन । तद्वत लोभ येथेंही ॥ १२९ ॥

जेणें परमार्थीं संसार वाढविला । तेणें संसार थिता कां टाकिला ।
गेरु लावोनि डाग बाळगिला । काय ह्मणोनि चांडाळें ॥ १३० ॥

कुबडी कंथा मेखळा । कानीं कंठीं तुळसीमाळा ।
महापुरुष वेषें नटला । न संपादितां बुडाला नट तैसा ॥ १३१ ॥

संसारीं असोनि संसाररत । तोचि बरवा जो संसार करित ।
गृहस्थ धर्म आचरत । चौघांसारिखाप्रपंचीं ॥ १३२ ॥

अथवा होवोनि विरक्त । सद्गुरु सेवनीं घेतला परमार्थ ।
तेणें मागती विषयार्थ । संग्रह करितां पतित नोहे ॥ १३३ ॥

सांगे महापुरुषाचें नाम । भोंदोनि शिष्य केला ग्राम ।
बाह्यमुखीं रामराम । अंतरीं विश्राम घडी वसे ॥ १३४ ॥

तैशी महापुरुषपणाची राहटी । लोकीं कीजे कशासाठीं ।
गृहस्थ धर्मीं तुटातुटी । करावी ते किमर्थ ॥ १३५ ॥

जयासि परमार्थ सेवणें । अंतरीं वैराग्य वसविजे तेणें ।
प्रारब्धें आलें भोगणें । निरभिमानें भोगावें ॥ १३६ ॥

आधींच करावा विचार । संसार टाकितां दुःख फार ।
तेणें त्यागावा संसार । किमर्थ तरी सुंदरी ॥ १३७ ॥

जयानें संसार त्यागणें । गुरुबोध परमार्थ घेणें ।
काळे झोळी घातली जेणें । तेणें त्रिभुवन जिंतिलें ॥ १३८ ॥

पुन्हा फिरोनि दारोदार । सेखदार सुभेदार ।
कां आर्जवावे गृहस्थ फार । कारभारी दरबारिचे ॥ १३९ ॥

कागदपत्र इनामभूमि । सेत नांगर ग्रामग्रामीं ।
नाना प्रकारें वाढी उदिमीं । परमार्थी जनीं कां श्रमावें ॥ १४० ॥

ऐसाच करणें व्यवहार । तो काय म्हणावा वैराग्यपर ।
आशेनें बुडविलें घर । दंभ दुर्धर न सोडी ॥ १४१ ॥

न सुटे जिव्हा-रस-गोडी । न तुटे विषय परवडी ।
बाह्य वेषें लोकें वेडी । भोंदिली आवडी विषयाचे ॥ १४२ ॥

शिष्यापासुनि निजार्थ । संपादिजे हाचि परमार्थ ।
शिष्यवित्त-हरणार्थ । सोंग घेतलें महंतांचें ॥ १४३ ॥

असो आम्हांसि लोकनिंदा । करणें किमर्थ परवादा ।
हा विटाळ नोहिजे शुद्धा । म्हणोनि दुर्गुण दाविला ॥ १४४ ॥

आतां या गुणा टाकोन । शुद्ध करावें सद्गुरुभजन ।
मोक्षघटना होय जेणें । तो अर्थ साधणें मुख्य परमार्थ ॥ १४५ ॥

यास्तव ऐक वो सुंदरी । सद्गुरुभजन सार निर्धारीं ।
आत्मविद्या अनुसंधान धरी । तोचि सत्पुरुष मोक्षकाम ॥ १४६ ॥

जयासि मोक्षाचि आवडी । तेणें सावध घडीनें घडी ।
जोडावी आत्मतत्व जोडी । एकांतसेवनीं राहोन ॥ १४७ ॥

एकांतीं नोहे मन स्थिर । तेणें सेवावें सज्जनवर ।
आत्मविद्या निरंतर । चर्चा करावी सुखार्थ ॥ १४८ ॥

आत्मविद्येमाजि मन । संलग्न होतां समाधान ।
तेचि समाधि परम गहन । वृध्दि कीजे सुबोधें ॥ १४९ ॥

ऐसा आचरणप्रकार । हाचि सांप्रदाय शुद्ध सार ।
या वेगळा व्यवहार । घातक जाण सर्वस्वें ॥ १५० ॥

ज्ञानयोगें भगवद्भजन । हेंचि साधिजे मोक्षकामनें ।
संसारविषयासक्त मनें । संसार सुखें करावा ॥ १५१ ॥

ज्ञानयोग संसार राहटी । येणें नोहे विषय-तुटी ।
न मोक्ष न घडे भेटि । शांतिसुखाची संसारिया ॥ १५२ ॥

जयांसि शांतिसुख साधलें नाहीं । तयांसि फळ कांहींच नाहीं ।
मोक्ष नाहीं संसार नाहीं । यथास्थित दुर्बोधें ॥ १५३ ॥

म्हणोनि ज्ञानवंत नरें । संसारिं अनासक्ति अंतरें ।
हरिभजना निर्धारें । शांतिसौख्य पावावें ॥ १५४ ॥

शांतिसुखाचा लाभ । तेचि जीवता मुक्ति सुलभ ।
मोक्ष देहळी स्वयंभ । शांति जाणे प्रिये तूं ॥ १५५ ॥

म्हणोनि सर्व प्रकारीं । परम शांति साधावी नरीं ।
न गुंततां संसारीं । पद्मपत्रापरी वर्तावें ॥ १५६ ॥

संसार नव्हे धन । संसार नव्हे प्रमदाजन ।
संसार नव्हे पुत्रादि स्वजन । क्षेत्रवृत्ति राज्य तेंहीं ॥ १५७ ॥

कांहींच नव्हे संसार । एक आशाबंध कर ।
तेचि भोगवी संसार । आशारहित जीवन्मुक्त ॥ १५८ ॥

जीवन्मुक्तांचें संचरण । सर्वत्र नैराश्य निरभिमान ।
तोचि परतत्व साधी गहन । इतर तो जाण जडबुद्धी ॥ १५९ ॥

आशा जिंतोनि सर्वेपरीं । राहटि करितां संसारीं ।
जीवन्मुक्त निर्धारीं । संसारीं लिप्त तो नोहे ॥ १६० ॥

म्हणोनि जीवन्मुक्त नरीं । नैराश्य वसावें संसारीं ।
परम मोक्ष पात्रे सुंदरी । ईश्वरत्व वरी तो एक ॥ १६१ ॥

एवं निरंजन योगी स्वप्रियेसि । शांतिबोध परम उपदेशी ।
तदुपरि राहिले स्वस्थ मौनेसीं । मानसीं सद्गुरुसि चिंतित ॥ १६२ ॥

पुन्हा तयासि गंगावती । विनयें आचार झाली पुसती ।
ते सदाचार पद्धती । कथीन पुढिल्या उल्हासीं ॥ १६३ ॥

इतिश्री निरंजनदासविरचित । सांप्रदायपरिमळ महाग्रंथ ।
येथें षट्पद साधुसंत । रमतां तृप्ति घडेल ॥ १६४ ॥

---

## उद्गार पांचवा.

---

निरंजनासि गंगावती । विनयनम्रा महासती ।
सदाचार झाली पुसती । कैसें वर्तिजे संप्रदायीं ॥ १ ॥

या संप्रदायीं शिष्यगण । तेहीं आचारावा धर्म कवण ।
संसारीं असतां संसरण । दोषरहित कैसें घडे ॥ २ ॥

संसारातीत जन । जे वैराग्यवंत महापावन ।
संन्यासधर्मप्रवीण । ऊर्ध्वरेते अवधूत ॥ ३ ॥

ज्ञानसंपन्न स्वानुभवी । आत्माराम जे तरले भवीं ।
ते जीवन्मुक्त महापदवी । भोगिती कैवला सुखाची ॥ ४ ॥

ते महानुभाव महापुरुष । संन्यासी ते परमहंस ।
योगी ज्ञानदीपप्रकाश । हृदयीं प्रकाशे अखंड जया ॥ ५ ॥

ते तों मुक्तिसुंदरीकांत । अहैतुक भक्ति आचरत ।
——राहित भगवंत । स्वाधीन केला भावबळें ॥ ६ ॥

नित्य भगवत्स्वरूपीं रमण । गुंता कोठेंचि नसे या कारणें ।
ते तों पद पावलें निर्वाण । पुनरागमन वर्जित ॥ ७ ॥

आतां संसारी असोनि निस्पृह । संसार करिती आश्रयोनि गेह
भार्यापुत्रादि समुदाय । पोषिती ईश्वरदत्त ते ॥ ८ ॥

ऋणानुबंधीं संलग्न । तयांसि पोषिती गुंवगोन ।
कां जे जगदीश नारायण । त्याची माया जाणोनि ॥ ९ ॥

त्याची आज्ञा प्रमाण । म्हणोनि करिती पोषण ।
नसे स्नेहममताबंधन । निराभिमान जे ज्ञानी ॥ १० ॥

तेही मुक्त निर्धारीं । परि संसार कीजे परोपकारीं ।
जे वर्तती पर्वतापरी । जन्मजीवन परार्थ ॥ ११ ॥

देह पुत्र वनिता । तेही रक्षिती परहिता ।
परोपकारावांचोनि स्वार्था । न सेविति ते उदार ॥ १२ ॥

चंद्र समस्त क्षितिमंडळ । स्वप्रकाशें करी धवळ ।
निजशरिरीं कळंक मळ । धूणें न घडे जयातें ॥ १३ ॥

जे परनिष्ठ जन । महाज्ञानी सज्जन ।
ते स्वकार्यसाधनीं उदासीन । परोपकार परायण म्हणोनि ॥ १४ ॥

जैसा जीवंत तरुवर । आपण वाहे फळपुष्पभार ।
पर्जन्य उष्ण हिम दुर्धर । साहे आंगीं परार्थ ॥ १५ ॥

छाया त्वचा मूळफळ । पुष्पें पर्णें केवळ ।
परानुकूल वर्तिजे निश्चळ । जे कां वत्सल दीनाचे ॥ १६ ॥

ऐसे जे परोपकारी । नारायण जाणोनि सर्वांतरीं ।
आत्मपूजा मणोनि निर्धारीं । परोपकारीं सादर ॥ १७ ॥

ऐसे जे परमपुरुष । तेचि मुक्तीचे प्राणपुरुष ।
ते पावले निजपदास । ज्ञानवैराग्यें परानिष्ठ ॥ १८ ॥

ऐशियांस मुक्तिघटणा । चोहींयुगीं घडे सुजना ।
येथें संदेह मना । कांहींच नसे ॥ १९ ॥

सांप्रत या कलिजनीं । उद्धार पावावा कैशानी ।
जे अखंड अहंता ममताभिमानी । भ्रांत मोहें माजले ॥ २० ॥

येहीं वर्तिजे कवण्या न्यायें । असावें कवण्या सांप्रदायें ।
यांसि मुक्तता कैशी होय । कैसे आचार आचरावे ॥ २१ ॥

हें सर्व यथास्थित । संक्षेपें सांगावें कृपायुक्त ।
मी दीन म्हणोनि पुसत । सर्वज्ञ राया उद्धरावें ॥ २२ ॥

ऐकोन प्रेमवतीचें वचन । निरंजन अतिहर्षित मन ।
आचार कथिती जे निपुण । आचरतां पावती निजपद ॥ २३ ॥

अवो सुंदरी तुझा प्रश्न । जगदोद्धारार्थ वाटे जाण ।
सज्जन आचरती गुणसंपन्न । तेचि पावन या लोकीं ॥ २४ ॥

साजणी कठिण कलियुग । येथें बहुत पापप्रसंग ।
वेदशास्त्रें पुराणें अनेग । कलिदोष वर्णिती अपार ॥ २५ ॥

जयांत कांहींच शुद्धि । नसेचि द्रव्यक्रियादि ।
प्रायशा नव्हे बुद्धि । धर्माचरणीं कवणातें ॥ २६ ॥

जिव्हेंद्रियलोलुपता । साधिजे हेचि मुख्यता ।
जो कां मेळवी वित्ता । अन्यायधर्में तो प्राज्ञ ॥ २७ ॥

जो संग्रह करी धन । तो प्रमाणवंत निपुण ।
तोचि एक संसार करुं जाणे । म्हणवी प्रवीण या लोकीं ॥२८ ॥

स्त्रीपुत्रांचें पोषण । ममताभिमानें करी जाण ।
तयासी म्हणती धन्य धन्य । कुटुंबपोषक हा एक ॥ २९ ॥

असो ऐसे सहस्रवरी । वर्तती प्राणी संसारीं ।
आसक्त होवोनि घरदारीं । गुंतले कोशकीटवत ॥ ३० ॥

यांतही परद्रोह परवित्तहरण । परदारादिसंगीं निबद्धमन ।
सेविती पुनः पुन्हा वमन । तरी अन्तःकरण विटेना ॥ ३१ ॥

मद्यमांसभक्षक । वृथाहिंसाकारक ।
परघातकी अनेक । पापकर्त्ते अविचारी ॥ ३२ ॥

कदाचित् सत्कर्म करिती । तरि कामाभिलाषे वृथा सांडिती ।
अथवा स्वर्गसुखार्थ मांडिती । उत्साह नाना ॥ ३३ ॥

किंवा धन आयुष्य पुत्रसंपदा । शत्रुजयार्थ कर्म सदां ।
करणें परंतु मोक्षपदा । नेच्छिती लोक कळीचे ॥ ३४ ॥

नेणती भगवद्भक्तिगोडी । नसे निष्कामव्रताची आवडी ।
तीर्थभ्रमक कावडी । वाहती कष्टें कामार्थी ॥ ३५ ॥

तो काम सकळजन्मांतरीं । पशुकीटादिशरीरीं ।
सहजप्राप्त असतां परि । तरी कामिक तेंचि इच्छिती ॥ ३६ ॥

बहुतां जन्माचे अंतीं । मनुष्यदेह दुर्लभ अति ।
पुरुषार्थदायक असोनि निश्चिती । मोक्ष घटक हा एक ॥ ३७ ॥

तत्रापि असे क्षणभंगुर । मृत्युसवेंचि संवचोर ।
यास्तव सावध होवोनि नर । आत्मविचार कां न करिती ॥ ३८ ॥

मनुष्यदेह होतां प्राप्त । सदां आत्मविचाररत ।
भगवद्भक्तिनिरत । परहित साधावें उचित हें ॥ ३९ ॥

धर्म आचरावा विहित । हेंचि मानोनि स्वाहित ।
विषयाभिलाषरहित । असावें सदा ॥ ४० ॥

क्षणभंगुर नश्वर । देह चिंतावा निरंतर ।
घडीनें घडी आत्मविचार । करावा हाचि पुरुषार्थ ॥ ४१ ॥

न कीजे परनिंदाद्रोह । परधर्मउच्छेद निःसंदेह ।
करुं नये अद्रोह । असावें मूर्ती ॥ ४२ ॥

सर्व धर्मांची सहायता । करावी सामर्थ्य असतां ।
आपुल्या धर्मविहिता । सदां फार जपावें ॥ ४३ ॥

परधर्माचें आचरण । कदापि न कीजे जाण ।
परंतु परधर्म पाहोन । संतोष मानावा मानसीं ॥ ४४ ॥

हें ईश्वराचें कौतुक । ईश्वर मायाचाळक ।
अनेकमार्गदर्शक । ईश्वर सर्व ॥ ४५ ॥

सर्वांदर्शनी आराधन । न घडे एका ईश्वरावांचोन ।
नाना नामरूपें जाण । भजणें एका जगदीशा ॥ ४६ ॥

शैव वैष्णव शांभव । सौर गाणपत्य भैरव ।
शाक्त बौद्ध हे भाव । उपासनादर्शन प्रकार ॥ ४७ ॥

नाना आगमीं एक । अर्चिजे लक्ष्मीचा नायक ।
त्याचींच नामें रूपें अनेक । सर्वही भक्त तयाचे ॥ ४८ ॥

सर्व त्याचे किंकर । सर्व त्याचे आशापर ।
सर्वांसि एक निर्धार । ईश्वर कर्ता ह्मणोनि ॥ ४९ ॥

ईश्वरचि असे मोक्षदाता । हा सर्वांस निश्चय पुरता ।
असे म्हणोनि सर्वथा । भजती देवा सर्वही ॥ ५० ॥

स्वधर्माचरणें ब्राह्मण । अर्चिती एक नारायण ।
क्षत्रियीं तेही जाण । विहिताचरणें वर्तिजे ॥ ५१ ॥

वैश्य शूद्र अनुलोम जाती । विलोमादि जे वर्त्तती ।
ते सर्व कर्मैं भगवत्प्रीति । यथास्थित वर्त्ततां सहज घडे ॥ ५२ ॥

जें जें सहजाचरण । नैष्कर्म्यभावनें करणें ।
अहंकार कामना न धरणें । तेचि कृष्णार्पण सद्भक्ति ॥ ५३ ॥

अन्यधर्मीं प्रयोजन । किमपि नसे या कारणें ।
स्वधर्मशुद्धाचरण । हरिप्रीति कारण तें होय ॥ ५४ ॥

ब्राह्मणें उठावें प्रातःकाळीं । ब्राह्मी सुमुहूर्त अमृतवेळीं ।
आधीं रामनामावळी । उच्चारपूर्वक सद्भावें ॥ ५५ ॥

अल्पाचमन पादक्षाळण । करोनि सेविजे आसन ।
आत्मचिंतन गुरुध्यान । अजपा निवेदन करावें ॥ ५६ ॥

गजेंद्रमोक्षादि पठण । होतां अरुणोदय जाण ।
कीजे शौचविधान । मृत्तिकालेपनपूर्वक ॥ ५७ ॥

मुखक्षालन दंतशुद्धी । दंतकाष्ठ यथाविधी ।
यानंतर गंगादि तीर्थोदीं । स्नान संकल्पपूर्वक ॥ ५८ ॥

नदीतटाक कासार । वापीकूपादि जलाशय सागर ।
अथवा उष्णोदकीं निरंतर । घरीं स्नान अशक्तां ॥ ५९ ॥
यथाकाळीं संध्यावंदन । यथाशक्ति गायत्री जपोन ।
अग्निहोत्र श्रौतविधान । औपासन स्मार्त्त हो ॥ ६० ॥

अग्निपूजा मुख्य द्विजा । अग्निमुख अधोक्षजा ।
अग्नि दैवत ह्मणोनि वोजा । कीजे अर्चा अग्नीची ॥ ६१ ॥

उपासना मूर्तिपूजन । कुळ अथवा गुरुपरंपरा प्रमाण ।
यथा मंत्रतंत्रविधानें । अर्चन कीजे ब्राह्मणीं ॥ ६२ ॥

वैदिक मार्ग अनुसरोन । तंत्रविधान हीं पाहोन ।
निजपद्धतिअधिकार स्मरोन । आचरण कीजे यथोक्त ॥ ६३ ॥

जप होम देवतातर्पण । जें अंग असेल मंत्रविधानें ।
तें आचरावें पद्धतिप्रमाण । अनालस्यें शोधयुक्त ॥ ६४ ॥

पंचमहायज्ञ नित्य । ते ब्राह्मणीं आचरावे सत्य ।
तें नाचरतां पातित्य । सध्या घडे ॥ ६५ ॥

अतिथिपूजन यथाकाळीं । नित्य नैमित्य तत्तत्काळीं ।
काम्य निषिद्ध कदाकाळीं । न करुनि वसिजे ब्राह्मणीं ॥ ६६ ॥

शुचित्व दक्षत्व ऋजुत्व शांति । सर्वमित्रता सुशीलवृत्ति ।
यथाप्राप्त संतुष्ट चित्तीं । अदंभमत्सर अनालस्यें ॥ ६७ ॥

वेदशास्त्रअध्ययन अध्यापन । यज्ञ यजन आणि याजन ।
दान प्रतिग्रह ब्राह्मणें । उचित जाणोनि करावें ॥ ६८ ॥

तीन कर्मे मुक्त्यर्थं । तीन कर्मे उदरार्थ ।
ब्राह्मणा नेमिलीं समर्थें । धात्यानें पूर्वीं निगमसाक्ष ॥ ६९ ॥

इष्टापूर्त्ति दोनि । करावीं परोपकार चिंतुनि ।
सर्वभूतीं आत्मा जाणोनि । तत्कारण सर्वही करावें ॥ ७० ॥

वृत्तीकारणें कांहीं व्यवसाय । करावा तोहीं यथान्याय ।
अल्पपातकें द्रव्यसंचय । कुटुंबभरणार्थ करावा ॥ ७१ ॥

कुटुंब केवळ स्त्रीपुत्रादिक । ऐसें मानतील लोक ।
ज्ञानिया विश्व कुटुंब देख । यांसि ममता सर्वत्र ॥ ७२ ॥
तडी तापडी संन्यासी । ब्रह्मचारी आतिथि मुख्यत्वेंशीं ।
तयांसि जो गृहस्थ पोषीं । कुटुंबपोषक हा एक ॥ ७३ ॥
दारपुत्रादिमात्र कुटुंब मानी । त्यांचे स्थळीं ममताभिमानी ।
देहीं अहंता जो मानी । तो मनुष्य न मानी राक्षस ॥ ७४ ॥
सर्व मी सर्व माझें । ज्ञान नेत्रीं ऐसें सुझे ।
तयाचें उतरलें वोझें । संसारभार दुर्धर ॥ ७५ ॥
ज्ञानी ह्मणिजे परमेश्वर । परमेश्वराचें कुटुंब विश्वाकार ।
यांसि घडावा उपकार । तरी कुटुंबपोषण तें होय ॥ ७६ ॥
तो कुटुंबपोषक निर्धारेशीं । ऐसा श्रुतिशास्त्रार्थ परियसीं ।
ह्मणोनि आचरावें सादरतेशीं । कुटुंबपोषणीं तत्पर ॥ ७७ ॥
ऐसें कुटुंब न पोषितां । तो नरकासि जाय सर्वथा ।
दारपुत्रादि स्वजन पोषिता । भार वाहता ममतेचा ॥ ७८ ॥
ब्रह्मज्ञानपरायणें । न मेळविजे वर्षासन ।
वर्षासनदाता ग्रहण । करी याच्या सुकृताचें ॥ ७९ ॥
वर घडे शासन । म्हणोनि नाम वरशासन ।
इनामभूमि न घेईजे जाण । उपाधिकारण म्हणोनि ॥ ८० ॥
कोठें न करावा मठ । जेथें मठ तेथें खटपट ।
उगीच करावी वटवट । लागे जनमात्रासीं ॥ ८१ ॥
झाडझडुप लावितां । कलहमूळ सर्वथा ।
तेणें विक्षेप घडे चित्ता । ध्यानयोग अंतरे ॥ ८२ ॥
ब्रह्मज्ञानी तोचि मुनी । अखंड वसे आत्मध्यानी ।
शद्वपांडित्यमात्रें जनीं । प्रतिष्टा पावे अंतःशून्य ॥ ८३ ॥
कर्मयोग ज्ञानावधि । ज्ञानमात्र ध्यानावधी ।
ध्यान साधतां कर्मविधी । राहे तरिही अनुकूळ ॥ ८४ ॥

यास्तव मुख्य आत्मध्यान । तें कोटिगुणें अधिक कर्माहुन ।
जयासि साधलें आत्मज्ञान । विधिकिंकर जन तो नव्हे ॥ ८५ ॥

भ्रमरें सुगंधमात्र सेविला । तो कदापि नाहीं तृप्ति पावला ।
जो मकरंदरस प्याला । तोचि धाला सर्वस्वें ॥ ८६ ॥

मी आहें ज्ञानसंपन्न । ऐसें न कळवीजे लोकांकारणें ।
तेथें लोकांपासोनि धन । ज्ञान सांगोन केंवि आर्जिजे ॥ ८७ ॥

ज्ञान ह्मणिजे अनुभवशास्त्र । येथें लौकिक नसे तिळमात्र ।
ज्ञाननिष्ठ स्वतंत्र । तयासि परतंत्रता किमर्थ ॥ ८८ ॥

ज्ञानी प्रारब्धमुख्यवादी । प्रारब्ध सकळकार्य संपादी ।
येणें पडावें उपाधि । काय कारण सांग पां ॥ ८९ ॥

जितुकी उपाधि जडे । तितुकाचि संसार वाढे ।
जितुकी उपाधि खंडे । तितुकी घडे ज्ञानवृद्धि ॥ ९० ॥

सारांश उपाधिनिरशन । कीजे हेंचि मुख्यकारण ।
कायावाचामन । भगवच्चिंतनें राहिजे ॥ ९१ ॥

भगवच्चिंतनाहोनि सार । नाहीं दुसरा प्रकार ।
ह्मणोनि सदैव सादर । भगवद्भजनीं वर्तिजे ॥ ९२ ॥

श्रीभागवत भारत गीता । आदि करुनि महाग्रंथा ।
शोधोनि भगवद्भक्तिपंथा । आचरण कीजे तद्वत ॥ ९३ ॥

गुरु आणि उपासना दैवत । तिसरा वेदांत सिद्धांत ।
तीनी करोनि एक मत । ब्रह्म-भावना दृढ कीजे ॥ ९४ ॥

गुरुसज्जनाची भक्ति । अहर्निश घडावी संगति ।
हेचि द्वार भगवत्प्राप्ति । सर्व वेदांतसिद्धांत ॥ ९५ ॥

ऐसा गृहस्थ आचरतां । तोचि संन्यासी पुरता ।
काम्यकर्म टाकितां । संन्यास घडे ॥ ९६ ॥

घेवोनि दंडकाषाय । वेषमात्र संन्यास होय ।
परि आशेमाजि गुंतला पाय । चोर खोडां ज्यापरीं ॥९७॥

नसोनि कांहीं जोजार । संन्यासाश्रम शुद्ध सार ।
असतां घेतला संसार । अनेकपरी ॥ ९८ ॥

अर्थसंपादनार्थ संन्यासी । व्यर्थ फिरती देशोदेशीं ।
दंभ दावोनि लोकांसि । मठ चालविजे हा हव्यास ॥ ९९ ॥

उदंड वाढविलें दुकान । अर्थी सदां गुंतलें मन ।
तो संन्यास नव्हे कारण । मोक्षपंथीं प्रतिकूळ ॥ १०० ॥

सन्यास घेयिजे वैराग्यपरें । तोहीं श्रवणार्थनिर्धारें ।
वेदांतश्रवण विहिताचारें । करावें मुख्य सन्यासें ॥ १०१ ॥

श्रवणसिद्धि पूर्ण झाली । फळली आत्मज्ञानवल्ली ।
न गुंतोनि तिच्या सिद्धि फुलीं । ध्यानफळीं आसक्त ॥ १०२ ॥

ब्रह्मरसप्राशन । सदां आत्मानुसंधान ।
प्रणवार्थभावन निजध्यासन । हा रससेवन सर्वदा ॥ १०३ ॥

भिक्षाकर पात्र उदरार्थ । कंथाकाषाय हिमवारणार्थ ।
कौपीनमात्र आच्छादनार्थ । उदकपानार्थ कमंडल ॥ १०४ ॥

दंडश्वानशूकरनिरसनी । अल्पभाषी सदामौनी ।
वसणें जनविवर्जित स्थानीं । भिक्षार्थमात्र जनसंग ॥ १०५ ॥

ब्रह्मलोकप्राप्तीकारणें । ऐसें आचरतां संन्यास ग्रहणें ।
तो आश्रम परम पावन । मुक्तिधामप्रापक ॥ १०६ ॥

तो गृहस्थासि अतिपूज्य । तोचि यती सर्वां भज्य ।
तोचि कैवल्यसाम्राज्य । शांति साधोनि जो पावे ॥ १०७ ॥

अनेक मनुष्य देही खोडी । असती कां जे स्वभाव न सोडी ।
संन्यास घेतां न सांडी । निजबुद्धि तयां ॥ १०८ ॥

ऐसेही संन्यासी उदंड । परि शांतिवांचोनि तें कावाड ।
शांतिसुख एक गोड । मुख्य सार सर्वांहुनि ॥ १०९ ॥

शांतिसुख प्राप्त जयासी । तोचि मुख्य संन्यासी ।
ते लाधलियां गृहस्थासी ।न पावती संन्यासी कळा त्याची॥११०॥

परंतु वेषमात्र पाहुन । गृहस्थें करावें वंदन ।
भिक्षा भक्तियुक्त देऊन । विनय नम्रें पूजिजें ॥ १११ ॥

नमो नारायण मंत्रपूर्वक । संन्यासी वंदिजे सम्यक ।
सादर भिक्षा देवोनि देख । असतां अनुकूळ प्रावरण ॥११२॥

उदकपात्र धातुविवर्जित । अलाबु कमंडलमृत्तिकाजनित ।
कंबळ धवळ हिमशांत्यर्थ । देवोनि मानें बोळवावें ॥ ११३ ॥

त्याचे बरेवाईट गुण । वानू नयेति मुखेंकरून ।
संन्यासमात्रीं नारायण । ऐसा भाव असावा ॥ ११४ ॥

सज्जन हरिभक्त ज्ञानी । आश्रमा आलियां विशुद्ध मनीं ।
आतिथ्य करोनि तोष मानी । आला भगवंत निजालया ॥ ११५॥

वैष्णव–चिन्ह–चिन्हित । तो शूद्र चांडाळ जरी प्राप्त ।
त्यासि मानसपूजा स्वार्थ । टाकोनि कीजे हरिबुद्धि ॥११६॥

अथवा शैव सदाचारी । दैवें पातले आपुल्या घरीं ।
त्यांचेंही आतिथ्य सेवन करी । शिवभावनें प्रीतियुक्त ॥११७॥

शैव शांभव वैष्णव । गाणपत्य सौर शाक्त महानुभाव ।
घरा येतां मानिजे देव । भेदमत्सर त्यागोनि ॥ ११८ ॥

शूद्र जरी देवभक्त । त्यासि पूजिजे यथोक्त ।
अन्नपान मानयुक्त । आर्पिजे गृहस्थें सर्वांसि ॥ ११९ ॥

पीडितांची पीडानिवृत्ति । आपुली असेल तीतुकी शक्ती ।
तीतुकी करावी वचनोक्ती । चालिल्या सांगोनि परांतें ॥१२०॥

आपुल्या दारपुत्रीं आवडी । संकटीं कैसा चरफडी ।
तैसाचि परहितीं लवडसवडी । धांवे तो गडी मुक्तीचा ॥१२१॥

जयासि झालें ज्ञान । तयाचें हेंचि निदर्शन ।
सर्वभूतीं आत्मा समान । पाहोनि वर्त्तिजे यथास्थित ॥ १२२ ॥

मनःपूर्वक कळवळा । असावा दीन देखतां डोळां ।
तोचि मुक्तीचा सोहळा । भोगी संत ॥ १२३ ॥

संतपण तें कांहीं । बीदोबीद सांडलें नाहीं ।
संत असतां देहीं । संतपण ये ॥ १२४ ॥

बाहेरि संतपण मिरविलें । धनदारार्थीं वेंचिलें ।
तें संतपण व्यर्थ गेलें । शाल्मली–तुळवत् वातसंगें ॥ १२५ ॥

तें नव्हे संतपण । जनाचे आघात सोसूं जाणें ।
द्वेषमात्र न करणें । मित्रता साधणें शत्रूसीं ॥ १२६ ॥

निंदा करोतु निंदक । छळोत परोपरीं छळक ।
बरें वाईट बोलोत लोक । आपण सारिखा सर्वांसीं ॥ १२७ ॥

उदारांचा शिरोमणी । शांतचित्त समाधानी ।
सर्वत्रांशीं मृदुभाषणी । चित्त हरील तो धन्य ॥ १२८ ॥

ऐसा गृहस्थधर्मी रत । वस्तुमात्र परहितार्थ ।
संग्रह केला तोचि संत । संन्यासीशतीं वरिष्ट ॥ १२९ ॥

सर्ववस्तुसंग्रह करावा । तो पदार्थ सर्व वेंचावा ।
तोचि माने देवा । परोपकारी ॥ १३० ॥

सारांश गृहस्थधर्मीं ऐसा वर्तता । तोच अस्मत्सांप्रदायीं पुरता ।
येर नाममात्र धरिता । तो टाकीं परता अजागळ ॥ १३१ ॥

अंधनेत्राचीं पातीं । उघडझांप व्यर्थ करिती ।
तैसे संसारीं आचरती । शोभतां अर्कफळ–साम्य ॥ १३२ ॥

ते आमुचे सांप्रदायी म्हणतां । मज लज्जा वाटेल सर्वथा ॥
ऐशासि उपदेश देतां । व्यर्थ होती विद्या गुरूच्या ॥ १३३ ॥

ऐशा गुणातें टाकोनि दूरी । देवभक्त सदाचारी ।
तो शिष्य कीजे निर्धारीं । सांप्रदायीं आमुच्या ॥ १३४ ॥

कर्णीं मुद्रा मेखळा सेली । पुंगी कंथा कुबडी झोळी ।
हा पाखंडवेष कदा काळीं । घेऊं नये ब्राह्मणीं ॥ १३५ ॥

जैसे शिष्ट ब्राह्मण । पूर्वापर वर्तती जाण ।
तोच वेष असाधारण । असों द्यावा ॥ १३६ ॥

जो जो वेष नूतन धरी । तो आपणासि लोकीं प्रकट करी ।
असामी महापुरुषांतरीं । घालावया ॥ १३७ ।

जें महापुरुषलक्षण । तें अत्यंत असे भिन्न ॥
तैसें वर्तता महापुरुषपण । धुंडीत ये निजसदना ॥ १३८ ॥

सर्वां मतीं सर्वांदर्शनीं । जें उत्तम असेल साजणी ।
तो संग्रह करावा शोधोनि । मुख्य आमुचा सांप्रदाय ॥ १३९ ॥

वैष्णवधर्मीं सदां असावें । हेंचि आमुचें मत बरवें ।
वैष्णवें देखतां नमावें । दंडवत घालावें धरणीसि ॥ १४० ॥

वैष्णवा वैष्णवें देखोनि । दंडवत लोटतां मेदिनी ।
उभयतांमध्यें शंखचक्रपाणी । गदापद्मधर उभा विष्णु ॥ १४१ ॥

वैष्णवो वैष्णवं दृष्ट्वा । साष्टांगं प्रणमेद्भुवि ।
तयोर्मध्यगतो विष्णुः । शंखचक्रगदाधरः ॥ १४२ ॥

तुं तव भक्तिमती नारी । माझी परमप्रिय सुंदरी ।
म्हणोनि गुरुसांप्रदायकथा विस्तरीं । सदाचारपूर्वक कथिली म्यां प्रेमें ॥ १४३ ॥

गौरी शंकराची वल्लभा । किंवा सूर्याची प्रभा ।
अग्निशक्ति शुभा । स्वाहा जैशी ॥ १४४ ॥

किंवा चंद्राची दीप्ति । किंवा वायूची सदागति ।
कुबेराची संपत्ति । तैशी तुं सती ममप्रिया ॥ १४५ ॥

किंवा ब्रह्माणी ब्रह्म्याची । इंदिरा जैशी विष्णूची ।
प्राणप्रिया आत्मयाची । चित्कळा तैंवि ॥ १४६ ॥

तुज मज भिन्नभाव तत्वता । नसोनि दिसे बोलापुरता ।
जळलहरी हे वार्ता । उपाधिकृत ॥ १४७ ॥

जैशी उदकाची शीतळता । शर्करेची मधुरता ।
सुधेची शुभ्रता । नये निवडितां भिन्नत्वें ॥ १४८ ॥

प्रकृतिपुरुषाचें अभिन्नपण । हें तों पूर्वींच केलें कथन ।
नारदें सच्चिदानंदस्वामीकारणें । परिसिलें तेहीं ॥ १४९ ॥

समुद्राची लहरी । ते अभिन्नत्वें तयामाझारीं ।
बोलापुरती परि । तरंग समुद्र नाममात्र ॥ १५० ॥

तैसा तुज मज भेद । नामापुरता परि शुद्ध ।
अस्तिभातिप्रियत्वीं अभेद । नामरूपीं भिन्नता ॥ १५१ ॥

नामरूप तेचि माया । चैतन्य अस्तिभातिप्रिया ।
मानोनि पावे अभया । ऐक्यबोध हा शाश्वत ॥ १५२ ॥

सर्व भाव पंचधा केले । त्यांत तीनि भाग निवडिले ।
ते चैतन्य म्हणोनि राखिले । दोनि टाकिले मिथ्यात्वें ॥ १५३ ॥

सूर्यकिरणीं उष्णता । दुसरी जाण प्रकाशता ॥
तिसरी पीतप्रभा निश्चिता । एकपणें ॥ १५४ ॥

मृगजळ नामरूप दोनी । तेथें भासलें लटकेपणीं ।
न भासतां किरणाची हानि । कांहीं आहे ॥ १५५ ॥

भासल्यां किरणासि विशेषता । काय झाली प्रिये पाहतां ।
तैसेंच येथें असतां नसतां । नामरूप चैतन्य सारिखें ॥ १५६ ॥

चैतन्यदृष्टी सर्व एक । नामरूपें भासे पृथक ।
नामरूपाविण सम्यक । जाणिजे चैतन्य अभेदें ॥ १५७ ॥

तूं प्रेमवती निष्ठावती । तत्रापि विशेष गुरुभक्ति ।
तुझे ठायीं पाहोनि सती । गूढहीं निगुती प्रकाशिलें ॥ १५८ ॥

हा सांप्रदायपरिमळ ग्रंथ । सांगणें पडिला तुझिया अर्थें ।
गुढ होता आजिपर्यंत । रत्नाकरीं रत्न तैसें ॥ १५९ ॥

तुझिया आर्तीकारणें । बाहेर पडिलें काढणें ।
परम रहस्य हें न सांगणें । बहिर्मुखा अभक्तां ॥ १६० ॥

आम्हीं केले ग्रंथ । कृष्णानंदसिंधु आदि अंत ।
ज्ञानसुधापर्यंत । पंचरत्नें ॥ १६१ ॥

तें वाचोनि यथाक्रमें । साहवा परिमळ वाचिजे नेमें ।
हा न पढतां उद्दाम । फळ संपूर्ण नव्हेचि ॥ १६२ ॥

पांच ग्रंथ वाचोनि अंतीं । सांप्रदाय वाचिजे निश्चितीं ।
ऐसें आमुच्या शिष्यप्रशिष्यांप्रति । शासनकर्ती तूं होय ॥ १६३ ॥

या ग्रंथीं गुरुसांप्रदाय । श्रीकृष्णलाभ दुसरा आहे ।
ज्ञानरहस्य पूर्ण आहे । आहाच नोहे सर्वथा ॥ १६४ ॥

जो जो ऐकेल हे कथा । तयासि विश्वास घडेल पुरता ।
भाविकां वाटेल सत्यता । असत्य अभाविकां शठातें ॥ १६५ ॥

जो स्वयें असत्यवादी । छळक निंदक दुर्बुद्धि ।
भेदवादी तया कधीं । येथें विश्वास घडेना ॥ १६६ ॥

तयासि पाहिजे दुकान । ते तों येथें नसे जाण ।
म्हणोनि मानितील अप्रमाण । मानोतु सुखें ॥ १६७ ॥

आम्हासि बहिर्मुखासीं काज । नाहीं तेही निंदितां लाज ।
आमुचे आहेति महाराज । साधुसंत भाविक ॥ १६८ ॥

तेहीं केलिया आदर । आमुचा मनोरथ सपुर ।
तेहीं केलिया अनादर । व्यर्थ श्रम तदां आमुचा ॥ १६९ ॥

परंतु रसिक जे ज्ञानी । ते अनादर न करितील यथार्थ मानी ।
श्रवणमात्रें मातें जनीं । धन्य करतील दयाळू ॥ १७० ॥

कमळहेळणा करितां मंडुकबकें । काय उणीव मानिजे पद्मकें ।
रसवेद्यत्व नसे निकें । उभयांचे ठायीं ॥ १७१ ॥

याचे रसिक षट्पद । तेचि मुख्य चतुर रसकोविद ।
ते सुखीं असतां पद्मासि खेद । नाहीं बकदर्दुरहेळणेचा ॥ १७२ ॥

दर्दुरबकप्राय प्राणी । यातें जरि कोणी न मानी ।
तरि दिसे तयांसीच हानि । मकरंदाभोदअलाभें ॥ १७३ ॥

रायासि ताट वोगरिलें । तें श्वानें सेवितां काय भलें ।
सुगरणीचें केलें गेलें । व्यर्थ हव्यासें प्रीतियुक्त ॥ १७४ ॥

राजा रसिक जेविता । तरि संतोष सुगरणी चित्ता होता ।
श्रमाचीही सार्थकता । वाटती मना ॥ १७५ ॥

तैसे माझे साधुसंत । हा परिमळ महाराज सेवित ।
तेव्हां माझे मनोरथ । पूर्ण झाले सर्वस्वें ॥ १७६ ॥

द्राक्षें गोड पक्व झालीं । तें योग्य नोहेति गाढवें भक्षिलीं ।
तें पाहिजेत अर्पिलीं । श्रीमंतजना सुजनांतें ॥ १७७ ॥

यास्तव पुनः पुन्हा हेंचि सांगणें । बहिर्मुखा हा ग्रंथ न दावणें ।
आच्छादोनि ठेवणें । आपुल्या ठायीं ॥ १७८ ॥

भाविक भक्त प्रेमवंत । जयासि पुस्तकीं आस्था बहुत ।
जे कां काळ न नेती व्यर्थ । साठी घटिकेंत पळमात्र ॥ १७९ ॥

सदा संतोष हरिभजनीं । सदा भाव साधुसज्जनीं ।
तयांसि प्रीति करोनि । ग्रंथ दाविजे गुरुबोध ॥ १८० ॥

समुद्रीचीं निघतीं रत्नें । तें होतीं श्रीमंतां आभरणें ।
वांचोनि दरिद्रां काय करणें । अलभ्य निकट असतांही ॥ १८१ ॥

पाणबुडे मोतीं काढणार । त्यांचे गळां मुक्ताहार ।
कर्णकुंडलादि अळंकार । देखिले कोणी ॥ १८२ ॥

तैसे अभागी नर । समीप असतांही दुर्लभ फार ।
कष्ट भोगिते निरंतर । भोक्तृत्व तया नसोनि ॥ १८३ ॥

दूरस्थही श्रीमंत जन । कृतपुण्यभाग्यवान ।
तयांसि भोग्य सागरजन्य । रत्नप्राप्ति अनायासें ॥ १८४ ॥

म्हणोनि सर्व प्रकारें । ग्राहक पाहिजे निर्धारें ।
भाविक देखोनि आदरें । गुह्य प्रकटतां कीजे ॥ १८५ ॥

ऐसा निरंजन माधवयोगी । गंगावतीस सानुरागीं ।
सांप्रदायपरिमळग्रंथ जगीं । प्रकटार्थ दाविला तारक ॥ १८६ ॥

या ग्रंथाची महिमा । एक कळे सर्वोत्तमा ।
गुरुमार्गाची महिमा । प्रत्यक्ष दिसे सर्वांसि ॥ १८७ ॥

निरंजन दास विनवी संतां । हे गुरुसंतति संतानलता ।
हे मुक्तिफळदात्री सर्वथा । ब्रह्मावबोध रसगोड ॥ १८८ ॥

हा रस सेविती परमहंस । येथें प्राप्त झाला अनायासें ।
म्हणोनि भाविकें उल्हासें । वारंवार सेविजे ॥ १८९ ॥

सेवितां जाणे गोडी । न सेविती ते बापुडी ।
रसा वंचोनि वेडीं । तोंड पाहती टकमक ॥ १९० ॥

या रसाचा परिमळ । तोही पुष्टि देणार निखळ ।
म्हणोनि सांप्रदायपरिमळ । ग्रंथ वाचिजे बोधार्थ ॥ १९१ ॥

येणें ज्ञानदीपें नरहरी । ओवाळिजे सज्जनवरीं ।
या ज्ञानयज्ञें श्रीहरी । यजावा पूर्ण ॥ १९२ ॥

स्वभानु नाम संवत्सर । भाद्रपदमास श्रीकर ।
आजि शुक्ल चतुर्थी विघ्नहर । गणपति अवतार ये तिथी ॥१९३॥

भानुवार ही उत्तम । सुभानु ऐसें ब्रह्मनाम ।
चिदादित्य निःस्सीम । आजि उदय पावला ॥ १९४ ॥

तुर्यावस्था चतुर्थी । शुक्लपक्ष वृद्धि पुढती ।
कळावृद्धि लाधली आयिती । सहज पौर्णिमापर्यंत ॥ १९५ ॥

साक्षाद्गणपती विघ्नहर । अविद्याविघ्नपरिहार ।
करिता झाला सर्वेश्वर । गुरुरूप अवतार गणपती ॥ १९६ ॥

सिद्धीबुद्धीचा दाता । विद्यावैभव प्राप्त करितां ।
जन्ममरणविघ्न वारिता । बोधमोदकदाता भक्तांतें ॥ १९७ ॥

हा चिद्विलास गणपती । याचा उदय त्रिजगती ।
विवेकांकुश हातीं । भक्तिपाश तो अभिनव ॥ १९८ ॥

चौमुक्तीचे चारी हस्त । शुंडादंड अनुसंधान शाश्वत ।
ब्रह्मरस दानोदक निभ्रांत । अविछिन्न अच्युत ॥ १९९ ॥

वेदांतश्रवण तेचि श्रवण दोनि । सदां वारिती श्रमिकभ्रमरां लागुनि ।
अधिकार नसे मधुरसपानीं । बहिर्मुखा यास्तव ॥ २०० ॥

आनंदतुंदिलशोभिवंत। प्रणवमस्तक विराजत।
अर्द्धमात्रा ते झळकत। चंद्ररेखा सद्भाळीं ॥ २०१ ॥

बिंदु किरीट सोज्वळ। सूर्यकोटि प्रकाश विमळ।
अनेकदर्शनपन्नगकुळ। अंगीं मिरवी आभरणें ॥ २०२ ॥

सच्चिदानंद गणपती। ध्यावोनि पूजिला निश्चिती।
आजि पूर्ण झाली चतुर्थी। पूर्ण फळ हें लाधलें ॥ २०३ ॥

हा ग्रंथ घनमोदक। नैवेद्य अर्पिला सम्यक।
वक्रतुंड गणनायक। सुमुख सुप्रसन्न मज असो ॥ २०४ ॥

सरळ सरस कोमळ। मधुर वाणी दुर्वादळ।
पद्यरूप अर्पूनि चरणकमळ। पूजिले भावें सानंदें ॥ २०५ ॥

सांप्रदायमाळा सहस्र ओवी। हे कल्पप्रसू नरासि बरवी।
बोधसूत्रें वोवोनि सद्भावी। वनमाळा हे अर्पिली ॥ २०६ ॥

शब्दरत्नाचे अळंकार। नवरस कोंदणें निडार।
करोनि भूषविला विघ्नहर। सर्वांगसुंदर सुखदाता ॥ २०७ ॥

सरस सहस्र पद्यकमळें। अनुभवरसें रसाळें।
सद्गुरुमहिमापरिमळें। घमघमिती जें ॥ २०८ ॥

तें एक भक्तिपूर्वक। अर्पोनी अर्चिला गणनायक।
मंत्रपुष्पार्चन सम्यक। सर्वात्मका समर्पण ॥ २०९ ॥

हृदयकमळीं आव्हानिला। द्विदळकमळीं पूजिला।
सहस्रदळीं स्थापिला। आत्मागणनाथ गुरूरूप ॥ २१० ॥

आधारचक्रीं नमिला। स्वाधिष्ठानीं स्थापिला।
मणिपूरीं बसविला। सिद्धीसहित ॥ २११ ॥

अनाहतीं ध्यायिला। विशुद्धिचक्रीं गायिला।
आज्ञाचक्रीं पाहिला। ज्योतिरूप ॥ २१२ ॥

सहस्रदळीं निजनिर्मळ। भानुकोटिप्रकाश निखळ।
कोटिचंद्राचें कीळ। साम्यतेतें न पावती ॥ २१

कोटिकंदर्प लावण्य । समुद्रकोटिकारुण्य ।
भक्तकोटिशरण्य । परमेश्वर ॥ २१४ ॥

अनंतकोटि जीवमणी । व्यापोनि वसे सूत्रस्थानीं ।
तो सद्गुरु गणपती कोटिनमनीं । निरंजनदासें प्रार्थिला ॥ २१५ ॥

वक्रतुंड महाकाय । जयाची प्रभा कोटिसूर्य ।
निर्विघ्न करोनि ज्ञानैश्वर्य । देवोनि मातें प्रतिपाळीं ॥ २१६ ॥

नमो नमो सद्गुरुमूर्ती । नमो नमो पावनकीर्ती ।
नमो नमो चित्सुखस्फूर्ती । देवोनि दासा सांभाळीं ॥ २१७ ॥

श्रीनिरंजन नमो नमो निर्गुणरूपा । नमो नमो ज्ञानदीपा ।
नमो नमो करोनि कृपा । पाददासां सांभाळीं ॥ २१८ ॥

निरंजन दासरचित । सांप्रदायपरिमळ महाग्रंथ ।
आजि पूर्ण होतां यथास्थित । सद्गुरुचरणीं अर्पिला ॥ २१९ ॥

इतिश्रीमत्सद्गुरु–संतति–संतान–लतिकायाः । प्रबोध–मंजर्याः ॥
सदाचार–परिमळप्रकाशनं नाम पंचमोद्गारः ॥

श्रीमल्लक्ष्मीधरमहामौळीपूर्णानंदस्वरूपीं श्रीसुंदरकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्रीरस्तु सर्व जगतां ॥ शके १६८५ स्वभानुनामसंवत्सरे आश्विन मासे शुक्लद्वितीयायां बोधचंद्रदर्शनं स्थिरवारे चक्रावतीदुर्गे लेखनं समाप्तं ॥ श्रीमत् त्रिपुरसुंदर्यार्पणमस्तु ॥ छ० ॥ ग्रंथसंख्या प्रथम १५१ द्वितीय १९७ तृतीय २६१ चतुर्थ १६४ पंचम २१९ ॥ सर्व ओव्या ९९२

---